# उजळत्या दिशा

लेखक :

विनायक दत्तात्रय साळगांवकर.

आवृत्ति पहिली

---

जानेवारी १९४०

किंमत २॥ रु.



ज्यांच्या स्नेहभावामुळें ह्या कला-कृतीस
उत्तेजन मिळालें,
**त्या सर्व प्रियजनांस**
सादर प्रेमपूर्वक अर्पण.



# -विनंती-

'काल-गति'चा शेवट मध्यरात्रीच्या भीषण काळोखांत झाल्यावर पहांटेच्या प्रहरला 'शुक्राची चांदणी' चमकून नंतर 'उजळत्या दिशा' दिसल्या तर तें क्रमप्राप्तच आहे, असें कुणाही रसिकाला वाटल्याशिवाय राहणार नाहीं.

या कादम्बरीतील पात्रें हीं काल-गतिमधील पात्रांची पुढील पिढी दर्शविली असल्यामुळें कालाच्या प्रवाहांत होणारे, मानसिक व नैतिक आचार-विचारामधील बदल आणि आकांक्षा याचें यथार्थ चित्र रंगविण्याचा शक्य तों प्रयत्न केला आहे. यामुळें कांहीं वाचकांचा या कादम्बरीतील पात्रांच्या आचार-विचाराशीं विरोध होण्याचा संभव आहे; परंतु आजच्या मत-स्वातंत्र्याच्या युगांत लेखकानें रंगविलेल्या पात्रांनाही आपले विचार स्पष्टपणें बोलण्याचें स्वातंत्र्य दिलें तर त्याबद्दल लेखकाला दोष देऊं नये किंवा त्या सर्व आचार-विचारांशीं लेखकाच्या विचारांचा संपूर्ण सलोखा आहे असेंही समजूं नये अशी सहृदय वाचकांना आग्रहाची विनंती आहे. त्याचप्रमाणें सभोंवारच्या जगांतीलच पात्रें या कथानकांत वावरत असल्यामुळें त्यांना सजीवपणें दर्शवावयाचीं असतील तर मनुष्य-स्वभावांतील वैगुण्यें आणि विशिष्ट मर्यादा व्यक्त करणें हेंदेखील लेखकाला आवश्यक वाटलें आहे; या मुळेंच जर कथानकांत नायक-नायिका आढळल्यास त्यांच्याही ठिकाणीं परंपरेनें कल्पिलेले सर्व गुण दिसणार नाहींत ही गोष्टही मुद्दाम नमूद करावीशी वाटते.

त्याचप्रमाणें माझ्या सहृदय टीकाकारांनाही एक गोष्ट सुचविण्याचें धाडस मला करावेसें वाटतें. या कादम्बरींत भाषेचा मोहकपणा नसेल व लेखकाच्या कलेंतील तो दोषही असेल. सर्कशीतील खेळाडूंप्रमाणें शाब्दिक कोट्यांच्या गोलांट्या-कोलांट्या, उपमांचा तोल सांभाळण्याची कसरत, विरोधाभासाच्या झोल्यावरील खेळ किंवा एकसूत्रीपणाचा तारेवरील नाच

ह्या गोष्टी लेखकाला जमत नसतील हें तो प्रांजलपणें कबूल करीत आहे. परंतु विचाराचें दारिद्य दाखविण्यासाठीं भाषेच्या अलंकाराचें अवडंबर माजविण्याचा कांहीं प्रथितयश साहित्यिक टीकाकार प्रयत्न करीत असतात आणि म्हणूनच पुष्कळ वेळां भाषा-शुद्धि करण्यापलीकडे त्यांची समीक्षा कथानकाच्या अन्तरंगांत शिरत नसते. पण त्यांनीं आपल्या टीकेचे तीक्ष्ण बाण सोडतांना हें लक्षांत ठेवावें कीं भाषेचें स्वरूप एकसारखें बदलत असतें आणि भाषा हें विशेषतः विचारप्रवर्तक कथानकांत साध्य नसून साधन असतें. भाषा हें कथेचें जीवन नसून त्या जीवनाचें एक साधन आहे आणि तें साधनच जर सर्वस्व ठरविण्याचा प्रयत्न केला तर कथेचें विपरीत स्वरूप झाल्याशिवाय राहणार नाहीं. म्हणूनच भाषेचें स्थान सुंदर कला-कृतींत गौणच राहिलें पाहिजे असें वाटतें. असो.

ह्या पुस्तकाचें हस्तलिखित वाचून माझे मित्र लेखक श्री. वि. वि. दळवी आणि श्री. वि. व्यं. धारवाडकर यांनीं ज्या सूचना केल्या त्यांबद्दल मी त्यांचा फार आभारी आहे. ह्या पुस्तकाचे प्रकाशक श्री. शं. वा. कुलकर्णी यांचाही मी फार आभारी आहे. तसेंच गुरुवर्य एस. बी. पेडणेकर, ए. एम. यांनीं एवढें सुंदर चित्र तयार करून दिल्याबद्दल मी त्यांचाही अतिशय आभारी आहें. त्याचप्रमाणें ज्या एका मित्राच्या साह्यामुळें माझ्या लेखनकार्याला ही सुस्थिति प्राप्त झाली त्याचेंही मी कृतज्ञतापूर्वक आभार मानतों. याशिवाय आणखीही पुष्कळ स्नेह्यांनीं अनेक प्रकारें माझ्या लेखनाला मदत केली आहे त्या सर्वांचे मी मनःपूर्वक आभार मानतों.

शेवटीं माझ्या सहृदय वाचकांवर दृढ विश्वास ठेवून या कादम्बरीचेंही ते स्वागत करतील अशी खात्री बाळगून हें विनंती-पत्र पुरें करतों.

३८, हनुमान टेरेसिस्,
तारा टेम्पल लेन,
मुंबई ७.
ता. १-१-१९४०.

आपला,
वि. द. साळगांवकर.

# उजळत्या दिशा



खळकन् कांच फुटल्याचा आवाज ऐकून शकुन्तलाबाई दिवाणखान्यांत गेल्या. आईच्या मागोमाग अनामिकाही धांवली. दिवाणखान्यांतील टेबलाजवळ दमन उभा होता. त्याचा चेहरा रागामुळें अजूनही लाल दिसत होता. केसांचा झुपका त्याच्या विमल भालप्रदेशावर रुळत होता. खिन्न दृष्टीनें एक वेळ आपल्या आईकडे पाहून त्यानें मान खालीं केली व दीर्घ निःश्वास टाकला.

शकुन्तलाबाईनीं समोर भिंतीला टांगलेल्या तसबिरीकडे पाहिलें. त्यांच्या दिवंगत पतीच्या तसबिरीची कांच फुटून सर्वत्र त्याचे बारीक बारीक तुकडे पसरले होते व जवळच खालीं पेपरवेटचा गोलक पडला होता. चित्रांत कांच रुतल्यामुळें बॅरिस्टर विनयांची ती प्रतिमा छिन्नविछिन्न झाली होती.

अनामिकेनें पुढें होऊन तसबीर काढून हातांत घेतली व चित्रांत रुतलेल्या कांचा काढून टाकीत ती चिडून म्हणाली, “ दादा, अशी कशी कांच फुटली ! बाबांची हीच तसबीर अतिशय सुंदर होती. आई, कोणी ग पोर्ट्रेट तयार केला होता ! रजनिकान्तदेखील नेहमीं सुंदर कलाकृति म्हणून हिची स्तुति करीत असत. ”

शकुन्तलाबाई कांहींच बोलल्या नाहींत म्हणून अनामिकेनें त्यांच्याकडे पाहिलें. दमननेंही मान वर करून आईकडे दृष्टि फिरविली. त्यांच्या नेत्रांतून अश्रु वहात होते.

"आई," दमन म्हणाला, "माझी चूक झाली. पेपरवेट घेऊन मी बोलिंगची संवय करीत होतों. पण चट्कन् सुटून तो फ्रेमवर आदळला."

शकुन्तलाबाईंनीं आवंढा गिळला व मोठ्या कष्टानें त्या घोगऱ्या स्वरांत म्हणाल्या, "दमा, वेड्या, अजूनही तूं समंजस झाला नाहींस ना!"

त्यांचा कंठ दाटून आल्यामुळें पुढें शब्द बाहेर पडेना. त्या तशाच आंतल्या दालनांत गेल्या. अनामिकेला आईची ती शोकाकुल स्थिति पाहून अतिशय वाईट वाटलें. आईला बाबांची स्मृति होऊन दुःख झालें तरी त्याला असें स्वरूप मिळावें हें कांहीसें विचित्रच तिला वाटलें. पुष्कळ वेळां आई तसबीर रुमालानें पुशीत असतां तिनें पाहिलें होतें. त्या वेळीं ती फार तर खिन्न होऊन सुस्कारा सोडीत असे, कांहीं वेळां हळुच डोळे पुशीत असे. पण या वेळीं तिला दुःखावेग असह्य झाला हें पाहून अनामिका भेदरून गेली होती.

"दादा, तुझ्या खेळाचे हे परिणाम बरं!" ती चिडून पुढें म्हणाली, "क्रिकेटच्या मैदानावर मिळणारा विजय तुला पुरेसा झाला नाहीं वाटतं? काय केलंस हें!"

एवढें म्हणून तिनें दमनकडे पाहिलें तों त्याचा चेहरा क्रोधानें लाल झाला होता. तिच्या भाषणाकडे त्याचें बिलकुल लक्ष नव्हतें. अनामिका क्षणभर गोंधळून गेली. ती निमूटपणें कांचेचे तुकडे एकत्र करून बाहेर जाऊं लागली.

दमननें एकदम मान वर करून तिला हांक मारली. तिच्या हातांतील तसबीर घेऊन चित्राकडे तीक्ष्णपणें तो पहात राहिला. तसबिरीच्या चौकटीवर मूठ गच्च आंवळल्यामुळें त्याच्या हातावरील रक्त—वाहिन्या उठावदार दिसूं लागल्या.

अनामिकेला कांहींच प्रकार कळेना. पण ती कांहींशी चिडून म्हणाली, "दादा, तुला एवढा राग कसला आला? बाबांच्या चित्राची अशी वाट लावलीस याचं कांहींच कसं वाटत नाहीं तुला?"

" बाबांची तसबीर ! " दमन एकदम उसळून म्हणाला, " कुणाचे बाबा ? "

" दादा, काय बावचळतो आहेस ? अभद्र बोलायला—"

" ताई, पण सत्य कधीं कधीं अभद्र असतं. " दमन गंभीरपणें उद्गारला.

" तुझ्याबरोबर बोलेल कोण ! " असें म्हणून अनामिका त्याच्या हातांतील तसबीर घेण्याचा प्रयत्न करूं लागली.

पण दमननें तिच्या दंडाला पकडून म्हटलें, " खरंच ताई, मला तुझी कींव येते. आईनं तुला अज्ञानांत ठेवली तरी मला मात्र तुला आतां खरा प्रकार सागणं आवश्यक वाटूं लागलं आहे. चल, माझ्या खोलींत ये नाहीं तर आई ऐकेल सर्व. "

दोघेंही पलीकडल्या खोलींत गेलीं.

" ताई, " दमन क्षणभर अडखळून पुढें म्हणाला, " बाबांना मृत्यु कसा आला असं वाटतं तुला ? आईनं तुला काय सांगितलं त्याबद्दल ? "

" अपघात होऊन—"

" साफ खोटं " दमन एकदम उद्गारला, " It was a cowardly suicide."

" काय ? " अनामिका दचकून आश्चर्यानें पुढें म्हणाली, " पण तूंही मला अपघात झाला असंच सांगितलं होतंस. "

" हो, आईला मी तसं सांगण्याचं वचन दिलं होतं. पण ताई, अद्यापही तुला असं फसवणं असह्य वाटतं मला. "

अनामिका आश्चर्यानें स्तंभित झाली. तिच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले.

दमन खिन्नपणें खिडकींतून बाहेर पहात पुढें म्हणाला, " ताई, आपल्या घराण्याच्या कुलीनपणाचा तुझा हा वाढता अभिमान पाहून मला वाटलं कीं तुला सर्व सांगून टाकावं म्हणजे पुढें बेसावध असतांना खरा प्रकार समजल्यावर एकदम वाटणारा मानसिक धक्का तरी बसणार नाहीं. ताई, आम्हांला—निदान मला कुलीनत्व अगदीं पारखं आहे. "

बोलतां बोलतां त्याचा आवाज घोगरा झाला. पाण्यानें भरलेले डोळे पुसून तो पुन्हां आवेशानें म्हणाला, " ताई, मी तुझा सख्खा भाऊ असं निदान कायदा आणि समाज मानणार नाहीं."

"दादा—" अनामिकेनें केविलवाण्या स्वरांत हांक मारली. हुंदका अनावर झाल्यामुळें तिच्यानें पुढें बोलवेना.

दमन उदासपणें जमिनीकडे पहात होता. अनामिकेचा हुंदका ऐकून त्यानें मान वर केली व तिच्या दोन्ही खांद्यांना धरून तो आर्त स्वरांत म्हणाला, " ताई, गप्प रहा. आई ऐकेल. जगानं कांहीं म्हटलं तरी मी तुझा सख्खा भाऊ आहे. ताई, तुझ्यासाठीं मी वाटल तें करीन. गप्प रहा. माझं ऐक अगोदर."

तिनें मोठ्या कष्टानें पुन्हां येणारा हुंदका दाबला व आवंढा गिळून कसेंबसें रडें आवरीत ती पुढें म्हणाली, " दादा, हें सर्व खरं का रे ? मला नीट समजावून सांग ना ? "

" खरंच ताई, तूं कॉलेजांत गेलीस तरीदेखील आईनं तुला असं अज्ञानांत ठेवणं मला चुकीचं वाटतं. बाबांविषयीं आदर तरी कां व कसा बाळगायचा ? आईच्या चारित्र्यावर शिंतोडे उडविणारे, माझं पितृत्व नाकारणारे आणि तुला अन् आईला समाजांतील कावळ्यांपुढं एकट्या सोडून भेकडपणं आत्महत्या करणारे बॅरिस्टरसाहेब ! मी तरी त्यांना माझे बाबा म्हणणार नाहीं. खरंच, मला काय करूं आणि काय नको असं होतं."

एवढें बोलून दमननें पुन्हां ती तसबीर दृष्टीसमोर धरली व तिरस्कारानें दीर्घ निःश्वास टाकला.

कांहीं वेळानें रडें ओसरल्यावर अनामिका खिन्नपणें म्हणाली, " मी कधीं आईला बाबांच्या मृत्यूचं कारण विचारलं तर विषबाधा झाली असं सांगून ती रडत असते. यामुळें कदाचित् तिच्या हातून सैंपाकांतून अगर औषधांतून विष जाऊनच त्यांचा अंत झाला असावा असं मला वाटत होतं."

" छट् " दमन एकदम उद्गारला, " माझा जन्म झाला तेव्हां बाबा विलायतेला होते. दोन वर्षांनन्तर परदेशाहून आल्यावर प्रथम बाबानीं आईशीं विवाह करण्याचं नाकारलं."

" म्हणजे ? " अनामिका एकदम चपापली.

" म्हणजे ? " दमन क्षणभर गोंधळून उत्तरला, " म्हणजे मी आईबाबांच्या कायदेशीर लग्नापूर्वी जन्माला आलों. माझ्या जन्माच्यावेळीं आई अविवाहित होती. "

अनामिका व्याकुल मुद्रा करून आश्चर्यानें ऐकत होती.

दमन उद्वेगानें पुढें म्हणाला, " विलायतेहून आल्यावर बाबानीं आईवर खोटे आरोप करून लग्न करण्याचं नाकारलं. पण आमच्या लक्ष्मीआजीनं त्यांना कोर्टात खेचण्याचं भय घालून तो विवाह घडवून आणला. पण असा सक्तीचा विवाह क्वचित्‌च सुखावह होतो. जुन्या माणसांना वाटतं तुटलेला दुवा तसाच बळकटपणें जोडतां येतो. त्यांना कुठं कल्पना होती, कीं एकदां पाणी गेलं कीं सांखळी तिथंच तुटण्याचा संभव असतो ही ? शिवाय आजीनं एवढा अट्टहास केला याचं कारण आईचा सामाजिक दर्जा काय राहील, माझा असंमत पुत्र हा दर्जा ठरेल असं वाटलं तिला. पण बाबांना आईबद्दल प्रेम वाटेना आणि शेवटीं या विवाहाचा शेवट हा असा भयंकर झाला. बाबानीं आईचा त्याग केला. अब्रूसाठीं आजोबा कोर्टाची पायरी चढले. बाजू अंगावर उलटूं लागतांच कोर्टाचा निकाल होण्यापूर्वीच बाबानीं आत्महत्त्या केली. आणि समाजाची सहानुभूति मिळवून आपल्यातर्फें समाजाचा निकाल मिळविला व आईवर लोकापवादाचा कायमचा शिक्का मारला. "

दमन खिन्न होऊन कांहीं काल स्तब्ध राहिला.

अनामिका अश्रु पुसून दाटलेल्या स्वरांत म्हणाली, " दादा, अजून-पर्यंत मी किती सुखी होतें ! "

" ताई, पण हा फुटलेल्या नौकेंतील जल-विहार होता. अशीच बेसावध राहिली असतीस तर एकाद्या दिवशीं ठार बुडाली असतीस. अग, अब्रू जाऊं नये म्हणून एका बाजूनं बांध घालावे तर दुसऱ्या बाजूनं ती दुप्पट जोरानं जाऊं लागते. आजोबा आणि आजी यांनीं अब्रुरक्षणार्थ चालविलेले प्रयत्न फोल ठरून त्यामुळेंच आमची बेअब्रू जास्त झाली. "

तो उदासपणें पुढें म्हणाला, " ताई, वेश्येच्या मुलाचा दर्जा एक-वेळ मी आनंदानं स्वीकारला असता. पण कुलीन, घरंदाज ह्या विशेषणाच्या मुलाम्याखालीं आमची होणारी विटंबना मला बिलकुल सहन होत नाहीं. खरंच, पितृत्व नाकारणाऱ्या बापाचं पुत्रत्व मिरविण्यापेक्षां एखाद्या अनाथाश्रमांत वाढलेल्या, आईबापाचा पत्ता न सांपडणाऱ्या मुलाचा दर्जा मी आनंदानं स्वीकारीन. आईच्या यातनांकडे पाहून माझा जीव सारखा तिळतिळ तुटत असतो. तोंडाला समाजानं पानं पुसलीं तरीही त्या समाजाकडे आई अपेक्षेनं आणि आशेनं पहाते याचं मला राहून राहून आश्चर्य वाटतं. तुझ्यापासून आईनं खरा प्रकार लपविला यावरूनच समजतं कीं आपण पाप केलं असं आईला वाटत असावं."

" दादा, असं कसं म्हणतोस ? आई आपलं दुःख लपविते तें आम्हाला कमीपणा वाटूं नये म्हणूनच ना ?" अनामिका कळकळीनें म्हणाली.

" कांहीं असो," दमन पुढें म्हणाला, " आत्महत्त्या करणाऱ्या लोकांबद्दल मला अनुकंपा कधींच वाटत नाहीं. त्यांच्या अंगीं मनोधैर्य बिलकुल नसतं. त्यांचं मानसिक दौर्बल्य अगदीं तिरस्करणीय आहे."

" दादा," अनामिकेनें मध्येंच प्रश्न केला, " स्वहस्तांनीं प्राणघात करणाऱ्या मनुष्याला भ्याड कसं म्हणतां येईल ? उलट त्याचं धैर्य अनाठायीं असलं तरी अलौकिकच नाहीं का ?"

" मला असं बिलकुल वाटत नाहीं." दमननें प्रत्युत्तर केलें, " ताई, तें धैर्य नसून खरोखरच ती भ्याड वृत्ति आहे. ताई, शारीरिक किंवा मानसिक वेदना असह्य झाल्या म्हणजेच मनुष्य आत्मघात करतो. त्या वेदना सहन करण्याचं मनोधैर्य व सहनशीलता त्याच्याजवळ नसते."

" कांहींतरीच तुझी विचारसरणी आहे."

" पाहिजे तर कर तुझ्या मनाची तशी समजूत." दमन शांतपणें पुढें म्हणाला. " आमच्या क्लासमध्यें शहा नांवाचा एक मारवाडी होता. एकदां देशपांडेचं व त्याचं भांडण झालं. देशपांडे हात वर करून जेव्हां पुढं गेला तेव्हां हा शहा धांवत जाऊन प्रिन्सिपॉलच्या खुर्चीमागं लपला,

आणि गर्भगळित होऊन ओरडूं लागला ' सर, देशपांडे माझा खून करायला येतो आहे. मला वांचवा.' पण पुढं त्या शहानंच इन्टरमध्यें नापास झाल्यामुळं गाडीखालीं उडी घेऊन आत्महत्त्या केली. ताई, आत्महत्त्येच्या क्षणीं होणाऱ्या दुःखाचा आवेग एवढा प्रखर असतो, कीं मनुष्याच्या साऱ्या संवेदना अगदीं बधिर झालेल्या असतात. आत्मनाशाची क्रिया एखाद्या यंत्राप्रमाणं तो करीत असतो आणि यामुळंच कित्येक वेळां ती क्रिया अत्यंत क्रूर असते. He is dead before he kills himself. तुला वाटत असेल तर तूं अशा पुरुषाची धैर्यशील म्हणून स्तुति कर, पूजा कर. पण मी मात्र त्याला भेकड समजतों. प्रियतमेच्या नाशानंतर आत्मघात करून घेणाऱ्या तरुणापेक्षां तिची स्मृति जागृत ठेवून जीविताशीं झगडून मृत्युवश होणारा तरुण खरोखरच आदरणीय आहे. ताई, मी बिलकुल लपंडाव खेळणार नाहीं. बाबांच्या ठिकाणीं धैर्याचा लवलेश तरी होता असें मानण्यास मी तयार नाहीं."

दमन निश्चयानें बोलत होता. अनामिका खिन्नपणें त्याचें भाषण ऐकत होती. क्षणभर त्याचें म्हणणें योग्य वाटलें तरी स्वहस्तांनीं मरणाऱ्या असह्य वेदना सहन करणाऱ्या मनुष्याला भेकड म्हणण्यास तिचें मन कबूल होईना. अनेक विचारांनीं तिच्या मनांत थैमान सुरू केलें होतें. दमननें बाबांवर एवढे तीव्र दोषारोप करावे हें तिला जरी उचित वाटेना, तरी आपणां सर्वांची अशी हीनावस्था करणाऱ्या पित्याबद्दल क्षणभर तिला तिरस्कार वाटला. आपल्या वडिलांच्या वर्तनाचें मानसिक दृष्ट्या पृथःकरण करतांना तिनें एकदम प्रश्न केला, " पण दादा, बाबांबद्दल आई एवढे थोर उद्गार काढते ते कां बरं ? "

" ताई, स्त्री असूनही [illegible]सं बरं समजत नाहीं ! अग, प्रेम हा पुरुषाच्या आयुष्यांतील एक प्रसंग असतो. पण स्त्रीचं तें सर्वस्वी जीवित असतं. प्रियकरानं कितीही वेळां फसविलं तरी ते अपराध विसरून नेहमीं ती त्याच्यावर पूर्ववत् प्रेम करील. बाबांनीं अखेरच्या समयीं अपराध कबूल करून क्षमेची याचना केली. आई त्यांचे सारे अपराध विसरली. बाबा आज असते तर आईनं त्यांच्यावर पूर्ववत् प्रेम केलं असतं. "

"मला असं मुळींच वाटत नाहीं." अनामिका निश्चयानें म्हणाली, "पुष्कळ स्त्रिया अशा निघतील कीं एकदां त्यांना दुखवलं तर त्या नेहमीं दुखावलेल्या नागिणीप्रमाणं सूड–बुद्धि हृदयाशीं बाळगतील."

"ताई," दमन गंभीरपणें स्मित करून म्हणाला, "स्त्री ही नागीण जरी असली तरी प्रियकराच्या प्रणयाची पुंगी वाजूं लागली कीं पुन्हा एक-वार आनंदानें बेहोष होऊन ती त्याच्याभोंवतीं डोलूं लागते. कधीं कधीं तो जादुगार वेळींच प्रीतीचे सूर काढण्यास विसरला तर ती खात्रीनं त्याला विषारी दंश करील; पण मग मात्र गोगलगाय होऊन त्याचा बचाव करण्याचा व्यर्थ प्रयत्नही करील."

अनामिकेला त्याचें हें भाषण ऐकून हसूं आलें. ती प्रत्युत्तरादाखल कांहींतरी बोलणार होती. एवढ्यांत दमन पुढें म्हणाला, "सुदैवानं कांहीं गोष्टी अनुकूल होत्या. आजीआजोबांनीं ठेवलेल्या पैशामुळं आम्हांला तुच्छतेनं वागविणाऱ्या समाजाकडे पहाण्याचा प्रसंग आला नाहीं. आई सुशिक्षित असल्यामुळं तिनं मोठ्या तत्परतेनं आम्हाला समाज–निंदेची झळ लागूं दिली नाहीं आणि जगाकडे उदारपणं पहायला शिकविलं. ताई, कदाचित् या सर्व गोष्टींमुळंच साम्यवादाकडे माझा कल झुकला असावा."

"दादा," अनामिकेनें मध्येंच विचारलें, "तुला आजी आणि आजोबांची चांगलीच आठवण असेल नाहीं ? मला पण कांहीं कांहीं गोष्टी आठवतात."

"हो. आजोबा वारले तो दिवस तर अजूनही अगदीं स्पष्टपणं माझ्या दृष्टीसमोर उभा आहे." तें दृश्य दिसत असल्याप्रमाणें समोर पहात तो म्हणाला, "दिवे नुकतेच लागले होते. मी चित्रांचं पुस्तक पहात होतों. नेपोलीयनचं चित्र पाहून मी त्यांना प्रश्न केला 'आजोबा, हा कोण हो ?' ते म्हणाले, 'तो मोठा शूर शिपाई होता.' 'मी तसाच मोठा होणार' असं मी म्हणतांच माझ्या पाठीवरून हात फिरवून त्यांनीं हास्य केलं. पुढचं चित्र कुणाचं म्हणून प्रश्न करण्याकरतां मी मान वर केली तों आजोबा आराम–खुर्चीवर झोंपीं गेले होते. "आजोबा ! आजोबा !" अशा हांका मारून मी उठून त्यांना हालवूं लागलों. 'आजोबा, असं काय

करतां हो ? ' असं मी चिडून विचारलं. मी कांहींसा बावरून आजीजवळ गेलों. आई आणि आजी दिवाणखान्यांत धांवल्या. आजोबा एकाएकीं हृदय बंद पडून मृत्युवश झाले होते. "

बोलतां बोलतां दमन सद्‌गदित झाला. अनामिकेच्या डोळ्यांतून अश्रु खालीं पडत होते. कांहीं वेळानें तो निश्वास टाकून पुढें म्हणाला, " लक्ष्मीआजीचा अंत एखाद्या अद्वितीय स्त्रीप्रमाणं झाला. कदाचित् आम्ही आईबद्दल तिरस्कार व्यक्त करूं हीच भीति तिला वाटत असल्यामुळं तिनं अन्तसमयीं आम्हाला ' आईचं ऐका. तिच्यावर रागावूं नका. आईवर प्रेम करा.' हाच उपदेश केला. "

इतक्यांत शकुन्तलाबाईंची हांक ऐकूं आली. अनामिकेनें चटकन् अश्रु पुसले. दमननेंही चेहऱ्यावरील विकार दडविण्याचा प्रयत्न केला. पुन्हा हांक मारीत त्या दारावर आल्या.

" अना, " त्यांनीं खिन्न स्वरांत प्रश्न केला, " दादाशीं काय एवढं संभाषण चाललं होतं ? दमा, भलत्याच गोष्टीला एवढं महत्व कां देतोस ? इतका भावना-प्रधान स्वभाव कधींही सुखदायक होत नाहीं. "

" आई, " दमन मुद्दामच हंसत म्हणाला, " जुन्या आणि नव्या पिढींत फरक हा असायचाच. मी पडलों साम्यवादी. धर्म, जाति, ज्ञाति मी कांहीं ओळखत नाहीं. ईश्वराच्या अस्तित्वाबद्दल ढवळाढवळ करण्याची मला बिलकुल गरज वाटत नाहीं. आर्थिक, राजकीय आणि सामाजिक समता हेंच आमचं धर्मतत्व. "

तो विषयान्तर करीत आहे हें शकुन्तलाबाईंच्या लक्षांत आल्यामुळें त्याला उत्तर न देतां त्या म्हणाल्या, " अना, दमानं तुला सर्व कांहीं सांगितलंच असेल. तो आपल्या वडिलांबद्दल आदरानं बोलत नसला तरी मी तुला सांगतें, तुमचे वडील उदार अन्तःकरणाचे व सुसंस्कृत मनाचे होते. त्यांचे विचार उदात्त होते. "

" आई, क्षमा कर. " दमन एकदम मध्येंच म्हणाला, " आई, मग त्यांनीं आपला असा अंत कां करून घेतला ग ? "

"दमा," शकुन्तलाबाईंचा कंठ दाटून आला. आवंढा गिळून त्या पुढें म्हणाल्या, "हें बघ, मनुष्याच्या हातून असे अन्याय होत असतातच. कधीं कधीं ते क्षुल्लक असूनही त्याचे अनपेक्षितपणें अतिशय घोर परिणाम होतात आणि त्यामुळंच त्यांना निष्कारण तीव्र दोषारोप सहन करावे लागतात. दमा, त्यांनीं आपला अन्त केला त्या वेळीं पश्चात्तापानं त्यांचं अन्तःकरण होरपळत होतं. वेड्या, समाजाबद्दल निःशंक वृत्ति दाखविण्यास लहानपणापासून त्याचं बाळकडू पाजावं लागतं. त्यांच्या वडिलांनीं त्यांना तो धडा दिला नव्हता. मी पुष्कळ वेळां सांगितलं कीं तुला तुझ्या वडिलांबद्दल अभिमान वाटावा अशीच त्यांची तेजस्वी बुद्धि आणि उदार मनोवृत्ति होती. कितीही म्हटलं तरी आयुष्याच्या लढ्यांत नशिबावर बराचसा हवाला ठेवावा लागतोच. त्या घोर प्रसंगांत आम्ही सर्व अगदीं दैवाधीन होतों."

बोलतां बोलतां शकुन्तलाबाईंचा आवाज सद्गदित होऊन डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले. आईला याचा सरळ सवाल द्यावा असें दमनला वाटून बोलण्याच्या हेतूनें त्यानें मान वर केली. पण त्यांची ती व्याकुल मुद्रा पाहून त्याच्या तोंडांतून शब्द बाहेर पडेनात. शकुन्तलाबाई आवंढा गिळून मोठ्या कष्टानें पुढें म्हणाल्या, "त्या वेळीं आम्हां सर्वांचं दुर्दैव उभं राहिलं. त्यांची सद्विवेक—बुद्धि जागृत होईल असं कुणालाच वाटलं नाहीं. दुर्दैवाचा आवेग असा कांहीं होता कीं त्यांत आम्ही सर्वजण अगदीं निर्जीव पदार्थांप्रमाणं वहात होतों. शिवाय दमा, गेलेल्या व्यक्तीवर दोषारोप करण्यांत आपल्या कमकुवत मनाचं सांत्वन होतं एवढंच ना? मनुष्याच्या वर्तणुकींत फरक व्हायचा असेल अगर अन्य सामाजिक फायदा व्हायचा असेल तरच निंदेची बाजू घेऊन बोलतां येईल."

दमन विषण्ण मनानें खालीं पहात स्तब्ध राहिला होता. अनामिका अतिशय आर्त दृष्टीनें आपल्या आईकडे पहात होती.

"चला चहा घ्यायला." शकुन्तलाबाई स्निग्धपणें म्हणाल्या, "दमा, तुला कॉलेजांत सभेसाठीं जायचं आहे ना?"

"हो खरंच मी विसरलों कीं." असें म्हणून तो घाईनें तोंड धुण्याकरतां नळावर गेला.

तो बाहेर गेल्यावर कांहीं वेळानें शकुन्तलाबाई म्हणाल्या, "खरंच, दमा इतका तेजस्वी आहे कीं असले लोक नेहमींच पेटत राहायचे. त्याच्या विचारावर मी सारखं पाणी ओतीत रहातें तरीदेखील त्याचा सात्विक संताप कमी होत नाहीं. हा साम्यवाद अंतिम ध्येयवाद असल्यामुळें त्याच्या पाठीशीं असलेले लोक नेहमींच असे अस्वस्थ राहणार. तो आपलं कॉलेज–शिक्षण पुरं करील कीं नाहीं याचीच शंका मला वाटूं लागली आहे. एकदां बी. ए. पास झाला कीं विलायतेला पाठविणार होतें."

"आई, आणि त्यानं एखादी मडम आणली तर?" अनामिकेनें हंसत प्रश्न केला.

"अग, आणि इथं राहून तरी हिंदुच आणील असं थोडंच आहे! गत वर्षी त्या रुबीबरोबर फिरत होता. तिच्याशीं लग्न केलंन् असतं तर मी काय करणार होतें!"

इतक्यांत टॉवेलनें तोंड पुशीत दमन तेथें आला.

"दादा," अनामिका म्हणाली, "आई तुझ्याबद्दल काळजी करते आहे, लग्न करून एखादी मुसलमानीण, नाहीं तर पारशीण आणशील म्हणून. पण मी आईला सांगितलं कीं दादा साम्यवादी आहे. तो विवाहच करणार नाहीं."

"हं चालूं दे साम्यवादाची चेष्टा." दमन निष्काळजीपणानें हंसत म्हणाला, "ताई, आमचा साम्यवाद हाच खरा सुखाचा मार्ग आहे. स्वार्थी जगाला आज तो पटत नाहीं. जगांत अशीच पापांची पैदास होऊं लागली म्हणजे आपोआप आमचा विजय होईल."

"हं म्हण, क्रान्तीचा विजय असो." अनामिका हंसत ओरडली.

"चला बघूं चहा घ्यायला." असें कौतुकानें म्हणून शकुन्तलाबाई त्यांना घेऊन आंत गेल्या.

---



तो दिवस रविवार होता. याशिवाय पौर्णिमा असल्यामुळें जुहूच्या समुद्रकिनाऱ्यावर सहल करण्यासाठीं पुष्कळ जनसमूह जमला होता. चंद्र-गोल उंच नारळींच्या मागें उगवला होता, यामुळें त्या वृक्षांच्या लांबलचक वेड्यावांकड्या छाया किनाऱ्यावरील वालुकामय प्रदेशावर पसरल्या होत्या. त्या छायांमध्यें आपल्याला दडवून प्रणयी स्त्री–पुरुष परस्परांच्या सह-वासाचें उन्मादक सुख अनुभवीत होते. मधूनमधून विस्तीर्ण किनाऱ्यावरून तरुण–तरुणी एकमेकांचे हातांत हात गुंतवून प्रेमानें बोलत, हास्य करीत इकडे तिकडे फेऱ्या घालीत होत्या. माडाच्या झापांतून सळसळ करीत वहाणाऱ्या वाऱ्याची शीतल झुळूक त्या रमणीय प्रसंगाला व स्थळाला अधिकच माधुर्य आणित होती. जवळच असलेल्या उपाहारगृहांतून वाद्याचे सूर ऐकूं येत होते व टेबलाजवळ बसून मधुपेय घेणाऱ्या स्त्री–पुरुषांच्या जोड्या उठून एकमेकांचे हात धरून नर्तन करीत होत्या. तें मधुर पाश्चि-मात्य गायन, चांदण्याची उन्मादक शोभा, उसळणाऱ्या लाटांची गंभीर गर्जना आणि मंद वाऱ्याची आल्हादजनक झुळझुळ यामुळें त्या देखाव्यांत स्वर्गीय जादू पसरली होती. आयुष्यांतील असह्य धडपड चार घटका तरी विसरून त्या अवर्णनीय सुखाचा अनुभव घ्यावा या एकाच इच्छेनें अनेक स्त्री–पुरुष त्या जुहूच्या किनाऱ्यावर उतरत होते. मधूनच स्नाना-करतां तंग पोषाख करून सौंदर्यसंपन्न युवती आपल्या प्रियकराच्या बाहूंत कोमल हात अडकवून समुद्राकडे जात होत्या.

या वेळीं दमन, अनामिका, कमला, शशिधर व रजनिकान्त टॅक्सीं-तून त्या किनाऱ्यावर उतरले व जवळच्या हॉटेलांत गेले. त्या हॉटेलच्या उंच गच्चीवरून समोर अफाट समुद्राचा नयनरम्य देखावा दिसत होता. आकाशांत सावरीच्या कापसाप्रमाणें भासणारे ढग मधून मधून स्वैर गतीनें

चागडत होते. चंद्रप्रकाशामुळें आकाशाच्या विस्तीर्ण छतावर दिसणारी तारकांची गर्दी अगदीं विरळ झाली होती. अद्यापही पश्चिम क्षितिजावर मावळत्या सूर्यानें उधळलेल्या लालीच्या छाया अगदीं अस्पष्टपणें दिसत होत्या.

अनामिकेनें गच्चीच्या कठड्याजवळ उभें राहून समोर दिसणाऱ्या ताऱ्यांकडे पहात म्हटलें, " कमल, तो पाहिलास का गुरु किती तेजस्वी दिसतो आहे तो ? "

" आणि ही पहा, शुक्रतारका " कमलेनें अनामिकेकडे बोट दाखवित म्हटलें.

" आणि ती पहा चंद्रिका आपल्या प्रियकराला कशी शोभते आहे ! " अनामिकाही लगेच तिच्याकडे पहात उत्तरली.

" अहो, अशी परस्परांची स्तुति करतांना भांडूं नका. " शशिधर म्हणाला, " सभोंवार असलेले बुध, बृहस्पति वगैरे ग्रह अहमहमिकेनें एकमेकांना दाखवा. "

" कुठं आहेत ? " अनामिका आकाशांत पाहिल्यासारखें करून हास्य दडविण्याचा प्रयत्न करीत म्हणाली, " पण कमल, ते बघ, राहु, केतु आणि हा इकडे शनि एकटाच. "

" मग चंद्रिकेला आज ते दोघे ग्रासणार असं दिसतं. " असें म्हणून शशिधरनें रजनिकान्ताकडे व दमनकडे पाहिलें व हंसत तो पुढें म्हणाला, " बिचारा शनिमहाराज मात्र असल्या भानगडींत कधींच नसतो. "

अनामिका व कमला त्याच्या भाषणानें अगदीं ओशाळल्या होत्या. कांहींतरी प्रत्युत्तरासाठीं त्या विचार करीत होत्या. एवढ्यांत दमन जवळ येऊन म्हणाला, " बरं तो वेटर येतो आहे. कांहीं घेणार का ? रजनिकान्त, आपली कलाभिरुची काय म्हणते ? सर्व मंडळींनां कॉफी चालेल असं मला वाटतं. "

दमननें कॉफी मागविली. रजनिकान्त तन्मयतेनें समोरचा देखावा पहातच होता.

" खरंच, तुम्ही जुहूचा एखादा लॅंडस्केप कां तयार करीत नाहीं ? मी तुम्हांला दाखवितें. " अनामिका समोर बोट फिरवित म्हणाली, " हा

व्ह्यू किती सुंदर आहे ! एखादा टर्नरचा लँडस्केप असावा तसा काढता येईल. ”

“ पण ताई, ” दमन मध्येंच म्हणाला, “ मानवी सौंदर्य–विशेषतः Nude हाच त्याचा आवडता विषय आहे. पाश्चिमात्य देशांत त्याच्याबद्दल त्याचा गौरवही झाला. पण रजनिकान्त, काय हो, स्त्रिया आपलं सौंदर्य जास्त मोहक दिसावं म्हणूनच ना सुंदर वस्त्र नेसतात आणि अलंकार धारण करतात ? मग चित्रकार विवस्त्रच चित्र काढण्याचा अट्टहास कां करतो ? ”

“ दमन, तुमचा समज चुकीचा आहे. स्त्रिया आपलं सौंदर्य समाज-नीतिस अनुसरून लपवित असतात. तरीही आपलं सौंदर्य आविष्कृत व्हावं म्हणून एखाद्या विशिष्ट प्रकारचं त्यांनीं वस्त्र धारण केलेलं असतं. कला निर्माण करतांना नीतीचा नियम पाळण्याची चित्रकाराला बिलकुल आवश्यकता वाटत नाहीं व कलेच्या साम्राज्यांत नीतीचा एकही नियम पाळला जात नाहीं. तुम्हाला पूर्ण आणि शुद्ध कला पाहिजे असेल तर नीति–नियम तिच्यावर लादण्याचा प्रयत्न करूं नका. कलेचा सात्विक स्वाद घेतां येत नसला तर तुम्ही स्वतःच्या मानसिक दौर्बल्याला दोष द्या. पण कलेची अवहेलना करूं नका. ”

“ पण रजनिकान्त, ” कमलेनें प्रश्न केला, “ कलाविकासाला नीति-नियमाची आवश्यकता नाहीं का ? नीतिभ्रष्ट कला अधोगतीस नाहीं का जाणार ? कलेपासून खरा सात्विक आनंद झाला पाहिजे. तो नीतिभ्रष्ट कलेपासून कसा होईल ? ”

“ कमलाताई, नीति–नियम हे मनुष्यानं आपल्या वाईट विकारा-पासून परस्परांचा बचाव व्हावा म्हणून केले आहेत. खरी कला स्फूर्तिजन्य असते व तिचा हेतु व्यवहारी नसून अंतिम असतो. तिचा उपयोग व्यवहारा-कडे करणं म्हणजेच उच्च ध्येयाचा त्याग करण्यासारखं आहे. ”

“ पण रजनिकान्त, ” दमननें हंसत विचारलें, “ कलेचा विकास नीतीच्या मर्यादेंत राहून नाहीं का व्हायचा ? ”

“ हें असंभवनीय आहे.” रजनिकान्त आग्रहानें पुढें म्हणाला, “ कलेचा कोंडमारा नीतीनं करणं खास चुकीचं होईल. व्यवहारनीतीच्या दृष्टीनं कलेनं सामाजिक नियम पाळावेत. पण ज्या वेळीं तुम्हांला ध्येययुक्त कला निर्माण करायची असेल त्या वेळीं व्यवहारनीतीचे नियम कलावंतांनीं डोळ्यापुढं ठेवल्यास कलेचा निःसंशय ऱ्हास होईल.”

“खरंच,” अनामिका हंसत म्हणाली, “ कला आणि नीति यांचा झगडा असाच चालायचा. कलेचा उपयोग आनंद देण्यासाठीं असावा कीं तत्त्वप्रतिपादनार्थ असावा हा प्रश्न वादग्रस्तच आहे. दोहोंची तडजोड करून एवढंच म्हणतां येईल कीं कांहीं वेळां कलेनं प्रदीप्त भावना आविष्कृत करून सात्विक आनंदच द्यावा किंवा कांहीं वेळ तिचा उपयोग तत्त्वप्रतिपादनार्थ असावा. सुंदर विवस्त्र स्त्री–पुरुषांचीं चित्रं किंवा शिल्पकारांचे पुतळे पाहून मनांत उदात्त भावना येत असतात. आणि सात्विक आनंदानंच आपण त्या वेळीं त्या अलौकिक कृतीकडे पहातों. तसंच वाङ्मयांत सुंदर देखाव्याचं किंवा स्त्रीसौंदर्याचं काव्यमय वर्णन वाचतांना आपण कलात्मक दृष्टीनंच त्याच्याकडे पहात असतों आणि त्यांत नीतिबाह्य असं आपल्याला कांहींच दिसत नाहीं. परंतु कलेचा उपयोग प्रचारकार्याकडेही यशस्वी रीतीनं केल्याचीं उदाहरणंही आपण समाजांत पहातोंच ना? पुष्कळ वेळां नाट्यकला, लेखनकला यांच्या साह्यानंच आपण नवीन विचाराचा प्रचार करूं शकलों आहों. एवढंच नव्हे तर क्रान्ति घडवून आणल्या आहेत याची साक्ष इतिहास देत आहे. रजनिकान्त, तुम्ही यांतील कुठलाही मार्ग स्वीकारा. आम्ही तुम्हांला खरे कलावंत म्हणूनच नेहमीं ओळखत राहूं.”

“पण अनाताई,” शशिधर मध्येंच म्हणाला, “ कलेला हीं दोन अंगं नेहमींच असतात असं म्हणतां येणार नाहीं. उदाहरणार्थ आमची शस्त्रक्रिया घ्या. कलेसाठीं कला असं म्हणून जर आम्ही चांगल्या निरोगी मनुष्याला टेबलावर घालून फाडण्यास सुरवात करूं तर तें शक्य नाहीं. त्याचप्रमाणं लेखनकलेचा उपयोग विशिष्ट तत्त्वप्रतिपादनार्थ अथवा सामाजिक सुधारणेस्तव अधिक प्रमाणांत करणं आवश्यक आहे. पण चित्रकला

गायनकला, शिल्पकला इत्यादि ललितकलांचा उपयोग मानसिक आनंदच देण्याकरतां विशेषतः करतात. म्हणून सर्वच कलांवर नीतिनियम लादणं योग्य नसलं तरी कांहीं कलांचा उपयोग नीतिनियमास धरूनच करणं रास्त आहे."

"माझं तर असं मत आहे," दमन म्हणाला, "या दोन्ही मताचे कलावंत संस्कृतीला आवश्यक आहेत. रजनिकान्त, तुमच्या सुंदर प्रतिभा-संपन्न कृति नेहमीं प्रेक्षणीय व आदरणीय आहेत."

"आभारी आहे. दमन, तुमचंसुद्धां मला सिटिंग मिळेल का?"

"अलबत!" दमन हंसत उत्तरला, "कलाविकासासाठीं मी काय करणार नाहीं? पण चला आतां पाण्याच्या उसळणाऱ्या लाटा पाहून मला कसं स्फुरण चढतं आहे. त्या प्रचंड लाटांचा तड आपल्या अंगाशीं आदळून दुभंगतांना किती आनंद वाटतो!"

"पण दादा, तुला दूर पोहत जायचं नाहीं. पोहण्याची सारी मौज बाजूला राहून तुझी काळजी करण्यांतच आमच्या आनंदावर विर-जण पडतें."

"खरंच बाई," कमला लडिवाळपणें म्हणाली, "तुम्हांला असं दूर जायचं असेल तर आम्ही पाण्यांत उतरतच नाहीं."

"तुम्ही उगाच घाबरतां. मी कितीही दूर गेलों तरी शेवटीं किनाऱ्या-वर येणारच. शेलेप्रमाणं मलाही समुद्राच्या तळाला मरण यावं असं वाटतं."

"मग एखादा देवमासा झाला असतास तर ठीक झालं असतं." शशिधरनें तात्काळ प्रत्युत्तर केलें.

"हो, पण दमन, माणसानं मेल्यावर तरी कुणाला त्रास देऊं नये या तुझ्या मताला तूंच अपवाद ठरशील."

"इश्श कांहींतरीच! शशिधर, कांहींतरीच काय बोलतां?" कमला रागाचा आविर्भाव करीत म्हणाली.

"बरं. कमलाताई आणि अनाताई ह्या दोन जलदेवतानीं ह्या दोन जलचरांचं रक्षण करावं" शशिधर पुन्हां हंसत म्हणाला.

" चला लवकर तर. आपण ती राहुटी घेऊं. तो पहा दक्षिणेकडे केवढा प्रचंड ढग वर येतो आहे!" दमन आकाशाकडे पहात म्हणाला, " एखाद्या खलपुरुषाप्रमाणं मेघराज आकाशाच्या सुंदर बगीच्यांत दासी-शिवाय पूर्ण सौंदर्य आविष्कृत करून हिंडणाऱ्या चंद्रिकेवर एकाएकीं झडप घालून विनयभंगाचा प्रयत्न करतात असंच वाटतं; नाहीं ?"

" पहा ना किती सुंदर काव्यकल्पना आहे !" शशिधर चेष्टेनें म्हणाला, " दमन, एखादं विडंबनकाव्य लिहिणारा कविदेखील ही काव्य-कल्पना ऐकून वेडा होऊन जाईल."

" तूं बोलून चालून शशिधर," दमननें हंसत उत्तर केलें, " अरे, कितीहि जरी तूं मान गरगर फिरविलीस तरी डोक्यावरची चंद्रिका तुला थोडीच दिसणार ? सर्जिकल थिएटरमध्यें औषधांची दुर्गंधी घेत बसावं हाच तुझा आनंद."

" हूं," कमला दमनकडे प्रेमळपणें पहात म्हणाली, " चला आतां. बिलकुल वादविवाद करायचा नाहीं."

सर्व मंडळी हॉटेलांतून बाहेर पडली. सर्वत्र चांदणें फुललें होतें. चंद्र बराच वर आल्यामुळें वृक्षाच्या छाया वर सरकल्या होत्या. त्यामुळें शुभ्र किनारा अतिशय सुंदर दिसत होता. त्या शीतल वायूचा मृदु स्पर्श किती तरी आल्हादजनक होता !

" अहाहा, खरंच गडे," कमला अनामिकेच्या गळ्यांत हात घालून म्हणाली, " असं सुंदर चांदणं पडलंय्, कीं जगांतील दृश्य पदार्थंच काय, पण मनसुद्धां फुलून जातं. खरंच अना, जगानं आपल्या घराबाहेर पडावं आणि या रमणीय प्रसंगाचा आणि देखाव्याचा मन-मुराद आल्हाद घ्यावा. काय ग, इथं जमलेल्या एकाच्या मनांत तरी ह्या वेळीं दुष्ट विचाराचा लवलेश असेल का ?"

" अग, दुष्ट विचार नसले तरी दुःखद विचार खास असतील. एकटे-पणानं वावरणाऱ्या माणसाला हा सुखद प्रसंगसुद्धां असह्य होईल."

" अना," कमला चिडल्यासारखें करून म्हणाली, " दुसऱ्याच्या दुःखाबद्दल तुझ्यासारखी निश्वास टाकीत बसून माझं सुख मी घालवून बसणार

नाहीं. मी तुझ्याशीं आज बिलकुल बोलायची नाहीं. चल, ती बघ तिकडे सर्व मंडळी गेली."

जवळच नारळीच्या बनामध्यें असलेली राहुटी भाड्यानें घेऊन आपलें सामान आंत ठेवलें व कपडे बदलून स्नानासाठीं सर्व मंडळी निघाली. दमनचे मोहक पिळदार बाहू, उंच शरीरयष्टी, रुंद छाती आणि विस्तीर्ण भालप्रदेश यामुळें तो अतिशय मोहक दिसत होता. त्याच्या चेहऱ्यावर दिसणारी प्रसन्नता आणि नेत्रांमध्यें चमकणारें तेज यामुळें त्याच्या अंगीं विलक्षण आकर्षणशक्ती उत्पन्न झाली होती.

दमनकडे बराच वेळ बघून रजनिकान्त शशिधरला हलकेंच म्हणाला, "ह्यांची शरीरयष्टी रोमन लोकांप्रमाणं अगदीं बांधेसूद आहे."

"हो, आणि तशीच अनामिकाही आपल्या आईप्रमाणं रूपवती आहे." शशिधर म्हणाला.

"विशेषतः तिच्या अवयवांच्या वैशिष्ट्यामुळें आणि डोळ्यांच्या तेजस्वितेमुळें तिच्या ठिकाणीं संकलित झालेली आकर्षणशक्ती अत्यंत विलक्षण आहे. कांहीं दिवसांपूर्वीं ती माझ्या स्टुडियोंत आली होती, त्या वेळीं रॉयल ॲकॅडमीचा जॉन रॉबर्टस् तिथं होता. हिचं सौंदर्य पाहून तो अगदीं खूश झाला व सिटिंग् देईल कीं काय म्हणून विचारूं लागला. खरंच, शशिधर, हिचा एक स्टडी केला तर मी जगांतील एक नामांकित कलावंत होईन."

एवढ्यांत दमन त्यांच्याजवळ आला व म्हणाला, "काय आर्टिस्ट्, कसला एवढा विचार चालला आहे? शशी, आज नॅन्सी कां बरं आली नाहीं?"

"तिला रात्रपाळी आहे." शशिधरच्या आवाजांत किंचित् खिन्नता भासली.

"Better luck next time." दमन हंसून म्हणाला.

बोलत बोलत मंडळी पाण्यांत उतरली. कम्बरभर पाण्यांत जातांच कमलेनें हलकेच येऊन दमनच्या डोळ्यांवर पाण्याची ओंजळ उडविली. त्यानेंहि तिच्यावर तात्काल पाण्याचा वर्षाव सुरू केला. ती पळण्याचा

प्रयत्न करतांना तोल गेल्यामुळें खालीं पडली. दमननें चटकन् आधार देऊन तिला उभी केली.

दमनच्या केंसांतून खालीं पडणारे पाण्याचे बिंदु त्या चांदण्यांत मोत्यांप्रमाणें चमकत होते. कमला बाजूला उभी राहून डोळे पुशीत मिस्किलपणें हंसत होती. ती एकदम त्याच्यावर पाणी उडविणार तोंच तो पाण्यांत बुडाला. कमला कौतुकानें हंसत पाण्याची ओंजळ पुन्हा घेऊन ती उडविण्याच्या हेतूनें तो कोठें दिसतो तें पहात उभी होती. दमन एकदम तिच्या पाठीमागें पाण्यांतून बाहेर आला व त्यानें जोरानें तिच्यावर पाण्याचा वर्षाव केला.

" इश्श, हें काय ? " असें आर्जवानें म्हणून तिनें दोन्ही हातांनीं तोंड झांकून घेतलें, " अग अना, पहा आपले बंधुराज ! "

" दादा, शरणागताला अभय असो." अनामिका थट्टेनें म्हणाली.

इतक्यांत एक प्रचंड लाट मागाहून येऊन आदळल्यामुळें अनामिकेचा व कमलेचा तोल गेला. दमननें चटकन् त्यांचे हात पकडून दोघांनाही सांवरलें व तो म्हणाला, " ताईसाहेब, समुद्रावर असा गाफीलपणा उपयोगी नाहीं. रजनिकान्त, जरा लक्ष ठेवा हं. नाहीं तर या आम्हांला संकटांत घालतील. दूर जाऊं नका हो. "

" दादा," अनामिका ऐटीनें उत्तरली, " बुडत असलास तर तुलासुद्धां मी वर काढीन. "

" शक्य आहे. पण अगोदर मी बुडत असलों पाहिजे ना ! बुडत्याला काडीचा आधार पुरे असतो. " असें म्हणून दमननें जलाच्या पृष्ठभागावर अंग टाकलें व हात बाहेर काढून तो जोरानें पोहत पुढें जाऊं लागला.

" थांबा, मीही तुमच्याबरोबर थोडीशी येतें. " कमलेनें पाण्यावर तरंगत म्हटलें.

"चल तर" असें म्हणून दमन कांहींसा जवळ आला. कमला पोहूं लागली.

"पुढं जायचं नाहीं हो," ती पाण्यावर हात मारीत म्हणाली, "मला एकटीलाच भीती वाटते."

"मी तुझ्या मागंच राहतों, मग तर झालं?" असें म्हणून त्यानें आपला वेग कमी केला.

"पाणी मागं चाललं आहे असं वाटतं." धांपा टाकीत कमला पुढें म्हणाली, "पाण्याला एवढी ओढ कां बरं?"

"पाण्यापेक्षां हृदयालाच ओढ जास्त आहे." दमन हंसत उत्तरला.

"कुणाच्या?" कमलेनें हंसत प्रश्न केला.

"दोघांच्या!"

"कुणासाठीं?" तिनें विचारिलें.

"एकमेकासाठीं!" दमन तिच्याबरोबरीनें आपले हात हलके हलके मारून पोहत म्हणाला.

"इश्श." ती लाजेनें आरक्त झाली.

"खरंच कमल," दमन स्निग्ध स्वरांत म्हणाला, "किती सुंदर प्रसंग हा! उचंबळणाऱ्या सागराबरोबर आपल्या भावनाही उचंबळत आहेत. अगदीं क्षितिजापर्यंत तुझ्या सहवासांत पोहत जावं असंच मला वाटूं लागलं आहे. थांब, कांहीं वेळ आपण निश्चल पडून ह्या आकाशाची शोभा पाहूं. मागं पहा, केवढा प्रीतीचा प्रभाव हा! ज्या मार्गानं आपण पोहत आलों तो मार्ग देखील रुपेरी कान्तीनें चमकत आहे."

"खरंच, आपले पाय तळापासून किती वर आहेत!"

कमलनें पोहायचें थांबवून पाण्याच्या पृष्ठभागावर अंग टाकलें. आकाशांत चांदण्या लुकलुकत होत्या. दमनही तिच्याजवळच पाण्यावर पडून आकाशाच्या विस्तीर्ण प्रदेशाकडे पहात होता. पाण्याच्या लाटांबरोबर त्याचें शरीर हेलकावे खात होतें. कांहीं वेळ गेल्यावर कमला म्हणाली, "आणखी पुढं जायचं का? मला थकल्यासारखं वाटतंय्."

"चल तूं. मी आहें बरोबर." असें म्हणून दमननें पोहण्यास सुरवात केली.

थोड्याच वेळांत कमला धांपा टाकूं लागली. समुद्राच्या लहान लहान लाटाही वाऱ्यामुळें फुटून तिच्या तोंडावर उसळत होत्या. यामुळें तिच्या नाकातोंडांत पाणी जाऊं लागलें. तरीदेखील दमनच्या साह्यानें विसांवा घेण्यास ती तयार नव्हती. मोठ्या धीरानें ती पुढें पोहत जात होती. पण शेवटीं तिचे हातपाय एकदम गळून गेले. जास्त धडपड करण्यास ती अगदीं असमर्थ झाली. नाइलाजानें तिनें आर्त स्वरांत हांक मारली, " दमन, मी थकलें अगदीं ! मला जरा मदत करा. "

दमन झटकन् एकदोन हात जोरानें मारून तिच्याजवळ आला व आपला डावा हात तिच्या कम्बरेभोंवतीं घालून आपल्या तळ हातावर तिच्या शरीराचा भार घेत तो हंसत म्हणाला, " कमल, बिलकुल घाबरूं नकोस. तूं अगदीं स्वस्थ रहा. मी सहज तुला किनाऱ्यावर नेईन. "

तो जोरानें किनाऱ्याकडे आपला मार्ग आक्रमित होता. कांहीं वेळ गेल्यावर ती धांपा टाकीत म्हणाली, " सोडा, मी आतां पोहूं शकेन. "

त्यानें आपला हात काढला व तो सावधपणें तिच्या बाजूनें पोहूं लागला. अल्पावधींतच कमला पुन्हा थकून गेली.

" माफ करा. माझ्यानं पोहवत नाहीं ! धरा मला. " असें म्हणून तिनें व्याकुळ दृष्टीनें दमनकडे पाहिलें.

" कांहीं हरकत नाहीं. माझ्या मानेवर हात ठेवून तूं स्वस्थ रहा. " असें म्हणून त्यानें तिला आपल्या हाताचा आधार दिला.

ती भीतीनें कांहींशी गोरीमोरी झाली होती. एखाद्या बाहुलीप्रमाणें तिच्या डोळ्यांची हालचाल चालली होती. केंसावरून पाण्याचे ओघळ वहात होते. श्रमामुळें तिची गौरकान्ती अधिकच फटफटीत होऊन एखाद्या पुतळ्याप्रमाणें ती निश्चल दिसत होती.

" कमल, डोळे उघड. एवढी घाबरलीस ? मी आहें हं. बिलकुल घाबरूं नकोस. "

तिनें क्षणभर डोळे उघडले व पुन्हां ते मिटून ती निचेष्ट पडली. दमन झपाट्यानें एकाच हातावर पोहत किनारा गांठीत होता. इतक्यांत

कमलेनें डोळे उघडले. तिच्या चेहऱ्यावर बरीच हुशारी दिसत होती. दमननें मधुर हास्य केलें.

" बरं वाटतं ना आतां कमल ? " तो स्निग्ध स्वरांत विचारूं लागला.

" हो, सोडा मला. मी आतां जाईन. किनाऱ्यापर्यंत. " तिनें क्षीण आवाजांत उत्तर दिलें.

" नको, तूं अगदीं स्वस्थ रहा. मी कांहीं थकलों नाहीं, " असें म्हणून त्यानें तिच्या तोंडावर फुंकर घालून हास्य केलें.

त्यानें तळाला पाय लावण्याचा प्रयत्न केला. परंतु अजूनही पाणी खोल असल्यामुळें पुन्हा तो जोरानें पोहूं लागला.

कांहीं वेळानें मंद वाऱ्याच्या झुळकेमुळें आणि उबदार पाण्यामुळें कमलेला पुष्कळच हुशारी वाटूं लागली. एवढ्यांत दमनचे पाय तळाला लागतांच त्यानें आपला उजवा हात तिच्या मानेखालीं घातला व दुसऱ्या हातानें तिला घुडग्याजवळ धरून वर उचलून हंसत तो म्हणाला, " कमल, कमल, एवढी कशाला घाबरलीस ? माझ्याकडे पहा, "

तिनें दृष्टी वर करून दमनकडे पाहिलें. आपल्या उजव्या खांद्या-कडून वर आलेला त्याचा बळकट हात तिनें जवळ ओढून दोन्ही हातानीं हृदयाशीं दाबला. त्याची विस्तीर्ण रुंद छाती श्रमामुळें सारखी वरखालीं होत होती व त्याच्या केंसांतून वहाणारे जलबिंदु कमलेच्या वक्षःस्थलावर पडत होते. चंद्रप्रकाशामुळें दमनची छाया तिच्या मुखकमलावर पडली होती. पूर्व दिशेकडे तोंड करून तिचें मोहक सौंदर्य तो चांदण्याच्या कोमल प्रकाशांत मुग्धपणें पाहूं लागला.

" दमन, आज तुम्ही होतां म्हणूनच माझा पुनर्जन्म झाला."

" आणि म्हणूनच आज मलाही नवजीवन लाभलं." त्यानें हंसत प्रत्युत्तर केलें.

" दमन," असें म्हणून कमलेनें त्याच्या भालप्रदेशावर बसलेला केंसाचा ओला झुबका मागें सारून म्हटलें " किती वेळ हा लपंडाव चालायचा ? "

इतक्यांत एकाएकीं काळोख झाला. दमननें आकाशाकडे पाहिलें. लहानशा ढगामागें चंद्र लपला होता. चंद्रमा पुन्हां ढगाबाहेर पडला व स्वैर गतीनें धावूं लागला.

"कमल, त्या चंद्रानं आपणाला धडाच शिकवला म्हणायचा !" असें म्हणून तो कांहींसा मागें सरकला.

कमलेचा अर्धाअधिक देह पाण्यांत राहिल्यामुळें त्याच्या हातावरील भार कमी झाला होता. त्याच्या भरींव खांद्यावर येणाऱ्या पोशाखाच्या गुंड्याशीं खेळत तिनें म्हटलें, "तुमचा स्वभाव किती दिलदार आहे !"

"कमल, किती सुंदर आहेस तूं ! देवांनीं समुद्र-मंथन करून अमृत मिळतांच समुद्र घुसळण्याचं कार्य थांबविलं म्हणूनच माझ्या वांट्याला आज़ हें तुझ्यासारखं सुंदर रत्न आलं !" एवढें बोलून त्यानें तिच्या अधरांचें चुंबन घेऊन तिला हृदयाशीं घट्ट धरली.

कमला आपल्या दोन्ही हातांचे तळवे दमनच्या गालावर दाबून प्रेमार्द्र दृष्टीनें त्याच्याकडे सारखी पहात होती. क्षणमात्रांत तिनें त्याचा चेहरा जवळ ओढून त्याचें चुंबन घेतलें.

"दमन, दमन !" एवढेच शब्द तिच्या मुखांतून अस्पष्टपणें बाहेर पडले.

दमननें तिला दृढ आलिंगन देऊन हृदयाशीं धरलें. त्याच्या पाठीशीं पाण्याची लाट फुटल्यामूळें एकदम दोघांच्याही अंगावर पाण्याचे तुषार उसळले.

"खरंच, मला अशा परिस्थितींत मरण येईल का ?" कमला भावनातिरेकानें व्याकूळ स्वरांत म्हणाली.

"कमल, पण मरण टळल्यामुळंच तर ही सुंदर परिस्थिती निर्माण झाली." दमन स्निग्धपणें पहात हंसत उत्तरला.

समुद्र अधिक जोरानें उचंबळत होता. आकाशांत द्रुत गतीनें चंद्रमाही आपला मार्ग आक्रमित होता. अजूनपर्यंत मंद वहाणाऱ्या वाऱ्यानेंही नकळतच आपला जोर वाढविला होता. दोघांच्या हृदयांतही

भावना उचंबळून आल्यामुळें होणारी हृदयाची धडधड परस्परांना स्पष्ट जाणवत होती.

दमननें सभोंवार पाहिलें. कांहीं अंतरावर एक आंग्ल युवक-युवती जलक्रीडा करीत होतीं. दमनच्या मानेला घट्ट मिठी घालून त्याच्या रुंद छातीवर मस्तक ठेवून कमला स्तब्ध होती. कांहीं वेळानें पुन्हां तिच्या गालाचें चुंबन घेऊन दमन किनाऱ्याकडे चालूं लागला.

पाण्यांतून बाहेर येतांच त्यानें तिला खालीं ठेवली. किनाऱ्यावरील उपहारगृहांतून पाश्चिमात्य पद्धतीचें संगीत ऐकूं येत होतें. शीतल वाऱ्यामुळें ग्रीष्म ऋतु असूनही त्यांना थंडी लागत होती.

अनामिका, रजनिकांत व शशिधर वर येऊन बराच वेळ झाला होता. दमनला व कमलेला वर येतांना पाहून अनामिका पुढें होऊन मिस्किलपणें हंसत म्हणाली, " काय कमल, बराच वेळ पोहत होतां वाटतं ? "

" अग, मी आज बुडणारच होतें. " कमला तिचा प्रश्न न ऐकल्या-सारखें करून म्हणाली.

" बुडायचीच. कोणी तरी वांचविणारा आहे अशी खात्री असली म्हणजे मनुष्य हटकून बुडायचाच. "

" अना, तुझा खेळ होतो आहे पण माझा जीव जात होता. शिवाय रजनिकांतांना व तुला एकांत मिळावा हाच माझा हेतु होता आणि याच उदात्त हेतूनं मी माझे प्राण धोक्यांत घातले होते ! "

" तुझे प्राण ? " अनामिका चेष्टेनें उद्गारली.

कमलेनें तिचा गालगुच्चा घेतला.

इतक्यांत रजनिकान्त व शशिधर तेथें आल्यामुळें दोघांचा संवाद तेथेंच थांबला.

कांहीं वेळानें दमन कपडे बदलून राहुटीच्या बाहेर आला व शशि-धरच्या खांद्यावर हात ठेवून खालीं बसत म्हणाला, "काय शशी, आज तूं एवढा उत्साही दिसत नाहींस. खरंच, निसर्गाची रमणीयता एकलकोंडे-

पणानं माणसाला अधिकच कष्टदायक होते. आपल्या सुखदुःखाच्या भावनांत कुणी तरी भागिदार असावं असं मनुष्याला नेहमीं वाटत असतं."

"दमन, पुरे बाबा तुझं हें तत्वज्ञान." शशिधर म्हणाला, "जा, अजूनही थोडा वेळ पाण्यांत स्नान करून ये म्हणजे तुझं हें तत्वज्ञान ह्या समुद्रांत धुवून जाईल. अरे, उद्योगच नाहीं तुला दुसरा. म्हणून तुला ही बाष्कळ बडबड करायला सवड मिळते ! आम्हां डॉक्टरांच्या राज्यांत तुझ्यासारखे लोक एकदम होपलेस् ! असाच एकदां तुझ्यासारखा वेडा मी आमच्या ऑपरेशन् रूममध्यें नेला. ती केस होती डिलिव्हरीची. मुल अडलं होतं त्यामुळं त्या स्त्रीला भयंकर वेदना होत होत्या. ती सारखी ओरडत होती. त्या असह्य वेदनांमुळं तिला मूर्च्छा आली. ह्या गाढवाला तें पाहवलं नाहीं आणि एकदम उद्गारला, 'Alas ! How hatefully a man is born ! How our love is a shameless and disgusting passion !' सर्व विद्यार्थी मोठ्यानं हंसले. आमचे सर्जन एकदम भडकले व त्यांनीं त्याला हांकलून लावलं. नंतर 'सर्जिकल हॉलमधील शिस्त' या विषयावर एक लांबलचक व्याख्यान मला ऐकावं लागलं."

सर्व मंडळी ती कल्पित हकीगत ऐकून हसूं लागली. कांहीं वेळानें हसें ओसरल्यावर दमन म्हणाला, "खरोखर, हा एक चमत्कारिक विरोधाभासच आहे ! वैद्यकीय शास्त्राचं ध्येय काय तर मनुष्य प्राण्याच्या शारिरीक यातना कमी करायच्या आणि या ध्येयाकरितां धडपडणारे डॉक्टर लोक मात्र दृष्टीसमोर होणाऱ्या रोग्यांच्या यातना पाहून आपली शांती बिलकुल ढळूं देत नाहींत."

"दमन" शशिधर लगेच उत्तरला, "हा विरोधाभासच आहे. आम्ही वैद्यकीय शास्त्रांतील लोक उच्च ध्येयानंच वागत असतों. असं पहा, थंडीनं कुडकुडणाऱ्या व भुकेनं व्याकुळ झालेल्या भिकाऱ्याला सर्व लोक दानधर्म कां करतात याचा विचार कर म्हणजे तुला एकच उत्तर सांपडेल. त्या जीवाचे होणारे हाल पहावत नाहींत माणसाला... भिकाऱ्याच्या शोधार्थ मुद्दाम फिरणारा महात्मा तुला एखादाच मिळायचा. म्हणजे दानधर्माची क्रिया सहेतुक व स्वार्थी असते. पण आम्हांला हे प्रकार

लीलेनें पहावतात. तरीदेखील आम्ही ही यातना नष्ट करण्याची क्रिया करतों. यावरून आमचं कार्य निर्हेतुक व निःस्वार्थी नाहीं का ठरत? आम्ही अगदीं विव्हळत पडलेल्या स्त्रीच्या मृत्युशय्येजवळ बसून मिष्टान्नाची मेजवानी झोडूं. यावरून आमची परदुःख निवारण करण्याची क्रिया जास्त उदात्त नाहीं का होत?"

शशिधरच्या त्या विचारसरणीमुळें अनामिका आणि कमला क्षणभर गोंधळल्या व त्याचें म्हणणें बरोबर आहे असेंच त्यांना वाटलें.

पण दमन कांहींसा विचार करून हंसत म्हणाला, "शशी, तुझा हा तर्कवाद योग्य असेल. पण मला वाटतं कीं वैद्यकीय शास्त्रांतील लोकांच्या मनांत ह्या तत्वाची जाणीव असेल कीं नाहीं हा प्रश्न वादग्रस्त आहे. एकदां स्वीकारलेला व्यवसाय चालविलाच पाहिजे या व्यवहार-नीतीला अनुसरून तुम्ही लोक आपला धंदा चालवित असतां. त्यांत निर्हेतुक कार्य करण्याचं उदात्त ध्येय असतं असं म्हणण्यास मी तयार नाहीं. जसा गरीबांस दानधर्म करण्याकरितां त्यांच्या घरीं जाणारा उदार महात्मा विरळा, तसाच रोगग्रस्तांच्या यातना नाहींशा करण्याकरतां आपण होऊन त्याच्या रुग्णशय्येकडे जाणारा डॉक्टरही विरळाच. इतकंच नव्हे, तर दुसऱ्याच्या यातनांबद्दल निःशंक वृत्ति असल्यामुळें प्राप्तीची खात्री नसल्यास डॉक्टर आपलें कर्तव्य करण्यास दिरंगाई करील हें अगदीं संभवनीय आहे."

"दमन," शशिधर बारकाईनें पहात म्हणाला, "तुझ्या दृष्टींत दोष असावा असं दिसतं मला. उद्यां माझ्याबरोबर चल."

दमननें त्याच्या भाषणाचा रोख ओळखून तात्काल प्रत्युत्तर केलें, "पण शशी, माझी दृष्टी गेली तर एक वेळ चालेल; पण तुझ्याबरोबर येऊन माझं काळीज मात्र मी खास गमावणार नाहीं."

"अरे, पण तुझं हृदय आहे कुठं जाग्यावर? तें नेलंय् दुसऱ्यानंच आपल्याबरोबर!"

"आणि मी देखील त्याचा सूड घेतला आहे. त्या व्यक्तीचंही हृदय मी आणलंय् आपल्याबरोबर!"

त्या दोघांच्या उत्तराप्रत्युत्तराची चढाओढ अनामिका व कमला कौतुकानें ऐकत होत्या.

बाजूला बसून रजनिकांत समुद्राची शोभा पहाण्यांत गुंग झाला होता. कोणत्या रंगाच्या संमिश्रणानें हा आकाशभाग रंगवितां येईल, समुद्राच्या ह्या विस्तृत सौंदर्याचा आभास कसा आणतां येईल, इत्यादि कल्पनांत तो गुंग होऊन गेला होता. कोटीबाज बुद्धीची मजा लुटण्यापेक्षां समोरची निसर्गशोभा पहाण्यांतच तो तन्मय झाला होता. त्यांतच त्याला आनंद वाटत होता.

आकाशांत मेघांची एकमेकांशीं स्पर्धा चालली होती. आपल्या सौंदर्याला भ्रष्ट करूं पहाणाऱ्या त्या श्याम मेघांची झुंज लावून चंद्रमा दोघांच्याहि तावडींतून अचूक निसटून जात होता. एखाद्या असहाय्य रमणीला अफाट मैदानांत खलपुरुषांनीं चारी दिशानीं घेरल्यामुळें सद्गृहस्थांच्या मनाला वैषम्य वाटावें त्याप्रमाणेंच चंद्रिकेच्या मेघाच्छादित स्थितीकडे पाहून सहल करण्यास आलेले लोक विषण्ण होत होते. पण त्या संकटांतून क्षणार्धांत निसटल्यामुळें तिचें किती तरी कौतुक करावेंसें वाटत होतें.

"कां रजनिकान्त," दमननें त्याला हांक मारून म्हटलें, "खरे कलोपासक तुम्हांलाच म्हणतां येईल. चंद्राला तर मॉडेल करण्याचा आपला इरादा नाहींना? पण लक्षांत ठेवा ही चंद्रिका तुम्हाला कधींच सारखं सिटिंग् देणार नाहीं. एक क्षणभरसुद्धां ती स्थिर राहायची नाहीं. एक दिवस तुमच्या स्टूडिओंतून मुळींच हालायची नाहीं तर दुसऱ्या दिवशीं स्टूडिओच्या बाजूलाही ती फिरकायची नाहीं. एकाहि दिवशीं ती ठराविक वेळीं स्टूडिओंत यावयाची नाहीं. कधीं बिलकुल लज्जा न बाळगतां आपलं सारं सौंदर्य आविष्कृत करील तर कधीं काळ्याकुट्ट ढगांच्या पडद्यामागें दडून राहील. कितीही विनविलं तरी ती बाहेर यावयाची नाहीं."

"पण दमन, जरा दमानं घे." शशिधर मध्येंच म्हणाला, "तिच्यावर तुझा एवढा कटाक्ष कां? प्रतिभासंपन्न लोक वस्तूंच्या मागं कधींच लागत नसतात. ते नेहमींच अस्थिर वस्तूला स्थिर करण्याच्या प्रयत्नांत

असतात आणि म्हणूनच शेवटीं नैराश्यवादी बनतात. सौंदर्य कुठल्याच वस्तूच्या ठायीं स्थिर नसतं. पण प्रतिभाशाली लोक एखाद्या व्यक्तिमात्राच्या ठिकाणीं तें पूर्णपणें स्थिर आहे असं मानतात व मग अल्पावधींतच तो आभास होता हें त्यांना कळून चुकतं आणि पुन्हां स्थिरावलेल्या सौंदर्याच्या मागं ते लागतात. निराशा झाली म्हणजे जीविताला दोष देतात. सुंदर भावनांचंही असंच आहे. एकाच मधुर भावनेचा आस्वाद मनुष्याला एकसारखा मिळत नसतो आणि यामुळंच तो दुःखी होत असतो. प्रेम हीदेखील एक भावनाच आहे आणि तिचा आवेग अखंड कसा टिकणार? वेडगळपणानं बऱ्याच गोष्टी मनाशीं कल्पून त्यांवर सुंदर मनोराज्यं उभारावीं आणि सत्यानं हे डोलारे कोसळून टाकले म्हणजे माणसानं वैतागून जगाला दोष द्यावा किंवा आत्मघात करून घ्यावा यांत काय अर्थ आहे?"

शशिधरचें हें भाषण कांहींसें गंभीर झालें, यामुळें सर्व मंडळी विचारमग्न झाली होती. पण रजनिकान्त एकदम म्हणाला, "शशिधर, मनुष्य सुंदर सत्य सोडून मनोराज्याच्या हवेल्या उठवीत नसतो; पण ज्या वेळीं सत्य अगदीं असंत्य, हिडीस स्वरूपाचं असतं त्या वेळीं तो सुंदर कल्पनांचा बगीचा बांधून घटकाभर तरी आपला शीण घालविण्याचा प्रयत्न करतो. आपलंच पहा ना! जीविताची असत्य भाषा विसरावी म्हणूनच ना आपण इथं जमलों आहोंत? उद्यां आहेच, त्यांचे कॉलेज-अभ्यास, माझी चित्रशाळा आणि तुमची हॉस्पिटलमध्यें रात्रपाळी!"

"पण रजनिकान्त," अनामिका म्हणाली "एकदां सत्याचं सत्यत्व पटल्यावर तें असह्य कां व्हावं? सत्याला सौंदर्याची जोड दिली म्हणजे झालं! जीवन हा एक लढा आहे हें मान्य केल्यावर मग त्या लढ्यांत मारू किंवा मरूं ह्या वीरानंदानें तो लढवणं योग्य नाहीं का?"

"ताईसाहेब," दमन हंसत उद्गारला, "सत्य आणि सौंदर्य यांची सांगड घालणं माणसाला नेहमीं शक्य आहे असं मला नाहीं वाटत. कांहीं प्रयत्नांत तो यशस्वी होत असेल; पण मनुष्य हा मनुष्य असेपर्यंत तो सर्वस्वी यशस्वी होईल हें शक्य दिसत नाहीं. इतकेंच नव्हे, तर निसर्ग-नियमही तसाच असावा, आणि म्हणूनच जगांत सत्याच्या कटुपणांतून

निसटण्याकरतां सुंदर निसर्गशोभा, चित्रकला, गायनकला, लेखन-कला इत्यादि कला निर्माण झाल्या आहेत."

"पुरे झालं बाई," कमला त्रासिक स्वरांत म्हणाली, "असं असेल तर हा वाद कशाला? कॉफी घेऊन त्या सुंदर चांदण्यांत चार फेऱ्या घालून जीवाला थोडासा आनंद घेऊं या. निसर्गशोभेंतला आनंद लुटायचा सोडून हें तात्विक चर्वितचर्वण करण्यांत काय अर्थ आहे?"

"वा बाईसाहेब," शशिधर हंसत म्हणाला, "अशीच स्वारीची कानउघाडणी करा. दमन, तुम्ही साम्यवादी लोक असेच कल्पनेच्या राज्यांत रहायचे. Yours is a fool's Paradise."

इतक्यांत कॉफी तयार झाल्यामुळें सर्व मंडळी राहुटींत गेली. थोड्याच वेळांत कॉफीपान करून सर्व मंडळी पुन्हा बाहेर आली. त्या अवर्णनीय शोभेमुळें सर्वांच्या मनोवृत्ति अगदीं प्रफुल्लित झाल्या होत्या.

"खरंच किती किती बरं वाटतं इथं!" कमला उल्हसित होऊन म्हणाली, "पुढल्या रविवारीं आपण पुन्हा येऊं या."

"पण दमन, पुढल्या रविवारीं आमच्या कॉलेजची व तुमची शिल्ड मॅच फायनल आहे ना?" शशिधरनें प्रश्न केला.

"हो. उद्यांपासून प्रॅक्टिसला जोरांत सुरवात केली पाहिजे."

"अगदीं सेंचरी पुरी केल्याशिवाय मागं यायचं नाहीं हं." कमला लडिवाळपणें म्हणाली,

"तुमच्यासारख्या विद्यार्थिनी शामियान्यांत असल्या कीं त्याला आपोआपच बळ येईल." शशिधर मिस्किलपणें हंसत म्हणाला, "पण दमन, आमचा विकेटकिपर आपल्या ग्लव्हमध्यें क्लोरोफॉर्म ठेवणार आहे, त्यामुळं तुमच्या खेळगड्यांना गुंगी येईल आणि ते सर्व चीत होतील."

"मग आम्ही आमच्या पाकिटांतील आरशांनीं तुमच्या खेळाडूंवर घातक किरण फेंकण्यास सुरवात करूं." कमला हंसत उत्तरली.

"खरंच, एवढ्यासाठींच मला ह्या सामन्याचा कंटाळा येऊं लागला आहे. क्रिकेटला अगदीं युद्धाचं स्वरूप प्राप्त होतं. किती मत्सर,

किती वृथा अभिमान तिथं दिसतो ! ह्या चढाओढींत फायद्यापेक्षां तोटाच जास्त होत असावा असं मला वाटतं."

"आतां घरीं जाऊं या ना ?" अनामिकेनें हातांतील घड्याळाकडे पहात म्हटलें, "दहाचा सुमार झाला. घरीं आई वाट पहात असेल."

"मी सांगूनच आलें आहे कीं आज रात्रीं मी तुझ्याकडेच रहाणार म्हणून. मीं जुहूला जाणार हें बाबांना समजलं असतं तर जाऊंच दिलं नसतं." कमला म्हणाली.

"तुझ्या वडिलांना मी अनामिकेचा भाऊ हें समजलं तर तुला आमचं घर वर्ज्य होईल. साम्यवादी लोकांना ते धर्मबुडवे, समाजघातक असंच मानतात."

"उगाच कांहीं तरी" कमला कांहींशा रागानें म्हणाली, "बाबांचं वाचन फार मोठं आहे, आणि त्यांची सर्वच मतं मला मान्य आहेत असं कुठं आहे ?"

"असं मी म्हणत नाहीं—" एवढें म्हणून दमन अडखळला.

"चला मागं फिरूं या. दहाला दहाच मिनिटं आहेत. उशीर झाला तर आई आणखी काळजी करीत राहील." अनामिका पुन्हां म्हणाली.

"आणि तूं आईची काळजी कर. मायलेकी दोन्ही सारख्याच स्वभावाच्या." दमन हंसत उत्तरला.

हॉटेलचें बिल चुकतें करून व सामान घेऊन सर्व मंडळी रस्त्यावर आली.

चंद्र ढगाआड जात होता. माडाचीं झापें उन्मादानें सळसळ आवाज करीत हेलकावे घेत होतीं. प्रत्येक हॉटेलांतून वाद्याचे मधुर स्वर ऐकूं येत होते व तरुणतरुणी आनंदानें नर्तन करीत होत्या. अजूनही त्या किनाऱ्यावर एखादी मोटार येत होती.

सर्व मंडळी एका टॅक्सींत बसतांच दमन म्हणाला, "प्रथम एन्. जी. हॉस्पिटल. First we drop the doctor down. शशी, तुझी आतां रात्रपाळी आहे का रे ?"

" हो, माझी तेवढी एकच कॉट सांभाळायची. कधीं एकदां जाऊन बिछान्यावर अंग टाकतों असं झालं आहे मला."

" अच्छा, सर्व मंडळी गाडींत चढली ना ? कुणाला विसरलो नाहीं ? " दमननें प्रश्न केला.

" नाहीं, चलो."

" जी साब."

टॅक्सी चालू झाली. मोठ्या रस्त्यानें चांदण्याच्या शोभेंत मोटार भरधांव सुटली होती.





रजनिकान्त आपल्या स्टूडियोंत आज एकटाच काम करीत होता. समोर उभ्या असलेल्या स्त्रीची प्रतिमा तो चित्रफलाकावर रंगवित होता. त्या चित्रांतील तरुणी एका गुलाबाच्या झाडाजवळ उभी होती. त्या झाडावरील एका सुंदर फुलाच्या पाकळ्या खालीं गळून पडत होत्या आणि जवळच्या दुसऱ्या एका फुलावर बसून एक भ्रमर मधुपान करीत होता. ती स्त्री निःशंकपणें अर्धनग्नस्थितींत त्या फुलाकडे सहानुभूतीनें पहात होती. प्रियकरानें आपली फसवणूक केल्यामुळें ती जणुं दुःखानें अश्रु गाळीत आहे असाच त्या चित्रांतील भाव होता. रजनिकान्त तल्लीन होऊन चित्रांतील स्त्रीचें मुख रंगवित होता. समोर उभ्या असलेल्या त्या स्त्रीकडे एक वेळ पाहून आपल्या चित्रावर रंगाचा कुंचला तो फिरवित होता. त्या चित्रांतील स्त्रीच्या चेहऱ्यावर परित्यक्तेच्या दुःखाची व भीतीची छाया स्पष्ट दिसत होती. तिच्या दृष्टींत मार्दव व व्याकुलता उत्पन्न करण्याकरतां समोर असलेल्या स्त्रीच्या डोळ्यांकडे सूक्ष्मपणें पाहून तो चित्रांत रंग भरीत असतां दारावरील घंटा वाजली.

आपल्या तन्मयतेचा भंग झाल्यामुळें कांहींसा चिडून रजनिकान्त दार उघडण्यासाठीं पलीकडल्या दालनांत गेला. इतक्यांत हळुहळूं बटन दाबून घंटा वाजविण्याची परिचित पद्धति ओळखतांच त्याच्या चेहऱ्यावर हास्य झळकलें. चटकन् पुढें होऊन त्यानें दार उघडलें व तो हंसत म्हणाला, "ओहो ! या तुम्ही, सुस्वागतम्."

"किती सभ्य शिष्टाचार !" अनामिका दारांतच उभी राहून म्हणाली, "घंटा वाजतांच स्वारीच्या कपाळाला पडलेल्या आंठ्या मी किल्लीच्या छिद्रांतून पाहिल्या. मला वाटतं मी आपला प्रतिभाभंग तर केला नाहीं ना ?"

" छे; मुळींच नाहीं, " रजनिकान्तानें उत्तर केलें, " इतका वेळ वाट पाहून आत्तांच तर प्रतिभा आली. "

" इश्श, कलावंत इतके फसवे असतात हें मला माहीत नव्हतं बाई. " अनामिका मधुर हास्य करीत म्हणाली.

" हे वृत्तपत्राचे बातमीदार एकसारखे त्रास देत असतात. पॅरिसला उघडणाऱ्या आन्तर्राष्ट्रीय चित्रकलाप्रदर्शनांत मी भाग घेणार आहे हें समजल्यापासून ते लोक मला सतावून सोडतात. वाटेल त्या वेळीं येतात. वाटेल ते असंबद्ध प्रश्न विचारतात आणि जर कदाचित् मुलाखत दिली नाहीं तर वर्तमानपत्राची पेटती मशाल त्यांच्या हातांत आहेच. "

" पण रजनिकान्त, ह्या जगांत आपला नगारा आपणच वाजविल्याशिवाय गत्यंतर नाहीं. हें युग जाहिरातीचं आहे. रानांत बसून अध्ययन करणाऱ्या खऱ्या तत्त्ववेत्त्याला अगर कलावंताला या जगांत बिलकुल महत्त्व नाहीं. रस्त्याच्या कोनाकोनांवर उभे राहून मोठमोठ्यानं शिव्या देणाऱ्या वक्त्यालाच आधुनिक जगांत पुढारीपण मिळत असतं. "

" पण तीसुद्धां एक कलाच आहे. आणि चित्रकला जरी मला कांहींशी साध्य झाली असली तरी ही कला कांहीं मला जमत नाहीं. "

" अभ्यासानं सर्व कांहीं जमतं. " असें म्हणत अनामिका आंत गेली.

दिवाणखान्यांत ठिकठिकाणीं लावलेल्या चित्रांच्या तसबिरी पहात ती पुढें जात होती. मधूनच ती एखाद्या चित्रासमोर उभी राहून एकाग्रतेनें त्याच्याकडे पाहून चित्राबद्दल आपला अभिप्राय व्यक्त करीत होती. पण तिचें लक्ष चित्राकडे वेधलें आहे हें जाणून रजनिकान्त कुतूहलानं सारखा तिच्या सौंदर्याकडे पहात होता.

अनामिकेचें सौंदर्य आज विशेष मोहक दिसत होतें. दाट मोतिया रंगाची रेशमी साडी नेसून त्याच रंगाचा ब्लाऊज तिनें घातला होता. त्या साडीची जेकर्ड किनार व पदर फारच उठावदार दिसत होता. तिचे गोंडस बाहु उघडेच होते. हाताखालून पदर घेऊन तो कंबरेजवळ ओढून धरल्यामुळें तिचं वक्षःस्थल अधिकच उभट दिसत होतें. तिच्या गळ्यांत बारीक मण्याची माळ रुळत होती. तिच्या किंचित् वर्तुलाकार भालप्रदेशा-

वर कुंकुमतिलक शोभून दिसत होता. रेंखीव नाकाच्या अग्रभागीं लालीची अस्पष्ट छटा दिसत होती. धनुष्याकृति भुवयांच्या सान्निध्यांत तिच्या निळसर नेत्रांत एक प्रकारचें खेळकर तेज विलसत होतें. मधुर स्मित करतांना अंधार किंचित् पुढें येऊन स्वच्छ स्फटिकाप्रमाणें तिची दंतपंक्ति नजरेंत भरत होती.

रजनिकान्त त्या शरीरसौष्ठवाकडे सारखा कुतूहलानें पहात राहिला होता. तो आपल्या सौंदर्याकडे पहाण्यांत तन्मय झाला, याची जाणीव अनामिकेला झाली तरी तिनें तसें बिलकुल दाखविलें नाहीं. त्याच्याकडे न पहातांच ती चित्रांविषयीं प्रश्न करीत होती. आपल्या चेहऱ्यावर अगर वक्षःस्थलावर त्याची दृष्टि स्थिरावत आहे हें जाणूनही तिनें लज्जा व्यक्त केली नाहीं किंवा आपला कांहींसा खालीं आलेला पदरही सांवरून घेतला नाहीं. आपल्या प्रियकराला आपलें सौंदर्य मोहीत करीत आहे हें पाहून तिला अभिमान वाटला.

रजनिकान्ताच्या अंगांत पांढरा झगा होता. त्याच्यावर जिकडे-तिकडे रंगाचे डाग पडलेले होते. हातांतील रंगफलकावरही सुंदर रंगाचें संमिश्रण दिसत होतें.

'गवयांची मुलं सुरावरच रडतात." अनामिका हंसत म्हणाली, "तसंच ह्या सर्व कलावंतांचं आहे. कुठलीही गोष्ट त्यांनीं केली तरी त्यांत कलाभिरुची दिसायचीच. हे या झग्यावर पडलेले डाग किती शोभिवंत दिसताहेत. तसंच त्या पॅलेटवरदेखील जसं कांहीं एखादं चित्रच रंगविलं आहे. पण आतां कसलं काम चाललं होतं?"

"ये आंत." असें म्हणून रजनिकान्त पलीकडल्या दालनांत गेला. अनामिकाही त्याच्या मागोमाग आंत गेली.

"हें पहा." असें म्हणून रजनिकान्त चित्रफलकाच्या घोड्यासमोर उभा राहिला. त्यानें पुन्हां मॉडेल स्त्रीला हांक मारून विशिष्ट पद्धतीनें उभें रहाण्यास सांगितलें व तो चित्रांतील भाव अनामिकेला सांगूं लागला.

चित्र बहुतेक पुरें झालें होतें. डोळ्यांतील किरणबिंदूकरतां आकाशी रंगाचे दोन टिपके ठेवतांच त्या चित्राला एकदम जिवंतपणा आला. अगदीं

क्षुल्लक वाटणाऱ्या ह्या कृतीमुळें चित्रांत एकदम किती बदल झाला हें पाहून अनामिकेला त्याच्या कौशल्याबद्दल कौतुक वाटलें. ती त्याच्या हातांतील कुंचल्याकडे पहात होती.

रजनिकान्त पुन्हां एकाग्रतेनें चित्राचें काम करूं लागला. कांहीं वेळानें चित्रांतील स्त्रीचा स्तनभाग रंगवितांना अनामिका आपल्या शेजारीं आहे हें विसरून आपले विद्यार्थीच बाजूला आहेत अशा समजुतीनें तो बोलण्याकरतां मागें वळला. अनामिकेला पहातांच आलेले शब्द तोंडांतच राहिले. तिचाही चेहरा लाजेनें आरक्त झाला. तिनें आपले विकार दड-विण्याचा व्यर्थ प्रयत्न चालविला होता. रजनिकान्ताच्याही हातांतील रंगाचा कुंचला सफाईदार चालेना. शेवटीं त्यानें थोड्याच अवधींत त्या मॉडेलस्त्रीला दुसऱ्या दिवशीं येण्यास सांगून काम बंद केलें व निमूटपणें तो रंगाचें साहित्य एकत्र करूं लागला. कुंचले पुसून त्यानें तेलाच्या ग्लासांत टाकले व अंगांत चढविलेल्या झग्याचे बंद तो सोडूं लागला.

"रजनिकान्त," अनामिकेनें एकदम विचारलें, "हेंच चित्र आपण पॅरिसच्या प्रदर्शनांत पाठविणार आहांत का?"

"हो, तसा विचार होता; पण काम एवढंसं चांगलं झालं नाहीं. शिवाय याहूनही अधिक मनोहर कल्पना सुचल्यामुळं हें चित्र रंगवितांना उत्साहही वाटेनासा झाला आहे. अनाम, तुझ्या—" एवढें बोलून तो क्षणभर गोंधळला. अनामिका व्हीनसच्या पुतळ्यावर हात ठेवून रजनिकान्ताकडे स्निग्ध दृष्टीनें पहात होती. त्यानें तिचा डावा हात आपल्या हातांत घेतला व जवळ जाऊन हातानें तिची हनुवटी वर करून तो म्हणाला, "अनाम, तुझ्यासारखी लावण्यवती तरुणी मला कांहीं सिटिंग्स् देईल तर एक अत्यंत प्रतिभासंपन्न चित्रकार म्हणून माझी कीर्ति सर्व जगभर पसरेल व पौर्वात्य सौंदर्य म्हणून तुझ्याही सुंदर चित्राची ख्याति अनेक वर्षें गाजत राहील. अनाम, त्या वेळीं साऱ्या जगाला आपण एक भूषणावह कृति दिली म्हणून आम्हाला केवढा आनंद वाटेल!"

रजनिकान्तानें तिला आपल्या बाहूमध्यें कवटाळलें व तिच्या अधरांचें चुंबन घेतलें. अनामिकेला आपल्या अंगांत कोठल्या तरी विद्युत्

शक्तीनें प्रवेश केल्याप्रमाणें वाटून तिचें हृदय जोरानें धडधडूं लागलें. रजनिकान्तानें तिच्या पाठीवर हातानें गोंजारून म्हटलें, "अनाम, तूं किती सुंदर आहेस! खरोखरच तूं एक विलक्षण मोहिनी आहेस."

त्यानें तिला घट्ट हृदयाशीं धरलें. अनामिकेनेंही आपलें मस्तक त्याच्या छातीवर ठेवलें होतें. तिच्या केसांचें चुंबन घेऊन तिचा चेहरा वर करीत तो म्हणाला, "अनाम, माझ्याकडे पहा."

तिनें अर्धोन्मीलित नेत्रांनीं त्याच्याकडे दृष्टी फिरविली. तिच्या डोळ्यांतून दोन अश्रूंचे ओघळ खालीं आले. रजनिकान्त तिच्या भाल-प्रदेशाचें चुंबन घेऊन म्हणाला, "अनाम, तुझ्यावर माझ्या लौकिकाची जबाबदारी आहे. साऱ्या पाश्चिमात्य राष्ट्रांतील नामांकित चित्रकार आपल्याकडे मत्सरानं पहातील."

इतक्यांत दारावर घंटा झाली. रजनिकान्तापासून बाजूला सरकून अनामिकेनें आपला पदर सांवरला. बाहेर जाऊन त्यानें पोस्टमनकडून पत्र घेतलें व पुन्हां तो लगबगीनें आंत आला.

"अनाम, चल आजच त्या कार्याला सुरवात करूं. मला आज किती उत्साह वाटत आहे!" असें म्हणून त्यानें जवळच असलेल्या कपा-टांतून तैलचित्रासाठीं एक मोठा पडदा काढला व तो समोरच्या घोड्यावर ठेवीत म्हणाला, "हं, आतां संकोच कसला? माझ्यावर तुझा विश्वास आहे ना? 'तुमच्या कीर्तीसाठीं वाटेल तें करीन' असं जुहूच्या किनाऱ्यावर दिलेलं वचन तूं विसरलीस का? अनाम, माझ्यावर तुझं प्रेम आहे ना?"

"रजनिकान्त," अनामिका भेदरल्याप्रमाणें पहात आर्त स्वरांत म्हणाली, "रजनिकान्त, उद्यां विचार—"

"अनाम," एकदम तिचे हात पकडून तो म्हणाला, "आतां विचार कसला करतेस? मला आज अतिशय स्फूर्ति वाटत आहे. उद्यां हाच उत्साह वाटेल कशावरून? चल, असं काय करतेस?"

रजनिकान्तानें तिची उभी राहण्याची जागा व्यवस्थित केली. पार्श्व-भूमीसाठीं त्यानें मागें आकाशी रंगाचा पडदा लाविला. अनामिकेच्या मनाची अत्यंत चलबिचल चालली होती. रजनिकान्ताच्या लौकिकाला

आपण हातभार लावणं हें आपलें श्रेष्ठ कर्तव्य आहे असें तिला एक वेळ वाटावें तोंच सर्व जगापुढें आपल्या सौंदर्याचें खुलें प्रदर्शन करायचें ही असह्य कल्पना येतांच तिला कसेंसेंच वाटावें. कल्पनाशक्तीच्या गाडींत बसून तीव्र वेगानें जातांना हजारों प्रकारचीं भवितव्याचीं चित्रें तिच्या डोळ्यासमोर चमकून जात होतीं. दृष्टीसमोर दिसणारे देखावे एखाद्या प्रसंगीं बोगद्याप्रमाणें भयाण वाटावे तर कांहीं प्रसंगीं ते डोंगरमाथ्यावरून दिसणाऱ्या शोभेप्रमाणें सुखदायक वाटावे. पण प्रत्येक विचार क्षणमात्रच चमकून जात होता. आपण दमनदादाचें मत विचारावें, आईलाही ही गोष्ट सांगावी असें तिला वाटलें. पण त्यांनीं नकार दिला तर मनांत असूनही रजनिकान्ताच्या कर्तबगारीला मदत करणें अशक्य होईल. याप्रमाणें विचाराचें चक्र तिच्या मनांत फिरत होतें.

रजनिकान्त मात्र तिची संमति आहे असें समजून चित्रासाठीं तयारी करीत होता. ती खात्रीनें आपल्या विनंतीला नकार देणार नाहीं असा विश्वास त्याला वाटत होता. त्यानें वरील प्रकाशद्वार उघडलें व एका बाजूच्या बहुतेक सर्व खिडक्या बंद करून दुसऱ्याच बाजूनें प्रकाशाचा झोत यावा अशी त्यानें योजना केली. पण अजूनही अनामिकेच्या चेहऱ्यावर निश्चयाची मुद्रा दिसेना. तरीदेखील त्याचें महत्त्व त्याला वाटलें नाहीं. रजनिकान्तानें भिंतीला असलेलें कपाट उघडलें व आंतील काळा झगा काढून त्यानें पडद्याच्या चौकडीवर टाकला.

रजनिकान्तानें चालविलेली तयारी ती डोळ्यांनीं पहात होती. काय करावें हें तिला सुचेना. कांहीं तरी एक निश्चय आपणास केला पाहिजे असें तिला वाटत होतें. तसा तिचा प्रयत्नहि चालू होता. पण मनाची ओढाताण कांहीं केल्या कमी होईना. रजनिकान्ताच्या चेहऱ्याकडे पहाण्याचें धैर्य तिला होईना. उंच भागावरून खोल पाण्यांत उडी घेण्याचें धाडस करतांना मनुष्याच्या मनाची होणारी कालवाकालव तिच्या मनाला या वेळीं जाणवत होती. आपल्या आईला, दादाला व इतर आप्तेष्टांना आपल्या त्या विवस्त्र चित्राकडे पाहून काय वाटेल, कॉलेजांतील विद्यार्थी काय म्हणतील, अशा विचारांनीं तिचें हृदय धडधडूं लागलें.

"अनाम," रजनिकान्तानें स्निग्ध पण निश्चयी स्वरांत हांक मारली, "आतां वेळ कशाला दवडायचा? Please, hurry up."

"पण रजनिकान्त, माझी एक विनंती आहे ती मान्य कराल का?" तिनें काकुळतीनें प्रश्न केला.

"अगदीं अलबत."

"माझं चित्र हिंदुस्थानांत कुठंच प्रदर्शनांत ठेवायचं नाहीं."

"अनाम, मी तें चित्र पॅरिसलाच पाठविणार आहे आणि माझी अगदीं पक्की खात्री आहे, कीं तें चित्र फ्रान्समधील एखादा धनाढ्य उमराव आपल्या राजवाड्यांत लावण्याकरितां किती तरी पैसे देऊन विकत घेईल. तूं त्याची बिलकुल काळजी करूं नकोस. हं चल आतां."

या त्याच्या भाषणामुळें अनामिकेच्या मनावरचें ओझें हलकें झालें. पडद्यामागें जाऊन तिनें झपझप आपल्या अंगावरील दागिने काढले. अंगावरील वस्त्रें बाजूला करतांना तिला कांहीं वेळ संकोच वाटला. एक वेळ सभोंवार पाहून तिनें डोळे मिटले व स्वतःला विवस्त्र करून तिनें पुन्हां आपले नेत्र उघडले. खालीं मान करून आपल्या शरीराकडे पहातांना सौंदर्याबद्दल तिला अभिमान न वाटतां एकदम भीतीनें तिचें हृदय जोरानें धडधडूं लागलें. पुन्हां साडी नेसून आपण येथून पळून जावें असाही विचार तिच्या मनांत येऊन गेला. रजनिकान्ताच्या हातांतील रंगाचा कुंचला आपल्या शरीराच्या अवयवांवरून फिरत आहे असें वाटून तिचें अंग रोमांचित झालें होतें. ती अगदीं भेदरून गेली होती. उजव्या हाताच्या पंजानें डावा बाहू गच्च पकडून तिनें आपला उरोभाग झांकला होता व तिचा डावा हात उजव्या मांडीजवळ आला होता. आपला पाय किंचित् दुमडून ती स्वाभाविकपणें उभी राहिली होती. तिची हस्तिदन्ताप्रमाणें दिसणारी निर्मल अंगकान्ती, बारीक कम्बर, प्रमाणबद्ध स्तन आणि नितंब व सुंदर बांधेसूद शरीरयष्टी यामुळें एखाद्या प्रतिभासंपन्न शिल्पकारानें केलेला तो अप्रतिम पुतळाच असावा असें दिसत होतें.

रजनिकान्तानें चित्राला प्रारंभ करण्यासाठीं सर्व तयारी केली व चित्रफलकाजवळ उभा राहून त्यानें पडद्याकडे पाहिलें तों अजूनही चौकटीवरील झगा तेथेंच होता.

" अनाम, प्लीज्. प्रकाश कमी होत आहे. चल लवकर." रजनिकान्ताच्या आवाजांत अनामिकेच्या मनावर हुकूम चालविण्याची शक्ती होती. तिनें एकदम मनाचा निश्चय केला. विचाराला मनांत ठाणें द्यावयाचें नाहीं. विचार! विचार तरी किती वेळ करीत रहावयाचें? विचारांत घुटमळत आपण राहिलों तर कांहींच कार्यभाग व्हावयाचा नाहीं असें तिला वाटलें. लगेच अंगाभोंवतीं झगा गुंडाळला व ती पडद्याबाहेर आली.

" That's good! Darling. " असें म्हणून रजनिकान्त पुढें झाला, पण अनामिका आपोआपच दोन पावलें मागें सरकली.

रजनिकान्तानें अगदीं स्वाभाविकपणें कसें उभें राहावयाचें हें तिला दाखविलें व तो पुन्हां चित्रफलकापाशीं उभा राहिला. अनामिका त्या आसनावर उभी राहिली व एक वेळ गच्च डोळे मिटून तिनें आपला झगा खालीं पडूं दिला. पुन्हां तिनें डोळे उघडले व त्याच्याकडे पाहिलें; पण त्याच्या चेहऱ्यावर तिला कांहींच विकार दिसला नाहीं, किंवा दृष्टींत चंचलताहि दिसली नाहीं. तिनें समोर असलेल्या एका चित्रावर आपली नजर स्थिर केली.

रजनिकान्तानें हातांतील कोळशाच्या कांडीनें तिच्या आकृतिची बहिर्रेषा काढून घेतली. थोड्याच अवधींत अनामिकेची उभें राहण्याची ढब अगदीं स्वाभाविक वाटूं लागली. रजनिकांत मधून मधून तिच्याकडे निर्विकार दृष्टीनें पाहून आकृति निश्चित करीत होता.

थोड्याच वेळांत त्यानें आकृति पुरी करून घेतली व पॅलेटवर रंग घेत तो म्हणाला, " आपण आजचं काम लवकरच संपवूं अनाम. ह्या चित्रानंतर जगांतील माझ्या कार्याची पूर्तता झाली अशा अभिमानानें मी निवृत्त होईन. अनाम, तुझ्या सौंदर्यालाही चिरस्थान प्राप्त होईल. Oh Darling, we will be so happy then ! "

हृदयांत उत्पन्न होणाऱ्या आनंदलहरीमुळें त्याचे शब्दसुद्धां कंप पावून बाहेर पडत होते. अनामिका आपल्या प्रियकराच्या कीर्तीसाठीं स्वाभाविक लज्जेमुळें उत्पन्न होणारी कृत्रिमता नाहींशी व्हावी म्हणून मधुर कल्पनांत आपलें मन गुंतवून ठेवीत होती.

बराच वेळ निश्चल उभें राहिल्यामुळें ती शेवटीं नाइलाजानें म्हणाली, "आतां लवकर आटपा गडे. मी अगदीं थकून गेलें."

"हो, झालंच अनाम, अगदीं थोडा वेळ." रजनिकान्त आर्जवानें म्हणाला. त्यानें पुन्हां रंगविण्यास सुरवात केली. तिच्या देहावर दिसणारे प्रकाश व छाया पाहून तो समोरच्या कॅनव्हासवर रंग भरीत होता. चित्राचें काम चालूं असतांना त्याचा हात कंप पावूं लागला. अनामिकेकडे पहातांना चित्रकाराची निर्विकार दृष्टि बदलून त्याच्या नजरेंत प्रियकराचा चोरटेपणा उत्पन्न झाला. एक वेळ अनामिकेची दृष्टी त्याच्याकडे वळली व त्याच्या चेहऱ्यावर उमटलेले मनोविकार पाहून ती एकदम लज्जित झाली. तिला स्थिरपणें उभें राहवेना.

रजनिकान्तानें हातांतील कुंचला व पॅलेट बाजूला ठेवलीं व तो अनामिकेच्या जवळ जाऊन म्हणाला, "माफ कर अनाम, शेवटीं कलावंत हा देखील मनुष्यच आहे."

"या वेळीं मला स्पर्श करूं नका." अनामिका एकदम मागें सरकून म्हणाली. तिचा चेहरा लाजेनें किंवा कदाचित् रागानें लाल झाला होता. केंसांतून गालावर घामाचे ओघळ येत होते. हातून एखादें निंद्य कर्म झाल्यानंतर मनुष्याचें मन त्याला खात असतें त्याप्रमाणें तिची स्थिती झाली होती. तिच्या चेहऱ्यावर खिन्नता दिसत होती. ती मान खालीं घालून स्तब्ध उभी होती.

"अनाम," रजनिकान्त प्रेमळपणें हांक मारून म्हणाला, "किती घाबरली आहेस तूं! आपल्या सौंदर्याच्या साह्यानें जगांत एखादी अप्रतिम प्रतिभासंपन्न कलाकृति निर्माण करताना वास्तविक मनुष्याला स्वाभिमान आणि सात्विक आनंद वाटावा, तें सोडून तूं समाजशिष्टांच्या पापी दृष्टीला आणि दुष्ट निंदेला घाबरतेस? अग, आजची नीति उद्यां टिकत नाहीं हें तूं पाहतेस, क्षणभंगुर आयुष्याचं खरं महत्त्व तूं चांगलंच ओळखतेस. असं असून तूं अजूनही जुन्या वेडगळ, भ्रामक नीतिकल्पना हृदयाशीं बाळगण्यास ना?"

" रजनिकांत, या वेळीं माझं मन बावरलं आहे. कदाचित् उद्यां मी सिटिंग् द्यायला तयार होणार नाहीं असं तुम्हांला वाटत असावं. खरंच माझं मन अजूनहि हेलकावे खात आहे. पण मी आपल्याला वचन देतें, कांहीं झालं तरी मी आपलं चित्र पुरं होऊं देईन."

रजनिकान्ताच्या चेहऱ्यावर हास्य झळकलें. तिला जवळ घेऊन तिच्याकडे प्रेमानें पहात प्रेमळपणें म्हणाला, " अनाम, किती थंडगार तुझं अंग झालं आहे! माझ्याकडे पहा जरा. वेडे, निसर्गानं दिलेलं सौंदर्य लपवून काय फायदा होणार? पडद्यामागं सुंदर स्त्रिया असल्या, निर्जन रानांत सुंदर वनश्री असली आणि पर्वतमाथ्यावर सुंदर फुलं फुललीं म्हणून जगाला त्याचा कांहीं उपयोग आहे का?"

" म्हणजे प्रत्येक स्त्रीपुरुषानं विवस्त्र असावं असंच म्हणाना?" अनामिका त्रस्त स्वरांत म्हणाली.

" असंच म्हटलं असतं," रजनिकान्त स्मित करीत म्हणाला, " पण जगाच्या बाजारांत स्वार्थ, कपट आणि दुष्टाचरण एवढं भरलं आहे कीं अलौकिक सौंदर्य सुरक्षित राहील कीं काय हा प्रश्नच आहे. आणि म्हणूनच दुष्ट लोकांपासून आपलं रक्षण व्हावं म्हणून स्त्रिया वस्त्रपरिधान करूं लागल्या व कांहीं पडदाही घेऊं लागल्या."

अनामिका कांहींच बोलली नाहीं.

" अनाम," तिचा हात आपल्या हातांत घेऊन तो पुढें म्हणाला, " साधारणतः मनुष्य गतानुगतिक असल्यामुळं आजही आपण वस्त्राच्छादनाचं स्तोम वाढविलं आहे. मनुष्यानं वस्त्राच्या साह्यानं आपलीं शारीरिक व्यंग दडवावीं, आपलं सौंदर्य अधिक आकर्षक करावं हें योग्यच आहे. पण वस्त्राछादनाला एवढं नैतिक महत्व देण्यांत काय अर्थ आहे? अज्ञाणी समाजाच्या अट्टहासाला महत्व देऊन आम्ही भौतिक सुधारणेचा मार्ग अडविल्याचं पाप नाहीं का पदरीं घेत?"

अनामिका विचार करीत स्तब्ध उभी होती. इतक्यांत घड्याळांत ठोके पडले.

" मला घरीं गेलं पाहिजे. दादाबरोबर आज मी व्याख्यानाला जाणार आहे. माझी तो वाट पहात असेल."

" हो बरी आठवण झाली. अनाम, तुला राग यावयाचा नाहीं ना? तुझ्या दादाला ह्या साम्यवादाचं वेड लागलं आहे. हा सोशिॲलिझम किती जरी उदात्त वाटला तरी कोणतीही विशिष्ट राजकीय आणि सामाजिक घटना उत्पन्न व्हायला समाजाची तयारी लागते. समाजाची बौद्धिक वाढ झाल्याशिवाय हा साम्यवाद हिंदुस्थानच्या पचनीं पडायचा नाहीं आणि हे चार दोन लोक मात्र मूर्ख ठरून आपल्या सर्वस्वाचा नाश करून घेणार आहेत."

" या बाबतींत तुम्ही दादाशीं चर्चा करा कधीं तरी." अनामिका हात सोडवून घेत म्हणाली.

" मला त्याच्याशीं बोलण्याचीच भीति वाटते. त्याला माझं म्हणणं पटतच नाहीं मुळीं. क्रान्ति घडवून आणतांना तिला पोषक अशी परिस्थिती, लोकमत वगैरे अनेक गोष्टींची आवश्यकता असते. या गोष्टींच्या अभावीं क्रान्ति अयशस्वी ठरते. कार्याचा उत्कर्ष होण्याऐवजीं कार्यशक्तीचा नाश मात्र होतो. शिवाय हा साम्यवाद म्हणजे शुद्ध जडवाद आहे. कलाभिरुची, पावित्र्य, नीति व धर्म ह्यांचं सर्वस्वीं उच्चाटन झालं पाहिजे हेंच त्याचं ध्येय. पदार्थविज्ञानशास्त्रावर ह्याचा एवढा विश्वास कीं मनुष्य हेंसुद्धां एक यंत्रच आहे असं ते समजतात."

" रजनिकान्त, असं कसं म्हणतां?" अनामिका कळकळीनें म्हणाली, " ह्या जगांत अगोदर पोटभर अन्न नाहीं, निजायला जागा नाहीं आणि थंडीवाऱ्यापासून रक्षण करण्यास धड वस्त्र नाहीं, अशा परिस्थितींत मनुष्याला कलाभिरुची आणि पावित्र्य शिकविण्याचा प्रयत्न कितीसा सफल होईल? प्राथमिक गरज भागवितां आली तर मग मानसिक उन्नतीचे मार्ग मनुष्याला शिकवितां येतील. भुकेनं व्याकुळ झालेल्या, थंडीनं कुडकुडणाऱ्या, रस्त्यावर पडणाऱ्या भिकाऱ्याच्या अन्तःकरणाची तळमळ आणि पोटांतली आग सुरेल संगीतानं शांत कशी होणार?"

" अनाम, किती पोकळ प्रयत्न आहे हा !" रजनिकान्त हंसत उत्तरला, " एखाद्यानं पायथ्याशीं असलेल्या गुहेंत शिरून डोक्यावरील खडकाला लकटून डोंगर उलथून टाकण्याचा प्रयत्न करावा त्याप्रमाणेंच जगांत समता उत्पन्न करून शांतता प्रस्थापित करण्याचा ह्या साम्यवादी लोकांचा प्रयत्न आहे."

" रजनिकान्त, " अनामिका कांहींशी त्वेषानें उत्तरली, " प्रत्येकाचा दृष्टिकोन निरनिराळा असतो. तुम्हाला जी गोष्ट असाध्य वाटते ती गोष्ट दादाला कष्टसाध्य वाटते. शिवाय अन्याय्य परिस्थिती दिसल्यानंतर ती आपल्या शक्तीबाहेर असली तरी तिकडे मनुष्यानं कानाडोळा करणं रास्त होईल असं मला नाहीं वाटत."

" आणखीही तुला एक गोष्ट मला सांगायची होती. हा साम्यवाद पुष्कळ लफंग्या लोकांना फायदेशीर झाला आहे. पोट भरायचं दुसरं कसलेंहि साधन नसलं,अथवा कष्ट करून पोटभर अन्न मिळविण्याचं सामर्थ्य नसलं म्हणजे वाटेल त्यानं साम्यवादी बनून दुसऱ्याच्या संपत्तीवर खुशाल समान हक्क सांगावा, साम्यवादाच्या जोरावर विवाहसंस्थेवर लाथा झाडाव्या, आणि आपल्या पापी कृत्यांत नीतिबाह्य असं कांहीं नाहीं असं उजळ माथ्यानं म्हणावं ! म्हणूनच साम्यवादी लोकांत पुष्कळ दुराचारी भरलेले असतात. अनाम, तूं ह्या लोकांच्या नादीं लागूं नकोस. एखाद्या वेळीं पश्चात्ताप करण्याची पाळी येईल !"

अनामिकेला उत्तरादाखल कांहीं बोलावें असें वाटेना. पुरुषदेखील संशयी आणि मत्सरी असतात असेंच ती मनाशीं म्हणाली.

कांहीं वेळानें रजनिकांत कोणी नोकर नसल्यामुळें चहा मागविण्याकरतां स्वतःच खालीं गेला. झगा फेंकून देऊन अनामिका आरशासमोर उभी राहिली. ती निःशंकपणें आपल्या सौंदर्याकडे मोठ्या अभिमानानें पहात होती. आपल्या सौंदर्याकडे जगाचे डोळे वेधले जाणार ह्या कल्पनेनें अल्पकाल तिच्या चेहऱ्यावर हास्य उमटलें. आपल्या हातानीं चटकन् उरोभाग झांकून तिनें मोठ्या डौलानें आरशांत पाहिलें व ती आनंदानें आपल्याशींच कांहींतरी पुटपुटली. झटकन् ती आपल्या चित्राजवळ उभी

राहिली. चित्र अपुरेंच होतें, यामुळें तिला कांहींच बोध झाल, नाहीं. उपहासानें हास्य करीत ती आपल्याशींच म्हणाली, "प्रत्येक कलाकृति निर्माण होतांना तिला अशाच हिडीस अवस्थेंतून जावं लागतं का?" सहजच तिला मनुष्यजन्माची आठवण झाली. रजनिकांताची मूर्ती डोळ्यासमोर उभी राहिली. त्या कलाकृतीप्रमाणें आपण दोघेंही सुंदर सजीव कृति निर्माण करूं अशी कल्पना तिच्या मनांत एकदम चमकली. तिचें हृदय भावनानीं उचंबळूं लागलें.

पुन्हां धांवत येऊन ती आरशासमोर उभी राहिली व आपले दोन्ही हात पसरून मान वर करून तिनें आकाशाकडे पाहिलें व गहिंवरून ती आपल्याशींच म्हणाली, "अहाहा! देवा, प्रेमांत केवढा अलोट आनंद आहे! रजनिकान्त, तूं अगदीं खट्याळ जादूगार आहेस."

तिच्या डोळयांतील दोन अश्रू गालावर वहात येऊन वक्षःस्थळावर पडले. इतक्यांत दारावरील घंटा वाजली. एकदम दचकून तिनें झगा उचलून अंगाभोंवतीं गुंडाळला व आपलें हे वेडेविचित्र हावभाव कोणी पाहिले तर नाहींत ना अशा भीतीनें तिनें सभोंवार दृष्टी फिरविली.

रजनिकान्त परत आला होता।





त्या दिवसाच्या भाषणानें दमनची योग्यता जरी मोठी ठरली होती तरी तो एक जहाल साम्यवादी क्रान्तिकारक म्हणून सर्व लोक त्याच्याकडे पाहूं लागले होते. सरकार लवकरच त्याला तुरुंगांत डांबल्याशिवाय रहाणार नाहीं, ही गोष्ट स्पष्ट दिसत होती. सर्वसाधारण समाजालाही त्याचीं मतें विघातक वाटलीं होतीं व हा तरुण धर्मबुडवा माथेफिरू आहे असाच साधारण लोकांचा समज झाला होता.

दमनचीं मतें दिवसेंदिवस जहाल होत आहेत ही गोष्ट शकुन्तलाबाईच्या लक्ष्यांत कधींच आली होती व यापुढें त्याला जास्त काल मुंबईत राहूं दिल्यास राजद्रोहाच्या आरोपाखालीं तो पुष्कळ वर्षें बंदिवासांत खितपत पडेल अशी त्यांना खात्री वाटूं लागली होती.

एके दिवशीं बोलतां बोलतां त्या म्हणाल्या, "दमन, तूं इंग्लंडला जा ह्या वर्षी. इथं तुझा चांगल्या रीतीनं अभ्यास होणार नाहीं."

"आई, मला आतां कुठंच जाऊं नये असं वाटूं लागलं आहे." तो खिन्नपणें म्हणाला, "हिंदुस्थान एवढंच माझं कार्यक्षेत्र असं जरी मी समजत नाहीं, तरी पण माझ्या कार्याला इथंच प्रारंभ झाला पाहिजे. सभोंवार होणारा अन्याय्य छळ मला अगदीं असह्य होतो आहे. सबंध जगाला जर भयंकर भूकंपाचा धक्का बसेल आणि तें बेचिराख होऊन जाईल तर किती किती चांगलें होईल असंही कधीं कधीं मला वाटतं. पण खरोखरीच देव म्हणून जर कोणी असला तर तो सैतानी वृत्तीचाच असावा असं वाटतं. पण इतक्या क्रूर स्वरूपांत देवाची कल्पना करण्यापेक्षां त्याचं अस्तित्वच नाकारणं अधिक श्रेयस्कर व अभिमानास्पद आहे. आई, मला असं वाटतं कीं मनुष्य हा हजारों वर्षांच्या उत्क्रान्तीनंतर अजून देखील भयंकर

क्रूर पशू आहे. बिचारे पशू विचारशक्तीच्या अभावामुळं विकारवश होऊन आपलं जीवित चालवित असतात. पण हा मानव पशू विचारशक्तीचा उपयोग करून आपल्या हीन कृतीला उजाळा आणित असतो. ह्याच्या सारखा हिंस्र प्राणी मिळायचाच नाहीं कुठं."

"दादा," अनामिका मध्येंच म्हणाली, "तुझ्या डोक्याचे स्क्रू तर ढिले नाहींत ना? तुझ्यासारखे माथेफिरू बैरागी जगाचं चित्र असलंच काळं भेसूर रंगविणार. उत्क्रान्तितत्त्वाप्रमाणं पशूपासून मनुष्य झाला आहे. अरे स्वार्थ कुणाला नाहीं? पण स्वार्थाचं महत्व दिवसें-दिवस कमी नाहीं का होत आहे? एका दिवसांत भूकंपानं सुंदर नगरीचं जसं ओसाड मैदान होतं तसं वैराण वाळवंटाचं सुंदर नंदनवनदेखील एका दिवसांतच व्हावं असं तुम्हांला वाटतं. पण जगांत इतर वादांप्रमाणं साम्यवादानंही सनदशीर मार्गानं गेलं पाहिजे. क्रान्तीशिवाय साम्यवाद नाहीं ही तुमची वेडगळ समजूत आहे."

"ताईसाहेब, झालं, बोलून का अजून आहे?" दमन गंभीरपणें हंसत म्हणाला, "आमच्या साम्यवादाकडं तिरस्कारानं किंवा उपहासानं पाहणाऱ्या लोकांबद्दल आम्हाला कींव येते. साम्यवाद हा एक शोध आहे आणि कोणताही शोध त्या त्या शास्त्रांत जशी क्रान्ति घडवून आणतो त्याप्रमाणं साम्यवादाबरोबर क्रान्तीही येणारच. मनुष्य हा समाजप्रिय आहे. तो समाजांतील प्रचलित संस्थाबद्दल आपलेपणा बाळगणार आणि रूढीनंच आपला मार्ग चोखाळणार. समता हीच मानवी उत्क्रान्तीतील शेवटची पायरी आहे असं मला वाटतं. खरंच ताई, मनुष्य एखाद्या आंधळ्याप्रमाणं रूढीच्या काठीनं आणि परंपरेच्या मार्गानं सुखाचा शोध करीत चालला आहे.पण सुखाच्या शिखरावर चढण्याऐवजीं तो दुःखाच्या खोल दरींत पडतो आहे. त्याला सारखा हालवून जागा केला पाहिजे."

"अरे वेड्या, तूं कांहीं आंधळा नाहींस. डोळे मिटून आपल्याभोंवतीं अंधार निर्माण केला आहेस. हा बघ सुखसूर्य सारखा तळपतो आहे."

"ताई, तुमचं सनदशीर कार्य पुरं होईपर्यंत पृथ्वी रसातळाला जाईल. हा मुंगीच्या पावलाचा मार्ग दुबळ्या लोकांकरतां आहे. तसं म्हणशील तर

आमची क्रान्ति तरी काय एक सनदशीर सुधारणेचा मार्गच आहे. आकुंचित मानवबुद्धि याला Revolution म्हणते, पण खरं म्हणशील तर It's a little spark in the vast furnace of Time molding society for civilisation."

"काय आत्मविश्वास!" अनामिका चेष्टेनें हंसत म्हणाली, "दादा, हा आत्मविश्वास कीं अहंकार? अरे राजशाहीविरुद्ध आम्ही ओरडलों व Aristocracy (शिष्टशाही) पसंत केली. तिच्याविरुद्धही आम्ही बंड पुकारलं आणि लोकशाहीवर खूष झालों. आतां लोकशाहीवरून साम्यवादावर घसरलों आहोंत. उद्यां त्यांतही पापं निर्माण होतील आणि तुम्ही नवीनच एक वाद निर्माण कराल आणि त्याला म्हणाल हा आमचा वितंडवाद. कांहीं काळानं वितंडवादाला कंटाळून पुन्हां याल राजशाहीवर अगर दंडुकेशाहीवर. खरोखरच हा साम्यवाद म्हणजे तरुणांची गुंडशाही आहे असंच मी म्हणतें."

"मतस्वातंत्र्य आहे तुला. बोल वाटेल तें बोल." दमन दुर्लक्ष केल्याप्रमाणें हास्य करीत म्हणाली, "आईच्या पुराणप्रिय दृष्टीखाली वाढलेली तूं मुलगी. उद्यां एखाद्या बावळट तरुणाशीं लग्न करशील. नवऱ्याबरोबर हंसत खिदळत राहशील. एक दोन मुलं झाली म्हणजे त्यांचें कोडकौतुक करण्यांत आयुष्य कंठशील! झालं, आयुष्य सुखासमाधानानं जावं हेंच तुमचं ध्येय! तुम्ही साम्यवादाच्या उदात्त वातावरणांत वावरायला अगदीं असमर्थ आहांत. ताई, माझ्याबरोबर एकदां फिरायला ये. जगांत चाललेला भांडवलशाहीचा जुलूम पहा. गोठ्याप्रमाणं असणारीं गरीबांचीं घरं पहा. गिरण्यांतून संध्याकाळीं बाहेर पडणाऱ्या मनुष्यांच्या हाडांचे सांपळे पहा. त्यांच्या पोरांचे हाल पहा आणि श्रीमंतांचे विलासी राजवाडे आणि चैनीचे मार्गही पहा. आणि मग मला सांग तुला काय वाटतं तें! मग आपण साम्यवादावर बोलूं. आमच्या प्रोफेसरचं एक वाक्य मला नेहमीं आठवतं. ते म्हणतात, I cannot waste a cake, when my neighbour is out of bread. ताईसाहेब, आपले पूर्वग्रह बाजूला सारून शुद्ध मनानं जगाचा विचार करा म्हणजे तुम्हाला हेंच दिसून येईल, कीं जगांतील प्रत्येक व्यवहार, प्रत्येक धार्मिक,

राजकीय आणि सामाजिक संस्था ही भांडवलशाहीच्या दुराग्रहाला कमी अधिक प्रमाणांत बळी पडलेली आहे."

बोलतां बोलतां दमनच्या आवाजांत गांभीर्य आणि कळकळ स्पष्ट जाणवूं लागली. तो प्रतिपादन करीत असलेलीं मतें अनामिकेला आकलन होत नव्हतीं असें नाहीं, किंबहुना आपणही त्याच्या मंडळांत सामील व्हावें असेंच तिला वाटत होतें, पण दिवसेंदिवस त्याची चढती कमान पाहून त्याच्याबद्दल तिला काळजी वाटूं लागली होती. तिनें मनाशीं निर्धार केला होता, कीं त्याच्याशीं नेहमीं वाद करून त्याचा अमर्याद उत्साह आटोक्यांत ठेवायचा व यामुळें शकुंतलाबाईंचाही तिला दुजोरा होता. त्या नेहमीं अनामिकेच्या बाजूनें बोलत असत.

शकुंतलाबाईंना दमनबद्दल अभिमान वाटत होता. त्यानें आपलीं मतें तडजोडीनें किंचित् नमविलीं तर कधीं ना कधीं हिंदुस्थानचा 'आंतर्राष्ट्रीय पुढारी' म्हणून त्याला साहजिकंच प्रसिद्धी व कार्यक्षेत्र मिळेल अशीहि त्यांना आशा वाटत होती. पण राजसत्तेविरुद्ध होणारीं त्याचीं जहाल जाहीर व्याख्यानें व त्यांचे ठळक मथळयाखालीं वर्तमानपत्रांतून येणारे मोठाले उतारे पाहून त्यांच्या हृदयाला एकसारखी चिन्ता लागून राहिली होती. झोंपेंत आपल्या मुलांविषयीं भयानक अभद्र स्वप्न पडून त्या दचकून जाग्या होत असत.

परधर्मी तरुणीशीं त्याची संशयास्पद मैत्री त्यांना पसंत नव्हती तरी त्या स्तब्ध राहात होत्या. इतकेंच नव्हे तर विलायतेला गेल्यावर एखाद्या आंग्ल युवतीशीं जरी त्याचा विवाह झाला तरी त्यांस वाईट वाटलें नसतें. पण जर त्याचें लक्ष विद्याभ्यासांत अगर प्रेमसंबंधांत व्यग्र राहिलें नाहीं तर तो खात्रीनें एखाद्या क्रान्तिकारकाच्या कटांत सामील होऊन राजकीय गुन्ह्याबद्दल घोर शिक्षा भोगील असें त्यांचें मन त्यांना सारखें सांगत होतें. पण दमनचें लक्ष परिणामांकडे बिलकुल नव्हतें.

तो नेहमीं म्हणत असे, कीं जीविताचा बडेजाव माजविण्यांत कांहीं अर्थ नाहीं. ह्या जगांत अनेक प्रकारचे रोग, हरतऱ्हेचे अपघात एवढे टपून बसले आहेत; कीं मनुष्याची भूलोकांतून परलोकांत अचानक उचल-

बांगडी कधीं होईल याचा नेम नाहीं. मग अशा अष्टौप्रहर संकटांनीं वेढ-लेल्या जीवाचें व्यक्तीनें असें महत्व वाढविणें आकुंचित नजरेचें द्योतक आहे. शिवाय ह्या विश्वांतील असंख्य गोलांतील पृथ्वी हा एक गोल आहे आणि त्यावरील अगणित जीवांपैकीं मनुष्य हा एक प्राणी आहे. आणि ह्या प्राण्याचें आयुष्यदेखील अनादि–अनंत काळाचा एक सूक्ष्म परिमाणू आहे. असें असतांना मनुष्यानें 'हें माझं धन, हीं माझीं मुलं आणि ही माझी पत्नी' म्हणून इवल्याशा संसाराबद्दल वृथा अभिमान बाळगावा ह्याचें त्याला आश्चर्य वाटत असे. एवढेंच नव्हे तर आपणही या मोहांत सांपडलों आहों याबद्दल त्याला वैषम्य वाटत होतें.

अशा विचारामुळें त्याच्या हृदयांत एकदम कालवाकालव होऊन परमेश्वरावर श्रद्धा ठेवल्याशिवाय मनुष्याला सुख सांपडायचें नाहीं असेंही एकादे वेळीं त्याला वाटे.

सायंकाळीं वनांत मार्ग चुकल्यावर एखाद्या पान्थस्थानें कोठच्या मार्गे आपल्याला इच्छित स्थलीं नेईल, याचा विचार करीत असतां सभोंवार श्वापदाचे आवाज ऐकूं यावे व अंधारानें पुढचा मार्ग व्यापला जावा, तद्वत्‌च दमनच्या मनाची परिस्थिती होत होती. या वेळीं आत्मविश्वासानें कोठलीही दिशा निश्चित करून मार्ग आक्रमण करणें शहाणपणाचें आहे अशी मनाची समजूत तो घालीत होता. पण पुन्हां अनेक विचारांचें युद्ध त्याच्या मनांत सुरू होत होतें व कांहींच निष्पन्न होत नसल्यामुळें विकल झालेली मनोवृत्ति नाहींशी करण्याकरतां मासिक चाळण्यास सुरवात करीत असे.

आजही त्याच्या मनांत तशाच विचारांचें काहूर उठल्यामुळें तो उदासीन झाला होता. अनामिका त्याची कष्टी मनोवृत्ति ओळखून म्हणाली, "दादा, तुला पण सिनेमाला जायचं हं. आई, तुला पण यायला हवं. दादा, पण तुला आज कुठल्या कामगारमैदानावर जायचं नाहीं ना?"

"ताई" त्यानें हंसत उत्तर केलें, "कोणतीहि गोष्ट गुप्त ठेवायची असेल तर स्त्रीला ती बिलकूल सांगतां नये. आपल्या एका प्रियकरानं

विश्वासानं सांगितलेली गोष्ट दुसऱ्या प्रियकराला सांगणाऱ्या किती तरी स्त्रिया असतात."

"पण दादा," अनामिका त्याला वेडवीत म्हणाली, "तुम्हा पुरुषांनादेखील आपलं हृद्गत सांगायला स्त्रीपेक्षां जास्त लायक मनुष्य सांपडायचं नाहीं. म्हणूनच लढाईत गुप्तहेर म्हणून अनेक स्त्रिया प्रसिद्धीस आल्या."

"खरंच, स्त्रीपुढं मूक मनुष्य वाचाळ होतो. पण डोळस मात्र आंधळा होतो. ताई, आज मला सभेला गेलं पाहिजे. 'साम्यवाद आणि हिंदुस्थान' ह्या विषयावर गौरीशंकर यांचं व्याख्यान आहे."

"दादा, आणखी मी तुला विचारतें, कीं जगांतील सर्व धन जर वांटून दिलं तर प्रत्येक मनुष्य सुखी होईल का? आणि त्याला तें पुरं तरी पडेल का? मला नाहीं वाटत."

"मग तो आमच्या धन निर्माण करण्याच्या घटनेंतील दोष आहे. ताई, श्रीमंताच्या चैनीकरतां चाललेला आर्थिक अपव्यय थांबविला, शास्त्रज्ञांचें बौद्धिक सामर्थ्य इकडे खर्च केलं तर तें साध्य होईल असं मला वाटतं. जगांतील विषमतेवर पांघरूण घालण्यासाठीं स्वर्गाची, स्वर्गाच्या कल्पनेची, आणि पुनर्जन्माची मदत घेऊन जगांतील विषमता दैवाधीन आहे असं भांडवलशाहीचे भागिदार भासवित असतात."

"दमा," शकुन्तलाबाई मध्येंच म्हणाल्या, "वसंत-ऋतूमध्यें बहरणारे वृक्ष जर हेमंत ऋतूंमध्येंच बहरून आले तर त्यांचीं फळं पूर्णपणें मधुर कशीं व्हावयाचीं? तारुण्याचं रक्त सळसळतांना सारी परिस्थिती आपल्या ध्येयाला अनुकूल आहे असं तुला वाटतं आहे. पण तुमचा साम्यवाद साऱ्या जगाच्या, निदान हिंदुस्थानच्या पचनीं पडायला अजून किती काल गेला पाहिजे कुणाला माहित. दमा, तुला जर खरं कार्य करायचं असेल तर लक्षांत ठेव कीं सत्तेपुढं शहाणपण चालत नसतं. राजसत्तेनं घालून दिलेल्या मर्यादेंतच राहून आपल्या कार्याच्या मर्यादा आपण वाढविल्या पाहिजेत. तुझ्या आईचं ऐक, मी देखील तुझ्या वयाची असतांना ध्येयवादी होतें. हिंदुस्थानच्या—निदान महाराष्ट्रीय स्त्रियांचा दर्जा वाढवावा, उन्नति

करावी इत्यादि सुंदर महत्वाकांक्षा मी हृदयाशीं बाळगल्या होत्या. तो माझा उत्साह, तीं माझीं मनोराज्यं–आज त्यांचं काय झालं हें तूं पहातोसच."

एवढें बोलतांना शकुन्तलाबाईचा कंठ दाटून आला व डोळ्यांत खळकन् पाणी आलें. त्यांनीं साश्रु नयनांनीं समोर पतीच्या तसबिरीकडे पाहिलें. आपल्या दोन्ही मुलांना हृदयाशीं धरलें. दमन खिन्नपणें खालीं पहात होता. थोडा वेळ गेल्यावर त्या म्हणाल्या, "दमा, मला वचन दे बाळ. किती जरी मनांत आलं तरी तुझ्या ध्येयाच्या आड मी येणार नाहीं. पण दमा—"

शकुन्तलाबाईच्या तोंडावाटे शब्द फुटेना. दमनला हृदयाशीं घट्ट धरून त्या अश्रु गाळीत होत्या. उमाळा अनावर झाला. त्यांनीं एकदम हुंदका दिला. दमनच्या डोळ्यांतही अश्रु उभे राहिले.

"आई, आई, तुम्ही उगाच घाबरतां!"

"बाळ, तुझ्याबद्दल मला जेवढा अभिमान वाटतो तितकीच जबर भीति वाटते" त्याच्या केंसावरून हात फिरवित त्या म्हणाल्या. "तूं अजाण बालक होतास आणि अनाचा जन्म झाला नव्हता, या दोन गोष्टीमुळंच पुन्हां पुन्हां उचल खाणाऱ्या मनाला त्या वेळीं मला आंवरून धरतां आलें. बाळ, तूं शहाणा आहेस; पण जग वाटतं तेवढं तुझ्या पाठीशीं नाहीं. तुझ्या ध्येयाआड जाऊं नये म्हणून मी मनाला पुन्हा पुन्हा खेंचून धरलं आहे. तुझ्या आईला सुखानं मरण यावं असं नाहीं का तुला वाटत?"

"आई, खरंच सांगतों मी कोणताही अत्याचार करणार नाहीं. मी कोठल्याही कटांत सामील झालेला नाहीं."

"खरं खरं सांगतोस का हें दमा?" शकुन्तलाबाई त्याला कुरवाळीत अत्यंत केविलवाण्या स्वरांत म्हणाल्या, "माझी शपथ घेऊन सांग पाहूं."

"आई, किती संशयी तुझा हा स्वभाव!" दमन किंचित् स्मित करीत म्हणाला, "अगदीं खरं सांगतों मग तर झालं ना?"

शकुन्तलाबाईनी वात्सल्यानें त्याचा मुका घेतला व त्यांच्या डोळ्यांतून आनंदाश्रु वाहूं लागले व त्यांनीं अजूनही न सुकलेल्या दुःखाश्रूंच्या ओघळांतूनच आपला मार्ग काढला.

" दमा–" एवढं बोलून त्यांचा कंठ गहिंवरला. पुन्हा एक वेळ त्याचा मुका घेऊन घसा साफ करून त्या म्हणाल्या, " किती किती शहाणा माझा बाळ!"

अनामिकाही साश्रु नयनांनीं पहात स्मित करीत उभी होती.

" दादा, आईला वचन दिलं आहेस. लक्षांत ठेव—"

" बरं, बरं!" दमन तिचा गालगुचा घेत उत्तरला.

" आई बघ ग," अनामिका लडिवाळपणें म्हणाली, " हाच तुझा अनत्याचार का रे?"

शकुन्तलाबाईंनीं समाधानानें हास्य केलें. आपल्या दोन्ही मुलांच्या पाठीवरून हात फिरवित त्या कौतुकानें म्हणाल्या, " चला जेवायला. रात्रीं सिनेमाला जावयाचं आहे ना? मग उगाच उशीर कशाला?"

सर्वजण आंतल्या दालनांत गेलीं. दमन झालेल्या प्रकाराचें आपल्याशींच समालोचन करीत होता.





त्या दिवशीं रात्रीच्या गाडीनें दमन आपल्या एका मित्राकडे लाहोरला आठ दिवसांकरतां जात होता. आपला हा प्रवास केवळ विश्रान्ती व मौज याकरतां आहे असें त्यानें शकुन्तलाबाईंना कितीही सांगितलें तरी त्यांना तें खरें वाटेना, म्हणून दमननें रामलालचीं अतिशय आग्रहाचीं पत्रें दाखवून त्यांची खात्री पटविली तेव्हांच त्यांनीं त्याला परवानगी दिली होती.

त्या रात्रीं अनामिकेला बरें वाटत नव्हतें म्हणून ती स्टेशनवर गेली नव्हती; पण शशिधर मात्र नॅन्सीसह बोरीबंदरवर दमनची वाट पहात येरझाऱ्या घालीत होता. नॅन्सी ही एक अँग्लोइंडियन सुंदर युवती होती, तरी तिनें महाराष्ट्रीय पद्धतीनेंच त्या वेळीं पोशाख केला होता.

सर्व परिचारिकांत तीच पोरगी जास्त गोड आहे असा तिच्याबद्दल मेडिकल कॉलेजच्या विद्यार्थ्यांचा अभिप्राय होता व ज्या तरुण पेशंटच्या कॉट तिच्याकडे असत त्यांना ते सर्व विद्यार्थी Lucky Invalid असेंही म्हणत असत. कांहीं विद्यार्थ्यांनीं तर तिला फ्लॉरेन्स नायटिंगेल् असें म्हणत असत. दवाखान्यांतून जाणारे श्रीमंत रोगी तिच्या शुश्रुषेवर खुश होऊन पुष्कळ वेळां तिला घड्याळ, आंगठी, फाउन्टन-पेन इत्यादि देणग्या देत असत. इस्पितळाच्या मुख्य अधिकाऱ्याचीही तिच्यावर अतिशय मर्जी होती व यामुळें अल्पावधींतच ती सिस्टरच्या हुद्यावर चढली होती.

नॅन्सीसारख्या हुशार व सुंदर तरुणीनें एका हिंदु तरुणाबरोबर दाट स्नेह करावा, नेहमीं त्याच्याबरोबर फिरावें हें तिच्या जातीच्या कांहीं तरुणांना बिलकुल खपत नव्हतें व यामुळें ते शशिधरचा द्वेष करीत असत. त्यांच्या स्नेहाबद्दल भलभलतं बोलत असत. पण त्यांचा स्नेह मात्र अधिकच दृढ होत होता.

शशिधर व तिचा स्नेह कसा जमला हीसुद्धां एक रम्य कथाच आहे. एके दिवशीं रात्रीच्या गाडीनें नॅन्सी पुण्याला जात होती. त्याच सेकंड क्लासच्या डब्यांत शशिधरही होता. नॅन्सीनें रीझर्व केलेल्या बर्थवर गाडींत चढलेल्या एका इसमानें आपला बिछाना सोडला. त्याला कितीही विनविलें तरी तो ती जागा रिकामी करीना. शशिधरला त्याच्या उद्दामपणाचा अतिशय राग आला व त्यानें त्याच्याशीं वाद करण्यास सुरवात केली. शेवटीं हा प्रकार विकोपास जाऊन दोघांची मारामारी झाली. शशिधरनें त्याला चांगलाच मार दिला. एवढ्यांत स्टेशन—मास्तर आला त्यामुळें तें भांडण मिटलें. हीच त्यांच्या स्नेहाची सुरवात होती.

शशिधरचे वडील बेळगांवांत प्रसिद्ध वकील होते. त्यांचा हा एकुलता एक मुलगा. योग्य प्रकारें शिक्षण घेऊन परदेशाहून तो परत आला म्हणजे त्याला बेळगांवला एक मोठं रुग्णालय काढून द्यावयाचें असा त्यांचा विचार होता. परंतु चांगली प्रॅक्टिस चाललेल्या फौजदारी कोर्टाच्या वकीलाची बेपर्वा वृत्ति त्यांच्या आचरणांत नेहमीं दृग्गोचर होत असे. शशिधर बाविस वर्षांचा झाला तरी देखील त्याच्याशीं बोलतांना आपल्या पितृत्वाच्या अधिकाराची जाणीव त्यांच्या हृदयांत होती व पैशाची गरज लागल्यास त्यानें आपल्या आईमार्फतच बोलणें करावें असें त्यांना वाटत असे.

रजेंत घरीं गेल्यावर शशिधर देखील त्यांच्याशीं बेतानेंच बोलत चालत असे. बहुतेक घरीं त्याचा वेळ आईशींच बोलण्यांत जात असे. मनोरमाबाईंना आपल्या यजमानानीं मुलाशीं असें ताठून वागावें याचें फार वाईट वाटत होतें. पण त्याचा उल्लेख करण्याइतकाही मोकळेपणा त्या पतिपत्नींमध्यें नव्हता.

कांहीं लोक खरें प्रेम करण्यास असमर्थ असतात व त्यांची स्वायत्तता एवढी प्रबल असते कीं आपल्यापेक्षां अधिक आदरणीय कोणीच नाहीं असें त्यांना वाटतें. याच स्वभावाचे रावसाहेब हे एक सुंदर नमुना होते. यामुळें क्वचित् प्रसंगीं त्यांनीं मुलाला एखादें पत्र पाठविलें तर तें अतिशय त्रोटक असे व नियमित पैसे पाठविण्यापलीकडे ते त्याची विशेष विचारपूस करीत नसत.

दमन व शशिधर यांचा स्नेह मात्र अकृत्रिम होता. कांहीं व्यक्तींबद्दल आपल्याला अकारण कुतूहल व स्नेहभाव वाढावा या न्यायाला अनुसरून ते परिचयापूर्वीच एकमेकांकडे आदरानें पहात असत. याची कबुली ते आजही देत होते. यामुळें दमन एके दिवशीं आपल्या एका स्नेह्याला वसतिगृहांत भेटावयास आला असतां शशिधरनें त्याचा परिचय करून घेतला व अल्पावधींतच त्यांचा स्नेह अगदीं नकळत दृढ झाला होता.

स्टेशनवर त्याला नॅन्सीसह पहातांच दमनला आनंद झाला.

“ गुड नाईट, मिस् नॅन्सी, ” दमन तिच्याशीं हस्तांदोलन करीत म्हणाला, “ शशी, तुला दुपारीं फोन केला, पण तूं नव्हतास. ”

“ हो, पण मला निरोप मिळाला. एकाएकींच लाहोरला कां चाललास बुवा ? सरकारनें तर हुकूम काढला नाहीं ना ? ” शशिधरनें हंसत प्रश्न केला.

“ हें बघ मला ओळखणारेच तुझ्यासारखे लोक जर माझ्याबद्दल संशय घेऊं लागतात तर हजारों ओंजळीनं पाणी पिणारं भोळं सरकार मला अत्याचारी क्रान्तिकारक म्हणेल यांत विशेष नवल नाहीं. रामलालनं पुन्हा पुन्हा आग्रहानं लिहिलं तेव्हां म्हटलं आठ दिवस जाऊन यावं. अगदीं कंटाळा आला आहे मला मुंबईचा. ”

“ पण दमन, आज तुला चांगली सोबत आहे. रुबी जाते आहे वाटतं कुठं तरी तिकडेच. ”

“ कशावरून ? ” दमन कांहींसा आश्चर्यानें उद्गारला व त्याच्या भुंवया एकदम वक्र झाल्या.

“ तिकडे बुकिंग ऑफिसमध्यें पाहिली मी. बरोबर नोकर आहे, तो कांहीं जात नसावा. मला वाटतं ती जमशेटपूरला जात असावी. तिकडेच तिचा नवरा आहे. ”

“ असूं द्या. ” आपल्या प्रवासांत ही अडचण झाली पण ती अपरिहार्य आहे अशाच वृत्तीनें तो पुढें म्हणाला, “ काय नॅन्सीबेन, मराठीचा अभ्यास कसा काय चालला आहे ? तुम्हांला आमचा हिंदी पोशाख फ़ारच सुंदर दिसतो. ”

नॅन्सी मधुर हास्य करीत म्हणाली, "मला साडी नेसायला फार आवडते. अद्याप चांगल्या रीतीनं नेसतां येत नाहीं एवढंच. फुलं डोकींत घालण्याची तुमची रीत किती गोड आहे! किती सुंदर गुलछबूच्या वेण्या ह्या! मीसुद्धां नेहमीं वेणी घालतें."

"नॅन्सी, तुला नाविन्यांत गोडी वाटते आहे." शशिधर हंसत पुढें म्हणाला. "माझ्या आईनें तुला अशी पाहिली तर तिला किती मौज वाटेल! ह्या पोषाखांतला तुझा एक फोटो मी तिला पाठविणार आहे."

"यापेक्षां लवकरच तिकडे जाऊं या. तुमच्या आई वडिलांना केव्ह भेटेन असं मला झालंय्." नॅन्सी त्याच्याकडे स्निग्धपणें पहात म्हणाली, "मला तुमच्या हिंदी कुटुंबांत बसायला, बोलायला फार आवडतं. माझ्या ओळखीचे कांहीं पेशंटस् आहेत, त्यांच्या घरीं मी दिवाळीला जातें. तुमच्या लग्न-पद्धतींतसुद्धां एक प्रकारची शोभा आहे."

"मग शशिच्या लग्नांत तुम्हाला सारी मौज दिसेल कीं." दमन मिस्किलपणें हंसत म्हणाला.

नॅन्सीच्या चेहऱ्यावर दिव्याच्या प्रकाशांत आरक्तता दिसली. शशिधरचें लक्ष तिच्याकडे गेलें. त्यावेळीं तिचा निरागस चेहरा त्याला अतिशय मोहक वाटला व आपण नॅन्सीसाठीं साऱ्या जगाला बाजूला गुंडाळून ठेवूं असाच पुन्हा एकवार त्यानें मनाशीं निर्धार केला. प्लॅटफॉर्मवरील गडबडींतही आपण एकान्तांत आहों असेंच त्याला वाटलें. हातगाडी घेऊन जाणाऱ्या हेलकऱ्याला वाट देण्याकरतां नॅन्सीनें त्याला स्पर्श केला तेव्हां विचारतंद्रींतून तो एकदम जागा झाला.

गाडीला अजून अवकाश होता. पण शशिधर व नॅन्सी सिनेमाला जाणार होतीं, तेव्हां दमनचा निरोप घेत शशिधर हस्तान्दोलन करून म्हणाला.

"अच्छा दमन Wish you a happy journey and a pleasant time. परत कधीं येणार तूं?"

"येईन दहा पंधरा दिवसांनीं. पण तूं बेळगांवला कधीं जाणार?"

"तूं परत आल्यावर लवकरच जाईन म्हणतों. पण नॅन्सीला रजा मिळाली पाहिजे. तिथं शिकारीला वगैरे जाण्याचा बेत आहे."

" आतां कसली शिकार करतोस ? " स्टॉलवरील पुस्तकें पहाण्यांत नॅन्सी मग्न आहे असें पाहून दमन हंसत म्हणाला, " शशी, ही हरणाची शिकार साधलीस तेवढी पुरे झाली नाहीं वाटतं ? सांभाळ बरं. भलतंच धाडस करूं नकोस. पण हिला बेळगांवला जाण्यापूर्वी सर्व गोष्टींची जाणीव करून दिली आहेस का ? "

" म्हणजे काय ? " शशिधरनें प्रश्न केला.

" तुम्ही डॉक्टर लोक शिपाईच का रे ? हें बघ, तुझ्याबरोबर नॅन्सी बेळगांवला आली तर हें तुझ्या अण्णांना कितपत खपेल याचा संशय आहे. एखादे वेळीं तिला अपमान सहन करावा लागेल. फार कशाला, कदाचित् तुम्हाला घरही सोडावं लागेल. एखादा रस्त्यांतील मवाली सरळ तुमच्या तोंडावर अचकट विचकट बोलेल. एक प्रकारचं संशयित वातावरण तुमच्या सभोंवार तुम्हांला दिसेल; म्हणून म्हणतों शिकारीला निघाला आहेस. झाडावरचे किलबिल करणारे पक्षी मारायचा तुझा बेत असेल आणि चटकन् एखादा रानडुकर मात्र ठोंकर देऊन घायाळ करायचा. शशी, माणसानं सर्व परिणामांची अपेक्षा केली म्हणजे आलेल्या संकटानं किंवा अपयशानं तो बिलकुल हताश होत नाहीं. "

" दमन, " शशिधर कांहींसा खिन्नपणें म्हणाला, " तूं लाहोरहून आलास, मग मी बोलेन तुझ्याशीं याबद्दल सर्व कांहीं. पण हें बघ, बाबा कदाचित् मला घराबाहेर काढतील हें मी ओळखून आहे. प्रसंग पडल्यास राजस्थान हॉटेलमध्यें राहण्याची मी व्यवस्था केली आहे. नॅन्सीलादेखील त्या गोष्टीची जाणीव मी देत आहे. "

" अच्छा, मग ठीक आहे. I wish you every success. " असें म्हणून दमननें त्याचा हात प्रेमभरानें घट्ट दाबला. त्या हस्तस्पर्शांतील आश्वासन शशिधरला तात्काल समजलें. त्यानें दमनकडे प्रेमपूर्वक पाहिलें. त्याचें अन्तःकरण आशेनें आणि उत्साहानें स्फुरण पावत होतें. " बरं जा तूं " दमन घड्याळाकडे पहात म्हणाला, "तुला शोला जायचं आहे ना ?"

" हो. बरं तर गुडबाय. "

" गुडबाय, नॅन्सी. "

" गुडबाय. Wish you a happy time. " नॅन्सी हस्तांदोलन करीत हंसत म्हणाली.

तीं दोघेंही प्लॅटफॉर्मवरून बाहेर गेलीं. दमन फाटकापर्यंत जाऊन मागें फिरला व प्लॅटफॉर्मवर येरझाऱ्या घालूं लागला. अद्याप गाडी सुटण्यास दहाबारा मिनिटांचा अवकाश होता. त्याच्या मनांत शशिधराच्या वैवाहिक जीवनाबद्दल विचारमालिका सुरू झाली होती. नॅन्सी ही अतिशय प्रेमळ मुलगी असली तरी तिचा व शशिधरचा विवाह सुखावह होईल का ? शशिधर हा नाहीं म्हटलें तरी आपल्या घरंदाज घराण्याबद्दल अभिमान बाळगणारा श्रीमंत जमीनदार वकिलाचा मुलगा. उद्यां बेळगांवांत तो प्रॅक्टीस करूं लागला, कीं आपली पत्नी ही एक सार्वजनिक हॉस्पिटलांत काम करणारी अँग्लोइंडियन् नर्स होती ही गोष्ट त्याला विशेष जाणवूं लागेल; व सहाजिकच तिच्याबद्दल त्यांच्या मनांत असणारा आदर कमी होत जाईल. शिवाय नॅन्सी ही एका अविवाहित टायपिस्ट् गर्लची मुलगी होती ही गोष्ट शशिधरला मानसिक यातना दिल्याशिवाय रहाणार नाहीं असें दमनला वाटत होतें. तसेंच परिचारिकेचा धंदा आज कांहीं वर्षें तिनें केल्यामुळें प्रणयविकाराची न्यूनता तिच्या ठायीं असेल व केवळ शशिधरच्या श्रीमंतीमुळेंच ती त्याच्याशीं विवाहबद्ध होण्यास तयार झाली असेल असाही ओझरता विचार त्याच्या मनांत चमकून गेला. अन्य व्यक्तीच्या प्रेमाबद्दल येणाऱ्या क्षुद्र कल्पनांबद्दल त्याचें त्यालाच वैषम्य वाटलें व त्यानें ते विचार उधळून लावण्याचा प्रयत्न केला.

त्या वेळीं दमनची कल्पनाशक्ति अफाट वेगानें धांवत होती. शशिधर—नॅन्सी यांच्या प्रेमाचा विचार करीत असतां आपल्या प्रणयाबद्दल त्याच्या मनांत विचारमालिका सुरू झाली. आपण कमलेवर किती निस्सीम प्रेम करतों आहों; पण रुबीबद्दल यापूर्वी आपण तेवढ्याच उदात्त उत्कट भावना हृदयाशीं बाळगल्या होत्या. तथापि आज ती गाडींत आहे ही वार्ता समजतांच आपल्याला किती वाईट वाटलें !

कमला आणि रुबी यांची तुलना दमनला नको असतांही त्याच्या डोळ्यासमोर उभी राहिली. आपल्या प्रेमाची खरी योग्यता समजण्यास

कमला असमर्थ आहे असेंही त्याला वाटलें. प्रेमासाठीं आपल्या पित्याला झुगारून देण्याची कल्पना तिला असह्य आहे, या भीतीनें तो तिच्या-जवळ हा प्रश्न काढीत नव्हता.

कमला किती घाबरट तर रुबी किती मोकळी आणि उत्साही. कमला आपलें प्रेम कधींही व्यक्त न करणारी, संशयी आहे तर रुबी आपल्या भावना ओळखून, आवडनावड जाणून त्याप्रमाणें वागत असून आपल्या उद्योगानें चित्त आकर्षण करीत होती. पण कमला कित्येक वेळां इतकी अचल असते, कीं हिला आपल्या भावनाच समजत नसाव्या असें वाटतें.

त्याच्या दृष्टीसमोर जुहूच्या किनाऱ्यावरील ती रात्र उभी राहिली. कमला थकून गेली तरीसुद्धां आपलें सहाय्य घेऊं नये म्हणून तिनें निकरानें किती धडपड केली! तीच जर रुबी असती तर थकण्यापूर्वींच ढोंग करून प्रणयाचा आस्वाद तिनें घेतला असता. सुंदर संभाषणानें आपल्या बुद्धीचें प्रदर्शन केलें असतें आणि तुझ्या प्रत्येक आचारविचाराशीं आणि भावनाशीं आपण सर्वस्वी समरस झालें आहे असेंच तिनें भासविलें असतें.

तुटणाऱ्या चित्रपटांतील दृश्यें जशीं जावीं त्याचप्रमाणें त्याच्या नजरेसमोरून रुबीच्या सहवासांतील रम्य प्रसंग जाऊं लागले व मधुर हास्य करून ती त्याला उभी असलेली दिसूं लागली.

इतक्यांत आपल्या खांद्यावर कुणी तरी हात टेवल्याचा भास होऊन दमन एकदम त्या विचारतंद्रींतून जागा झाला. त्यानें दचकून मागें पाहिलें तों रुबी त्याचा हात धरून हस्तान्दोलन करीत स्निग्ध स्वरांत म्हणाली, "किती गोड योगायोग! दमन, प्रवासांत तुझी सोबत किती आनंददायक होईल! पण कुठं निघालास तूं?"

दमनला क्षणभर तिचा हात झिडकारून द्यावा असें वाटलें. पण कोणत्यातरी विलक्षण शक्तीमुळें त्याला तसें करतां येईना. रुबी भेटली तर तिच्याशीं उद्धट रीतीनें वागायचें, कोणत्या उत्तरानीं तिचा अपमान करायचा हा त्यानें मनाशीं ठरविलेला बेत तेथल्या तेथेंच जिरला व त्यानें चटकन् उत्तर केलें, "मी लाहोरला जातों आहे."

तिच्या चेहऱ्यावर आनंदाचें हास्य उमटलें. तिचा पोषाख आज विशेषच रुबाबदार होता. काळ्या रंगाची अत्यंत तलम रेशमी साडी ती नेसली होती. तिची रुपेरी किनार व तारकाप्रमाणें त्यावर चमकणारे बारीक रुपेरी ठिपके फारच शोभून दिसत होते. तिच्या निर्मल गौरकान्तीला त्या वस्त्राचा काळा रंग अधिकच शोभून दिसत होता. तिची उंच व सडपातळ शरीरयष्टी, लांब बारीक धनुष्याकृति भुंवया, चांफेकळीप्रमाणें नाजूक नाक व कांहींसा रुंद नितळ भालप्रदेश यामुळें तिचें सौंदर्य अतिशय आकर्षक वाटत होतें. तिच्या एकंदर वागणुकीमुळें ती श्रीमान् घराण्यांतील सुखांत वाढलेली सुंदर तरुणी आहे याबद्दल कोणालाच संशय वाटण्याचें कारण नव्हतें. लाल ओंठामुळें तिचें चिमुकलें तोंड अधिकच मोहक दिसत होतें. तिनें आपले गालही कांहींसे आरक्त केले होते. साडीवरील अत्तराचा उन्मादक वास नाकांत भरत होता.

दमन मात्र तिच्या सस्मित चेहऱ्याकडे बिलकुल पहात नव्हता; पण रुबी त्यामुळें बिलकुल नाराज न होतां पुन्हां इंग्रजींत म्हणाली, " दमन, किती दिवसांनीं आपण भेटतों आहों आणि तींदेखील प्रवासांतच. मी जमशेटपूरला जातें आहे. "

अजूनपर्यंत दमनकडे कोणी पहात नव्हता. पण तिनें त्याच्याशीं हस्तान्दोलन करून बराच काल त्याचा हात आपल्या हातांत धरला आहे, ही गोष्ट लक्ष्यांत येतांच इतर पॅसेंजरबरोबर पोर्टरही त्याच्याकडे पाहूं लागले. बाजूला उभा असलेला स्टेशनमास्तर व तिकिटकलेक्टर यांनीं परस्परांकडे पाहून हास्य केलें.

आपणाकडे सर्वांचें लक्ष वेधलें आहे असें पाहून रुबी साहजिकपणाचा आव आणून दमनला म्हणाली, " चल, आपण गाडींत बसूं. "

" पण मी थर्ड क्लासनें जात आहें " दमन एकदम निर्धारानें म्हणाला.

" काय ! " पण तात्काळ रुबी आपलें आश्चर्य दडवून म्हणाली, " पण तुला तिकडे झोंपायला मिळायचं नाहीं. माझ्याकडे दुसरं तिकीट आहे. माझा भाऊ जाणार होता, पण एकाएकीं कांहीं कामामुळें तो येत नाहीं आहे. मी तें तिकीट अजून रद्द केलं नाहीं. "

" माफ कर. " दमननें स्पष्ट नकार दिला.

" तें कांहीं नाहीं, तुला आलंच पाहिजे. हें बरं नाहीं दिसत तुला." रुबी त्याचा हात धरून ओढीत म्हणाली.

दमनच्या मनाची स्थिती विचित्र झाली होती. तिला एक धक्का देऊन बाजूला करून आपल्या डब्यांत चढावें असेंच एक वेळ त्याला वाटलें. पण असा देखावा प्लॅटफॉर्मवर करणें अयोग्य अशी मनाची समजूत करून तो तिच्याबरोबर पहिल्या वर्गाच्या डब्यांत चढला.

गाडी सुटण्यास पांचच मिनिटांचा अवधी होता. ती कधीं एकदां आपल्या मनाप्रमाणेंच जोरानें भरधांव सुटते असें दमनला झालें होतें. रुबी आपल्याशीं अशा प्रकारचें वर्तन करील अशी यत्किंचितही कल्पना नसल्यामुळें तो एकदम चमकला होता. आपण तिच्याबद्दल तुच्छतादर्शक विचार करतों हा आपला मत्सर असावा अशीही कल्पना त्याच्या मनांत आली.

रुबीनें गाडींत चढल्यावर आपलें सामान नीट असल्याचें पाहिलें. आपली बॅग उघडून ती तोंडानें कांहींतरी गुणगुणत आंतील वस्तू चाळवूं लागली.

" दमन " ती एकदम म्हणाली, " तुझं सामान इकडे आणलं पाहिजे ना ? "

" नको, मी तिकडेच बसतों. " तो पुन्हा एक वेळ निश्चयानें म्हणाला.

" दमन, मेहेरबानी कर आतां.कसला भलताच हट्ट हा ! मी एकटी आहें. मला तुझ्याशीं पुष्कळ बोलायचं आहे. आपण किती दिवसांनीं प्रथम भेटलों आहों; " असें म्हणून तिनें दमनची विनवणी केली व शिपायाला हळूच खिडकीपाशीं बोलावून त्याला दमनचें सामान व आणखी एक फर्स्ट क्लासचें तिकीट लवकर काढून आणण्यास तिनें सांगितलें.

दमन अगदीं स्तब्ध उभा होता. रुबीनें आपल्या पतीचें तरी असें आर्जव केलें असतें का ? हा विचार त्याच्या मनांत आला.

थोड्याच वेळांत गाडी सुटण्याची घंटा झाली. घाईघाईनें शिपायानें दमनचें सामान आणलें. गार्डानें जोरानें शिटी फुंकली. लगेच गाडीनें-देखील शीळ दिली व हिसका देऊन ती चालूं लागली.

रुबी आपल्याशींच आनंदानें हास्य करीत होती. डोकीवरून पाठी-मागें घसरलेला पदर तसाच पडूं देऊन आपल्या केंसावरून हात फिरवीत ती विजयश्रीच्या आनंदानें म्हणाली, "दमन, तूं माझ्यावर उगाच रागा-वला आहेस."

दमननें कांहींच उत्तर केलें नाहीं.

त्याच्या शेजारीं बसून पायांतील बूट काढित ती पुढें म्हणाली, "माणसानं भलत्याच गोष्टीची अपेक्षा करून आपलं आयुष्य दुःखमय करूं नये."

तिच्या डोळ्याची अतिशय मोहक हालचाल सारखी चालली होती.

"मला आज विद्यार्थ्याची भूमिका देऊन ज्ञानामृत पाजायच आपला विचार दिसतो आहे?" दमन कांहींसा रागीट स्वरांत म्हणाला.

कांहीं झालें तरी लाघवीपणाला बळी पडायचें नाहीं असा सारखा जप तो मनांत करीत होता. पण रुबी त्या प्रश्नानें बिलकुल रागावली नाहीं. ती त्याच्याकडे अतिशय स्निग्धपणें पहात मधुर हास्य करीत म्हणाली, "दमन, तूं रागावलास म्हणजे किती किती छान दिसतोस!"

"रुबी, तुझी शादी झाली ना?" दमन तिच्या बेफिकीर वृत्तीनें थक्क होऊन उद्गारला.

"आणि म्हणूनच तूं माझा तिरस्कार करतोस?" ती मुग्धपणें पहात म्हणाली, "दमन, कॉलेजमध्यें असतांनाचें तुझे टेनिसमधील Shots मला डोळ्यांसमोर अजून दिसतात. किती Powerful returns असत ते! क्रिकेटच्या मैदानावर शतक पुरं केल्यावर परत येतांना तुझा तो लाल झालेला नि घामानं भरलेला चेहरा पुसायला मी किती उत्सुक होतें! दमन अजूनही तुझ्या चेहऱ्यावर तोच उमदेपणा मला स्पष्ट दिसतो. पण तुझ्याशीं मैत्री जोडल्यामुळेंच मी कॉलेजला मुकलें आणि घरीं म्हाताऱ्या प्रोफेसरापुढं शिकायची पाळी आली."

"रुबी," दमन खिन्न स्वरांत म्हणाला, "आतां कशाला त्य गोष्टीची आठवण! एक काळ तसा होता खरा. तुझी शादी झाली. पैशापुढं प्रेम फिक्कं पडलं."

"दमन," रुबी व्याकूळ स्वरांत म्हणाली, "माझं जरा ऐकशील का ? मी शाळेंत जात असें त्या वेळीं माझ्याभोंवतीं तरुण विद्यार्थी असत. कांहीं कांहीं दाट मैत्री करण्याचा प्रयत्न करीत. मी सर्वांनाच नाकारीत होतें असं नाहीं. पण त्या वेळीं मी एका तरुणावर मात्र विशेष प्रेम करीत होतें. पण तो मात्र माझ्याकडे क्वचित्‌च बोलत असे. दिवसें दिवस त्याच्या-बद्दल मला जास्तच आकर्षण वाटूं लागलं. रोज त्याला भेटावं, त्याच्याशीं बोलावं असं वाटत होतं मला. कधीं एक दोन दिवस तो शाळेंत आला नाहीं, कीं मनांत भलभलत्या कल्पना येऊन मी अगदीं अस्वस्थ होत असें. शेवटीं मी त्याच्यावर माझी मैत्री लादली. मला वाटलें, मीं सर्वस्वीं सुखी होईन. पण एकाएकीं तो मुलगा आठ दिवसाच्या आजारानं मरण पावला. खरंच दमन, मला अत्यंत वाईट वाटलें. मरण येईल तर बरं असंही वाटलं. मी सारखी रडत होतें. जेवणावरचं मन उडालं. जगांत यापुढं जगण्यांत कांहीं अर्थ नाहीं असंच वाटूं लागलं मला."

"अशाचपैकीं मीदेखील एक मृत प्रियकर असेन ?" दमननें रागीट स्वरांत मध्येंच विचारलें.

"दमन, किती मत्सरी तुम्ही पुरुष ! आम्हां बायकांना व्यर्थ दोष देतां." रुबी मृदु शब्दांत पुढें म्हणाली, "माझं ऐक तरी पुढं. कांहीं दिवसांनीं मी हळुहळु त्याची आठवण विसरलें. पुढं कांहीं वर्षांनीं कॉलेजांत आल्यावर तुझी माझी मैत्री जमली. ती कशी झाली हें तुला माहीतच आहे. दमन, कोणत्याही गोष्टीचा अभिलाष कां धरायचा ? सुखाकरतांच ना ? मग सुखाकरतां आयुष्य मातीमोल करून दुःख भोगण्यांत काय हांशील आहे ?"

तिच्या भाषणांतील मथितार्थ दमनाला सारखासा समजत नव्हता. हँगिंग-गार्डनवर किंवा समुद्रावर बसून चांदण्या रात्रीं तिला हृदयाशीं धरून आपण विचारलं होतं, "रुबी, तूं माझ्याशीं विवाह करशील ना ?"

त्या वेळीं ती नेहमीं आपल्याला अधिकच बिलगून उत्तर देत होती, "दमन, तोच तोच प्रश्न पुन्हां पुन्हां कां विचारतोस ? त्यापेक्षां कांहींतरी उदात्त, अधिक प्रिय असं मी देत आहें असं नाहीं का वाटत तुला ?"

रुबी त्या प्रश्नाचें उत्तर असें कां देत होती त्याचा उलगडा आतां त्याला झाला होता. जर त्या वेळीं रुबी वाग्दत्त वधु होती हें आपल्याला समजलें असतें तर आपण तिचा सहवास तात्काळ सोडला असता असेंच तो आपल्या मनाला सांगूं लागला.

दमन विचारमग्न आहे असें पाहून ती किंचित् पुढें सरकली व त्याच्या खांद्यावर हलकेच आपला हात ठेवून म्हणाली, " चांदणं किती सुंदर पडलं आहे ! दमन, किती हट्टी तुझा स्वभाव हा ! बाहेर तरी पहा एकदां. उमर खय्याम तूं वाचला आहेस ना ? "

त्या फारशी काव्याचे एक दोन चरण ती गुणगुणूं लागली.

" रुबी, रुबी, तूं विवाहित आहेस ! " दमन आपल्या मनाला आवरण्याचा आटोकाट प्रयत्न करीत आर्तस्वरांत म्हणाला.

" आणि मी लग्नापूर्वी अविवाहित होतें, " रुबी त्याचा हात दोन्ही हातांनीं एकदम पकडून पुढें म्हणाली, " दमन, तुझ्याशीं विवाह करणं मला सर्वस्वी अशक्य होतं. तुझा धर्म निराळा, माझा निराळा. माझे बाबा गिरण्यांचे मालक तर तूं साम्यवादी. दमन, विचार कर तूं, आमचा विवाह म्हणजे एका युद्धाचा प्रारंभ आणि दुःखी जीवनाची प्रस्तावना ठरली असती. आमच्या दोघांच्या जीवितालाही कदाचित् धक्का पोहोंचला असता. ज्या सुखाकरतां आपण विवाह केला असतां त्याच सुखाला आपण पूर्णपणें अन्तरलों असतों. "

तिच्या भाषणामुळें दमन विचारमग्न झाला होता. पण अल्पावधींतच मान वर करून तो म्हणाला, " प्रेमाखातर सुखाचा त्याग करायला आपण—"

" माझं ऐक अगोदर, " रुबी त्याच्या तोंडासमोर हात धरीत म्हणाली, " दमन, प्रेमभावनेचा भलताच उदोउदो करण्यांत काय अर्थ आहे ? प्रेम आणि त्याग ह्याची उगाच सांगड बांधतोस तूं. दमन—"

बोलतां बोलतां ती एकदम थांबली. आपल्या हातांत असलेला त्याचा हात तसाच हातांत धरून ठेवून ती प्रेमळपणें म्हणाली, " दमन, मजकडे पहा. माझी शादी झाल्यावर तूं कधींच दुसऱ्या तरुणीबरोबर

फिरला नाहींस का ? खरं सांग मला, आणि तसा एखादा मनुष्य जर चुकून आढळलाच तर खरा प्रियकर म्हणून त्याचे गोडवे कोण गाईल ? तो मानसिक दौर्बल्याचा एक नमुना नाहीं का वाटत तुला ? तुझा आवडता कवि शेले खरं प्रेम शोधीत होता. आणि ह्या खऱ्या प्रेमाच्या वेडगळ कल्पनेमुळंच त्यानं अनेक स्त्रिया केल्या आणि मग त्यांचा त्याग करून शेवटीं दुःखानें रडत मेला."

तिनें दमनची हनुवटी उचलून आपल्याकडे त्याची दृष्टी वळविली व मधुर हास्य करीत त्याचा हात हृदयाशीं गोंजारला.

"रुबी, जाऊं दे मला," तो उगाच म्हणाला, "तुझं म्हणणं योग्य असेल. मला त्याचा विचार केला पाहिजे."

"दमन, विवस्त्र सत्याला एवढा कां घाबरतोस ?" त्याच्या खांद्यावर आपलें मस्तक ठेवून ती म्हणाली, "आपला हा सहवास तुझ्या कमलेला कळणार नाहीं किंवा माझ्या पतीलाही समजणार नाहीं. आपल्या हृदयांत परस्परांविषयीं असलेला प्रेम–प्रवाह अजूनही आटला नाहीं. आपण त्याचा पुन्हां एकदां मधुर आस्वाद घेऊं या."

"पण आपण त्यांचा विश्वासघात करीत नाहीं का ?" दमननें पुन्हां विचारलें.

"दमन, खरंच किती किती भित्रा तूं !" एकदम त्याच्या मानेभोंवतीं आपले हात दृढ करून ती म्हणाली, "विश्वासघात कसला त्यांत ? त्यांच्या स्वार्थी वेडगळ कल्पनेवर आपण बिलकूल घाला घालीत नाहीं. शिवाय साऱ्या जगानं आमचा हा घात केला त्याचं उत्तर काय ? माझा पति तरी माझ्या दृष्टीआड काय करीत असतो ? दमन, आपण त्या दोघांच्या मनःस्वास्थ्यांत कुठं बिघाड आणतों आहों ?"

दमन रुबीच्या अधिक अधिक स्वाधीन होत होता तरी त्याच्या हृदयांत हजारों विचारांची निकराची लढाई चालली होती. रुबीच्या भाषणाचें पृथःकरण करण्याइतकी त्याची मनःस्थिती बिलकूल नव्हती. ती एक कृत्या आहे. आपल्या वासनांवर ती पांघरूण घालते आहे. या वेळीं तिला झिडकारण्याचें सामर्थ्य आपल्याला येईल तर किती चांगलें होईल !

असे विचार करतां करतांच तिच्या कम्बरेभोंवतीं त्याच्या हातानें विळखा घातला. कमला काय म्हणेल, हादेखील अस्पष्ट विचार त्याच्या मनांत येऊन गेला.

रुबी दमनच्या गालावर आपल्या हाताचे पंजे ठेवून प्रणयी दृष्टीनें त्याच्याकडे पाहून आर्द्र स्वरांत गुणगुणली, "दमन, माझा तूं उगाच तिरस्कार करतोस. माझ्या हृदयांत किती मोठा प्रीति निर्झर आहे! माझं हृदय फाडून पहा खोटं वाटत असेल तर."

तिनें दमनचें मस्तक आपल्या वक्षःस्थलावर ठेवलें. त्याला दोन्ही हातांनीं घट्ट हृदयाशीं धरून त्या असह्य भावनेमुळें अडखळत ती निश्वास सोडीत होती. दमन एखाद्या असहाय्य कैद्याप्रमाणें तिच्या बाहूपाशांत राहिला होता. तशा स्थितींत कांहीं वेळ गेल्यावर तो कसेंबसें पुन्हां म्हणाला, "रुबी, माझ्याशीं तूं किती बेइमान झालीस! मला तुझा अतिशय राग आला होता." रुबी प्रेमातिशयानें जोरानें त्याचें चुंबन घेऊन कौतुकानें म्हणाली, "पण आतां तो राग गेला ना? दमन, लाडक्या, किती खुळा आहेस रे तूं! आतां तर मीं सर्वस्वीं तुझ्या मालकीची आहें ना? मी तुझ्या कमलबद्दल विचारलं का तुला? मनाच्या भलत्या समजुतीचं उगाच कोड-कौतुक कशाला करायचं? पहा, चंद्र तुला कसा हंसतो आहे तो!"

दमननें आकाशाकडे पाहिलें. चंद्रमा आगगाडीशीं स्पर्धा करीत आपल्या लवाजम्यासह धांवत होता. गाडी बेफाट गतीनें पुढें पळत होती. वाऱ्याच्या झोतापुढें रुबीचा पदर सारखा फडफडत होता. मधूनच गाडी एखाद्या लहानशा पुलावरून जातांना होणारे मोठाले पोकळ आवाज ऐकूं येत होते. तुफान वाऱ्यामुळें हालावें त्याप्रमाणें लहान लहान वृक्ष तिच्या वेगामुळें डोलत होते. मधूनच गाडी अफाट मैदानावरून आपला मार्ग आक्रमीत होती तर पुन्हां कांहीं वेळ काळ्याकुट्ट बोगद्यांतून ती धांवत होती.

कांहीं वेळ स्तब्ध राहून दमन तिच्या गालाचें चुंबन घेऊन म्हणाला, "रुबी, तूं कितीही जरी सांगितलंस तरी माझ्या हृदयावर झालेल्या जखमा बऱ्या व्हावयाच्या नाहींत."

रुबी कांहींच बोलली नाहीं. तिनें आपले ओंठ दमनच्या ओंठांवर गच्च दाबून त्याला दृढालिंगन दिलें. जणू काय आपला देह त्याच्या देहांत विलीन करून दोन्ही जीवांचें एकीकरण करण्याचा ती प्रयत्न करीत होती. दमननेंही तिचा हेतु ओळखूनच तिला आपल्या बाहूपाशांत गच्च धरली होती, त्या घट्ट मिठीमुळें होणाऱ्या यातनाही रुबीला मधुर वाटल्या. परस्परांच्या हृदयाची धडधड त्यांना स्पष्ट ऐकूं येत होती. दमन तिची नाजूक मान दोन्ही हातांनीं कांहींशी दाबून म्हणाला, "तुला अशी गळा दाबून मारावी असंच वाटतं."

त्या धमकीचा अर्थ समजून रुबीनें आपल्या हातानीं त्याचे आपल्या गळयाभोंवतीं असलेले हात दुर्बल सामर्थ्यानें अधिकच दाबण्याचा प्रयत्न केला.

"मेरी जान दमन, आपण कुठं आहों आज? मी वेडी होईन आतां दमन! चंद्र आपला किती मत्सर करीत असेल!"

ती अतिशय प्रेमार्द्र दृष्टीनें त्याच्याकडे पहात स्निग्धपणें बोलत होती. दमनच्या दृढालिंगनांत गुदमरणाऱ्या जीवाला क्षीणता आल्यामुळें तिनें आपला शरीरभार त्याच्या अंगावर टाकला. दमनचे चंचल हात तिच्या अंगावरून सैरावैरा धांवत होते. त्यानें तिच्या मुखकमलाचें व अधराचें पुन्हां पुन्हां चुंबन घेऊन म्हटलें, "रुबी, तूं मला किती फसवितेस? माझ्या प्रेमाचा तूं धिक्कार केलास!"

"दमा जिवलगा, तुझ्या प्रेमासाठीं—वेड्या, तूं आतां अगदीं बोलायचं नाहीं. तूं कमलेवर प्रेम करतोस ना?"

"पण रुबी, प्रथम तुझ्यावर प्रेम केलं होतं!"

"पण आतां कशाला बोलतोस तें?" असें म्हणून तिनें त्याच्या अधरांचें चुंबन घेऊन आपल्या वक्षभागावर त्याचें मस्तक आधारलें. हात वर करून तिनें स्विच् खालीं करून दिवा विझविला. त्याचा चेहरा गोंजारून तिनें त्याला आपल्या हृदयाशीं अधिकच ओढला.

गाडी सारखी धांवत होती. रुबीच्या धडधडणाऱ्या हृदयाचे आवाज दमनच्या कानांवर सारखे आघात करीत होते. गाडीचे व ते

आवाज एकमेकांशीं जुळून हृदयांत गुणगुणऱ्या प्रेम-गीताचा ताल धरता आहेत असें त्याला वाटलें. गाडी रुळावरून जात नसून आपण अन्तराळींच तरंगतों आहों असें त्याला भासलें. अर्धोन्मीलित नजरेनें त्यानें खिडकीबाहेर पाहिलें. डोंगर माथ्यावरून गाडी जात होती. खालीं खोल वृक्षमय दरी पसरली होती व त्याच्यावर चंद्राचें मृदु रुपेरी चांदणें पसरलें होतें. गाडी "That is it ! That is it !! असें सारखें बडबडत आपणाला चिडवीत आहे असेंच दमनला वाटलें. चंद्रदेखील आपल्याला हंसतो आहे अशा समजुतीनेंच कीं काय त्यानें खिडकी बंद केली व आपण हें सारें स्वप्नच पहात आहों अशा कल्पनेनें त्यानें डोळे मिटले.

हृदयांत उत्पन्न होऊन विद्युत् वेगानें सर्व शरीरभर खेळणाऱ्या मधुर प्रेमलहरीचा आस्वाद घेत रुबी त्याच्या केंसावरून हात फिरवीत स्तब्ध होती. अगदीं न कळत तिला आपल्या पतीची आठवण झाली. इतक्यांत दमननें प्रश्न केला.

"रुबी, तुझा पती कसा आहे ?"

रुबी एखाद्या निद्रित मनुष्याप्रमाणें हंसून त्याचे बाहु कुरवाळून म्हणाली, "दमन, किती मत्सरी तुम्ही पुरुष ! माझे पतिराज सज्जन आहेत. माझ्यावर ते प्राणापलीकडे प्रेम करितात. ते फार समंजसही आहेत. पण त्यांचं दुसरं कुठं प्रेमस्थान नसेल असं नाहीं. पण आतां कशाला त्या गोष्टी ! रुबी ह्या वेळीं सर्वस्वी तुझ्या आधीन आहे. दमन, दया—"

रुबीनें त्याचा चेहरा वर करून त्यावर आपले ओंठ जोरानें दाबले. क्षणमात्रांत मूर्च्छा आल्याप्रमाणें तिचें शरीर शिथील झालें. दमन तिच्या कम्बरेभोंवतीं विळखा घालून वक्षःस्थलावर मान ठेवून स्तब्ध राहिला होता.

रुबी ही अलौकिक स्त्री आहे कीं साऱ्या स्त्रिया खरोखरी अशाच असतात, हा विचार त्याच्या मनांत चालला होता. सर्व संवेदना नाहींशा झाल्याप्रमाणें त्याचें सारें शरीर सुन्न होऊन हृदय सारखें धडधडत राहिलें होतें. रुबीचा मधून मधून सुटणारा दीर्घ श्वास त्याच्या भालप्रदेशावर जाणवत होता. त्याचें मस्तक तिच्या वक्षःस्थलाच्या उत्सारणा

व पतन यामुळें आंदोलित होत होतें. दमननें किंचित् हालचाल करतांच आपला प्रियकर निघून जाईल या अन्तस्थ भीतीनें आपल्या दोन्ही हातांनीं त्याचें मस्तक गोंजारून रुबीनें त्याच्या पाठीवरून हात फिरविले व अडखळत दीर्घ श्वास सोडून ती गुणगुणत म्हणाली "गुड नाईट, डार्लिंग."

दमनची कल्पनाशक्ति गाडीच्या कितीतरी पट वेगानें धांवत होती. गाडीही सारखी आपला मार्ग काढीत जोरानें पळत राहिली होती. डोंगरमाथ्यामागें चंद्र मावळत होता. थंडगार वारा सुटला होता. गाडीच्या नियमित होणाऱ्या आवाजाशिवाय सर्वत्र शांतता होती.

---



दमन जागा झाला त्या वेळीं रात्रीं घडलेल्या प्रकाराची त्याला आठवण झाली. गाडीच्या खिडकींतून त्यानें बाहेर पाहिलें तो आकाशांत चांदण्या लुकलुकत होत्या. परंतु पूर्व दिशेला चमकणाऱ्या तारका विरळ आणि निस्तेज दिसत होत्या. यामुळें पहांटेचा प्रहर झाला असावा हें त्याच्या सहज लक्षांत आलें. बाहेर बराचसा गारठा होता.

साफ डोळे उघडून त्या अस्पष्ट प्रकाशांत त्यानें सभोंवार पाहिलें. रुळालगतच्या दिव्याचा प्रकाश कांहीं काल आंत चमकला. तेवढ्या वेळांत रुबी अर्धवट विवस्त्र स्थितींत आपल्या शेजारीं अस्ताव्यस्त झोंपी गेल्याचें त्यानें पाहिलें. दमननें किंचित् मान वर करून निरखून तिच्याकडे पाहिलें. तिला गाढ निद्रा लागली होती. चेहरा कांहींसा सचिंत झाला होता. तिच्या लांब केंसाची वेणी बिछान्यावर रुळत होती. तिचा मासल बाहू दमनच्या गालावर दबला होता.

इतक्यांत झोंपेंतच कुशीवर वळतांना तिनें दमनच्या छातीवर आपला नाजूक हात टाकला. श्वासोच्छ्वासाबरोबर तिच्या उत्सरणं होणाऱ्या उरोभागाचा स्पर्श त्याच्या भालप्रदेशाला जाणवत होता.

आपण पुन्हा प्रणयानें हिच्या आधीन होऊं म्हणून या परिस्थितीं-तून झटकन् निसटणें आवश्यक आहे असा मनाचा निर्धार करून दमन हलकेच उठला. ती गाढ झोंपली आहे असें पाहून त्यानें पोशाख करण्यास सुरवात केली. ती हालचाल करूं लागली म्हणजे तो स्तब्ध रहात होता. पुन्हा ती स्वस्थ झोंपली आहे अशी खात्री झाल्यावर तो बूट चढवूं लागला तोंच हातांतील हॉर्नें खालीं पडून खळकन् आवाज झाला. एकदम तो दचकून उभा राहिला. पण अजूनही रुबी निद्रावश होती.

त्यानें हळूच आपली बॅग व बिछाना एकत्र केला. हातांतील विजेची टॉर्च पेटवून प्रकाशाचा झोत जमिनीवर पाडीत त्या अंधुक प्रकाशांत त्यानें रुबीकडे दृष्टी वळविली.

ती गाढ झोंपली होती. तिचें त्या वेळचें सौंदर्य मोहक होतें. आपण एखादें चौर्य कर्म करीत आहों अशा भीतीनें त्यानें चटकन् दिवा विझ-विला व पायाजवळ पडलेली लोकरीची शाल रुबीच्या अंगावर घातली.

इतक्यांत गाडीचा वेग कमी होत असल्याचा त्याला भास झाला. खिडकींतून मान बाहेर काढून त्यानें पाहिलें तो कोणत्या तरी स्टेशनवरील दिवे दिसत होते. जसें कांहीं आपलें उतरावयाचें स्टेशन आलें अशा रीतीनें त्याची चळवळ सुरू झाली होती.

रुबीकडे त्यानें बारकाईनें पाहिलें. ती अजूनही स्वस्थ निजली होती. त्यानें चटकन् खिशांतून डायरी काढली व तिचें एक पान फाडून फाऊन्टन पेननें त्यानें लिहिलें, " Excuse me, Ruby. "

इतक्यांत गाडी स्टेशनच्या आवारांत शिरून प्लॅटफॉर्मसमोर उभी राहिली. पहिल्या वर्गाच्या डब्याचें दार उघडलेलें दिसतांच हेलकरी धांवत आला. दमननें सामान त्याच्या स्वाधीन करून लिहिलेली चिठ्ठी रुबीच्या उशीजवळ सावधपणें ठेवली. एक वेळ तिच्या मोहक गालाचें चुंबन घेऊन तिचा निरोप घ्यावा असेंही त्याला वाटलें. परंतु त्यानें तो मोह आवरला व डब्यांतून खालीं उतरला. हमाल स्टेशनच्या फाटकापाशीं पोहोंचला होता.

एकदम दमनच्या मनांत परस्परविरोधी विचाराचें युद्ध सुरूं झालें. आपण निष्कारण ही भ्याड वृत्ति स्वीकारतों आहों, पुन्हा गाडींत जाऊन बसावें असेंही त्याला वाटलें. काय करावें व काय करूं नये अशा दिङ्मूढ परिस्थितींत तो क्षणभर उभा होता, एवढ्यांत गार्डानें शिटी वाजविली व हातांतील हिरवा दिवा वर करून दाखविला. गाडी शीळ फुंकून हळुहळू चालू झाली.

दमन प्लॅटफार्मवर उभा राहून फर्स्ट क्लासच्या डब्याकडे पहात होता. पण रुबीनें खिडकीवाटे पाहिलें नाहीं. अजूनही ती झोंपली असेल अशी कल्पना करीत तो उभा होता.

गाडी निघून गेल्यावर समोर पूर्व दिशेला तांबडें फुटत होतें. दिशा उजळल्या होत्या. दमनला तो पहांटेचा समय अतिशय स्वागतार्ह वाटला. आपल्या डोळ्यांपुढील गेल्या रात्रीचा प्रसंग उगवत्या दिवसांत दडून जाईल असें वाटून तो पूर्व क्षितिजाकडे पहात होता.

आपण केलेलें कृत्य असत्याचरण कीं सत्याचरण हें कोडें सोडविण्याचा त्यानें मनाशीं जोराचा प्रयत्न चालविला होता. आपण अन्याय्य कृत्य केलें अशा समजुतीनें त्याला एक वेळ पश्चात्ताप होत होता; रुबीच्या मोहांत आपण सांपडलों आणि एका रात्रींत स्वाभिमान आणि सात्विक वृत्ति झुगारून रुबीसारख्या चंचल स्त्रीच्या सर्वस्वीं आधीन झालों या विचारानें तो अतिशय खिन्न झाला. आपल्या उदास मनाला तो आश्वासन देत होता.

मनुष्य अनेक व्यक्तींवर प्रेम करतो अगर भिन्न भिन्न परिस्थितींत भिन्न भिन्न व्यक्तींबद्दल त्याला प्रेम वाटत असतें ही गोष्ट अगदीं स्वाभाविक असून त्यांत लांच्छनास्पद असें कांहींच नाहीं. मात्र काव्य, कादम्बरी, कथा इत्यादि साहित्यकलांमधून या प्रेमभावनेचा भलताच उदोउदो करून मनुष्यानें तिचें भलतेंच स्वरूप भासविलें आहे. दमनच्या दृष्टीपुढून त्याच्या जीवनांतील प्रत्येक स्त्रीची प्रतिमा जाऊं लागली. आयुष्याच्या वेगवेगळ्या अवस्थेंत निरनिराळ्या स्त्रियांबद्दल आपण आस्थेच्या प्रेम–भावना, निदान स्वकीयता तरी बाळगली होती तीच प्रेम–भावना परस्परांच्या निकट सहवासांत वाढून व्यक्त करण्याची अकल्पित परिस्थिती आल्यामुळें एखाद्या व्यक्तीनें अन्याय्य वर्तन केलें असे आपण कां म्हणावें ? सारें जग ढोंगी आणि भ्याड आहे व आपल्या सरळ आचरणाला आणि धीर वृत्तीला निंदून स्वतःच्या दोषावर व दुबळेपणावर पांघरूण घालण्याचा प्रयत्न करीत आहे. अशा जगाची दिक्कत आपण कां बाळगावी असेंच तो मनाला सांगत होता. इतकें कशाला ? आपल्याला आदरणीय वाटणाऱ्या कांहीं महान् व्यक्तींच्या आत्मचरित्रांतदेखील त्यांनीं मोकळेपणानें आपला अनेक स्त्रियांशीं घडलेला सहवास, संबंध स्पष्टपणें कबूल केला आहे. जर जगांतील अद्वितीय व्यक्तीदेखील ह्या समाज-नीतीनें दोषी ठरतात तर सारा

व्यवहारी समाज किती ढोंगी असला पाहिजे, अशा रीतीनें त्याच्या विचारांचा ओघ जात होता.

आपण केलेल्या कृत्याचें समर्थन करण्याकरतां आपण हें नीतीचें पृथक्करण करीत आहों म्हणूनच आपल्या पक्षपाती मनाला हा काकतालीय न्याय योग्य दिसत असावा असेंही त्याला वाटलें. मध्येंच तो आपल्याशीं म्हणत होता, "माझ्या हातून खरोखरच पाप घडलं. मी तो मोह झिडकारला पाहिजे होता." कमलेशीं आपण प्रतारणा तर केली नाहीं ना ? या प्रश्नाचें उत्तर तो देऊं लागला. पण आपण खरोखरच तिचा कसला तोटा करतों आहों ? तिच्या मानसिक सौख्यांत यामुळें थोडाच बिघाड येतो ? तिला फसविण्याबद्दलचा आपल्यावर येणारा आरोप खोडण्याचा त्यानें प्रयत्न केला. त्याच्या मनांत साम्यवादाची कल्पना आली. कमला आपल्याला पूर्णपणें स्वतःचा समजते आणि हा Private Property Instinct असून तीच ह्या सर्व नीति-कल्पनांना पोषक आहे असाही सिद्धान्त त्यानें क्षणभर मनाशीं मांडला.

प्लॅटफॉर्मवरील बांकावर बसून दमन सारखा विचार करीत होता. आतां साफ उजाडलें होतें. थोड्याच वेळांत उगवत्या सूर्याचे कोंवळे किरण सरळ त्याच्या तोंडावर पडूं लागले. तेव्हां तो विचारतंद्रींतून जागा झाला. भालप्रदेशावर आलेला केशकलाप मागें सारून तो बांकावरून उठला. मनगटावरील घड्याळांत पाहून त्यानें पुढची सोईस्कर गाडी कोणती आहे हें वेळापत्रकांत पाहिलें, तों गाडीला अजूनही सहज दीडदोन तास अवकाश होता. म्हणून क्लोक रूममध्यें सामान टाकून शहरांतून फिरून येण्याचा त्यानें बेत केला. वेटिंग रूममध्यें जाऊन बॅगमधून साबण व टावेल घेऊन त्यानें नळावर तोंड धुतलें व डोळ्यावर बराच वेळ पाण्याचा वर्षाव करून जागरणामुळें आलेला शीण घालविण्याचा प्रयत्न केला. थंड पाण्याच्या स्पर्शामुळें त्याला पुष्कळसें बरें वाटलें. डोक्यावर पाणी शिंपडून त्यानें केसाचा व्यवस्थित भांग पाडून ते वळवून मागें बसविले. गेल्या रात्रीचा प्रकार आपण विसरलोंच असें मनाला भासविण्याच्या हेतूनें तो शीळ घालूं लागला. एका इंग्रजी पदाची ती शीळ ऐकून स्टेशनवरील एक अँग्लोइंडियन रेल्वे नोकर ती एकाग्रतेनें ऐकत होता.

दमन लवकरच पोशाख करून स्टेशनच्या फाटकाबाहेर आला व जवळच उभी असलेली टॅक्सी करून तो फिरावयास निघाला.

टॅक्सींतून जातांना दिसणारे रम्य देखावे त्याच्या नजरेंत भरत नव्हते. मोटारमधून सहल करून आल्यावर आपल्याला बरें वाटेल या विचारानें तो बाहेर पडला होता. पण रुबीचे ते प्रणयी शब्द, ती प्रेमार्द्र दृष्टी आणि तो उन्मादक सहवास त्याच्या डोळ्यापुढें सारखा उभा रहात होता.

या वेळीं शशिधर जवळ असता तर आपल्याला किती समाधान वाटलें असतें. आपण झालेला सारा प्रकार खुल्या दिलानें त्याला सांगितला असता. त्यानेंहि आपण या प्रकाराला निष्कारण एवढें महत्त्व देतों आहों असें म्हणून आपल्या घाबरट मनाची थट्टा केली असती. त्याचे ते चार सहानुभूतीचे शब्द किती उत्साहजनक वाटले असते! अशा प्रकारचे विचार येतांच त्याला पुन्हां मुंबई गांठावी असेंच क्षणभर वाटलें.

"साब, अबी किदर जाना?" असें ड्रायव्हरनें विचारतांच तो विचारमालिकेंतून जागा झाला.

"गाडी एक घंटा चालू रखना और फिर स्टेशनपर जाना."

"जी साब" ड्रायव्हरनें उत्तर देऊन मोटारचा वेग वाढविला.

शहराबाहेर मोटार येतांच दमनला किती तरी बरें वाटलें. गाडी टेकडीच्या बाजूनें वर चढत होती व खालीं तिच्या पायथ्यालगत लहानशी नदी वहात होती. त्या संथ पाण्यांत कांठावर असलेल्या वृक्षांचें सुंदर प्रतिबिंब पडलें होतें. मधून मधून संत्राचे सुंदर बगीचे सभोंवार पसरलेले दिसत होते. त्यावर प्रातःकालीन सूर्याचे कोंवळे किरण पडल्यामुळें संत्रें अधिकच मोहक दिसत होतीं.

मोटार जसजसी टेकडी चढत होती तसतसा सभोंवार पसरलेला हिरवागार विस्तीर्ण प्रदेश नजरेसमोर येत होता. स्टेशनच्या जवळ वसलेल्या शहरांतील टुमदार बंगले मधून मधून झाडांमधून दिसत होते. क्षितिजापर्यंत पोहोंचलेल्या आगगाडीच्या रुळावर मालगाडी लहान मुलाच्या खेळण्याप्रमाणें धांवत होती.

दमन त्या देखाव्याकडे पहात सारखा विचार करीत होता. रुबी-बद्दल पुन्हा पुन्हा मनांत उद्भवणारे विचार त्यानें बळजबरीनें अनेक वेळां घालविण्याचा आटोकाट प्रयत्न केला. पण हा त्याचा अट्टहास कांहींसा विचित्रच होता.

हा प्रकार कमलेशीं विवाह होण्यापूर्वी तिला कळविला पाहिजे म्हणजे आपण मोकळे झालों असें त्यानें मनाशीं ठरविलें. पण कमला ही कृति क्षम्य समजून विसरेल कीं स्त्रिया स्वभावतःच मत्सरी असतात या सर्व-साधारण नियमाप्रमाणें आपल्याला ती पतित दुराचारी व विश्वासघातकी ठरवून आपला संबंध कायमचा तोडून टाकील, हें निश्चित ठरविणें त्याला कठीण वाटलें. कमला एवढी उदार बुद्धि दाखविणार नाहीं का ? पण शशिधर नेहमीं म्हणतो कीं प्रियकरानें अन्य स्त्रीशीं झालेला सहवास आपल्या प्रियतमेजवळ कबूल केला तर त्याच्या मनाच्या औदार्याबद्दल आदर न बाळगतां सामान्यतः त्याहून अधिक कांहीं तरी रहस्य असलें पाहिजे अशी साशंक वृत्ति तिच्या मनांत सदैव राहते आणि म्हणूनच प्रत्येक पुरुषानें आपल्या प्रिय स्त्रीपासून कांहीं गोष्टी गुप्त राखणें किंवा असत्य भाषण करणें अगदीं आवश्यक असतें.

शशिधरच्या त्या विधानाबद्दल तो त्याची नेहमीं थट्टा करीत असे. पण या वेळीं त्याला त्यांत कांहीं तरी सत्यांश आहे असें वाटूं लागलें. पण घडलेला प्रकार कमलेपासून आपण गुप्त ठेवला व पुढें तिला सर्व प्रकार कोणत्यातरी मार्गानें समजला तर तिच्या दृष्टीनें आपण अधिकच दोषी ठरणार. यापेक्षां सत्यकथनाचा मार्ग स्वीकारून त्याचे परिणाम भोगण्यास सिद्ध असावें असाच त्यानें मनाशीं निश्चय केला.

आपलें लक्ष दुसरीकडे वेधलें जावें या हेतूनें तो ड्रायव्हरशीं बोलूं लागला.

पहांटेच्या प्रहराला असें सुंदर गिऱ्हाईक मिळालें यामुळें तो अति-शय खूष झाला होता. साहेब तरुण आहेत व हौशी दिसतात म्हणून त्यानें माहिती सांगण्यास सुरवात केली.

“साहेब, इथं लष्कराची पलटण असल्यामुळं पुष्कळ क्लब आहेत. इथं शाळा. कॉलेजं पण आहेत. साहेब लोकांनीं इथं सारा गोंधळ माज-

विला आहे. इथल्या एका शेटजीची बायको गोऱ्या सोजिराबरोबर पळून जात होती. त्या वेळीं मी ही गाडी नुकतीच आणली होती. मी गाडी अशी भरधांव सोडली म्हणतां! साहेब, तो सोजीर पण धाडसीच होता. त्यानें पण बेफाम गाडी सोडली. शेवटीं मी गाडी पुढें काढली आणि त्याला अडवलाच."

"पण शेटजीची बायको आपण होऊनच गेली होती का त्याच्या-बरोबर ?" दमननें मध्येंच प्रश्न केला.

"तें कसं कळायचं साहेब ? पण ती अशी पळून जायला लागली तर तें शेटजीला कसं खपेल? ती आपण होऊनच त्याला बिलगली म्हणून काय झालं ? अब्रूचा प्रश्न आहेच कीं नाहीं ? घरांत कांहीं शिजलं तरी हरकत नाहीं. पण हे मोठे लोक चवाठ्यावर कांहीं आणूं द्यायचे नाहींत."

रुबीच्या नवऱ्यालादेखील असेंच वाटत असेल का ? असा विचार दमनच्या मनांत चमकून गेला.

ड्रायव्हर पुढें बोलतच होता, "साहेब, ह्या धंदा करूं लागल्यापासून बऱ्या घरचे पोकळवासे मी चांगलेच पाहिले आहेत. कित्येक वेळां ह्या श्रीमंताच्या पोरी अशा गळेपडू असतात! इथल्या कॉलेजांत जाते ती. बाप मोठा जहागिरदार किताबदार आहे. पण ती माझ्या मोटारींत बसायला तयार. मी मागच्या सीटचें दार उघडलें तर ही माझ्या शेजारींच बसते. त्या दिवशीं गळ्याशपथ साहेब, तिनें माझ्या पाठीमागं हात टाकल आणि म्हणाली, 'चलो, कैलास टेंकडीपर जाने देव.' साहेब, रात्रीची वेळ. ह्या श्रीमंताच्या पोरी सहीसलामत सुटायच्या पण आमच्या हातांत मात्र बेड्या पडायच्या. मी म्हटलं "बाईसाब, पेट्रोल कमती है और बॅटरी भी चलती नही," पण ती कुठली ऐकते ? ती म्हणाली "कुच फिकीर नहीं. जीतनी जा सकती है उतनी ही चलो. पोलीस लोगोंको मैं बोलूंगी." मग काय करणार साहेब ?"

एवढें बोलून ड्रायव्हर मोठ्या दिमाखानें गालांतच हंसला व चक्रावरील एक हात उचलून त्यानें आपल्या मागें वळविलेल्या लांब केंसावरून फिरविला.

दमनला त्याच्या प्रौढीची बिलकुल मौज वाटली नाहीं. असल्या लोकांच्या बोलण्यावर कितपत विश्वास ठेवावा याबद्दल साशंक असणाऱ्या दमनला त्याच्या भाषणांत असत्यपणा वाटला नाहीं. कारण रुबीसारखी लक्षाधिपतीची छानछबेली सुंदर पोरगी आपल्यासारख्या मध्यम वर्गाच्या तरुणाविषयीं इतकी आसक्ती दाखविते मग ह्याचें भाषणदेखील असत्य कां म्हणावें असेंच त्याला वाटलें. पण उत्सुकता दाखवून आपण त्याच्या वाचाळतेला वाव देऊं नये म्हणून तो एकदम म्हणाला, " एका चांगल्या हॉटेलकडे गाडी घे. मला चहा घ्यायचा आहे. "

" जी साब, " असें म्हणून ड्रायव्हरनें डाव्या बाजूच्या रस्त्याला गाडी वळविली.

कांहीं वेळानें दमन परत स्टेशनवर आला. गाडी येण्यास थोडाच अवधी असल्यामुळें तो घाईनें मोटारचें भाडें देऊन स्टेशनच्या आवारांत शिरला. समोर सिग्नल पडला होता. स्टेशन-मास्तरच्या ऑफिसांत टेली-फोनची घंटा मधून मधून वाजत होती. दूर अन्तरावर गाडीही दिसूं लागली.

येणाऱ्या गाडींत कदाचित् रुबी असेल असा विचार त्याच्या मनांत आला व आपल्या मानसिक दौर्बल्याबद्दल त्याला कींव आली. तिनें दिलेलें पहिल्या वर्गाचें तिकीट फेंकून देऊन आपण थर्ड क्लासांत चढावें असें त्याला वाटलें. पण त्याच तिकिटावर आपण येथवर प्रवास केला आणि आतांच आपला स्वाभिमान जागृत व्हावा याबद्दल त्याला नवल वाटलें. एवढ्यांत हमालानें गाडीचा दरवाजा उघडा धरून "साहेब, सामान ठेवलं. " असें लवून मुजरा करीत म्हटलें. दमन त्याच्या हातावर पैसे ठेवून गाडींत चढला.

" कशाला मी लाहोरला जायचा बेत केला कुणास ठाऊक. " असें गुणगुणून त्यानें बांकावर अंग टाकलें. गाडी शीळ फुंकून चालू झाली. तो पुन्हा हताशपणें आपल्याशींच पुटपुटला, " Damn it. "

गाडी धांवतांना " Damn it! Damn it!! " असे आपल्या उच्चाराचें प्रतिध्वनि करीत आपल्याला चिडवित आहे असेंच वाटलें त्याला.

बाहेरच्या बदलत्या देखाव्याकडे तो खिडकींतून शून्य दृष्टीनें पहात राहिला.

---



दमन लाहोरला आठ दिवस राहिला असेल नसेल तोंच त्याला अनामिकेची तार मिळाल्यामुळें तो घाईघाईनें मुंबईस जाण्यास निघाला. एकंदरींत आपला हा प्रवास मनासारखा होणार नाहीं हें अगदीं प्रथमपासूनच झाल्यासारखें होतें. यामुळें मुंबईत कांहींतरी विपरीत परिस्थिती तर निर्माण झाली नाहीं ना ही चिन्ता त्याच्या मनाला सारखी त्रास देत होती. आपल्या आईच्या प्रकृतीबद्दल नाना तऱ्हेच्या दुष्ट कल्पना त्याच्या मनांत एकसारख्या घोळूं लागल्या. पण अनामिका पाठविलेल्या तारेंत म्हणते कीं "ताबडतोब निघ. घाबरण्याचें कारण नाहीं." यामुळें त्याला कांहींच बोध होईना.

कांहीं प्रवास विमानानें करून दुसऱ्याच दिवशीं तो मुंबईस येऊन दाखल झाला. टॅक्सींतून खालीं उतरून लिफ्टमधून तो वर गेला. त्याच्या हृदयांत अनेक विचारांमुळें कालवाकालव होत होती. कदाचित् ताईनें आपण लवकर परत यावें एवढ्याच हेतूनें तार केली असेल तर आपण तिला एक थप्पड देऊं हा सुखदायक विचार त्याच्या मनांत कांहीं केल्या वावरेना. घंटा वाजतांच ताई आणि आई दारावर येते कीं आपणालाच आईच्या रुग्णशय्येकडे जावें लागतें ह्या शंकेमुळें बटन दाबतांच त्याचें हृदय चरकलें.

थोड्याच अवधींत पावलांची चाहूल लागली. दमन उत्सुकतेनें समोर पहात होता. दार उघडलें. दारांत शकुंतलाबाई स्वतःच उभ्या.

"आई," दमन शकुंतलाबाईंना मिठी मारून म्हणाला, "आई, ताई कुठं आहे?"

"अग अना, हा बघ तुझा दादा आला आहे." शकुन्तलाबाई दमनच्या अंगावरून हात फिरवित म्हणाल्या, "अगोदर न कळवितां एकदम कां आलास?"

इतक्यांत अनामिका आली.

"ताई बोल," दमन प्रेमळपणें तिचा कान पकडून म्हणाला, "कशाला ग तार केलीस मला?

"मी कुठं केली? कांहीं तरीच सांगतोयस दादा," अनामिका पुढें म्हणाली, "कमलेनं केली असेल. माझा कान सोड अगोदर."

"कां आणखी लांब होईल म्हणून घाबरतेस वाटतं?" दमननें हंसत प्रश्न केला.

"पण एखाद्या गाढवाचे कान लांब नसले म्हणून लंबकर्ण ठरायचा थोडाच राहतो तो."

"वा ताई, लांब कानाबरोबर दुगाण्या झाडण्याचा स्वभावधर्म पण दिसतो आहे!"

दमनच्या त्या उत्तरावर अनामिका प्रत्युत्तर करणार होती. इतक्यांत शकुन्तलाबाई मध्येंच म्हणाल्या, "अना, दादाचं चांगलं स्वागत करते आहेस हं."

"पण, आई, अगोदर गोष्ट कुणी काढली? खरंच, स्त्रीला स्त्री-कडून कधीं खरा न्याय मिळाला आहे का?" अनामिका रुसल्याचा अविर्भाव करीत म्हणाली.

"दमा, लाहोरची हवा तुला मानवली नाहीं असं दिसतं." शकुन्तलाबाई त्याच्यांकडे कौतुकानें पहात म्हणाल्या.

"छे आई, कांहींतरीच. माझी प्रकृति बरीच सुधारली आहे असं तूं म्हटलं आहेस कां कधीं?"

"हो दिवसें दिवस तुझ्यामध्यें बरीच सुधारणा होते आहे." अनामिका पुढें म्हणाली, "पण दादा, शशिधर तुझी रोज वाट पहाताहेत. त्यांच्याकडे आपणाला आत्तां गेलं पाहिजे. नॅन्सी पण तुला आल्याबरोबर घेऊन ये असं कालच सांगून गेली आहे."

" चला अगोदर चहा घ्या आणि मग कुठं तीं जा. " असें म्हणून शकुन्तलाबाई सैंपाकघरांत गेल्या.

" दादा, " अनामिका हलक्या स्वरांत म्हणाली, " मीच तुला तार केली. पण आईला यांतील एक अवाक्षरही समजतां नये. "

" म्हणजे ? " दमन आश्चर्यानें उद्गारला.

" मग सांगतें. " अनामिकेनें भीतीनें चौफेर नजर टाकली व तिच्या चेहऱ्यावर एकदम खिन्नता दिसूं लागली. ती कांहींशी घोगऱ्या स्वरांत म्हणाली, " दादा, मला क्षमा करशील ना ? थांब जरा, मग सांगतें. आई येईल इतक्यांत. "

चहा घेऊन झाल्यावर दोघेंही शशिधरच्या खोलीकडे निघालीं. टॅक्सींत अनामिका एकदम रडूं लागली.

"ताई, असं काय ग ?"

"दादा, रजनिकान्ताचा विवाह झालेला आहे."

"कुणी तुला सांगितलं हें ?" दमन आश्चर्यानें उद्गारला.

"शशिधरनीं. शिवाय त्याना दोन मुलेंही आहेत. दादा, रजनिकान्ताबद्दल तूं इतकंसं चांगलं बोलत नव्हतास तेव्हां मला वाईट वाटत होतं. पण ते इतके दुष्ट-नीच आहेत हें आतां मला समजलं. माझा गळा कापायचा बेत होता त्यांचा. "

" पण ताई, त्याच्या कपटी वर्तनाचा स्फोट झाला हें बरं झालं नाहीं का ? "

" दादा, " अनामिका रडत म्हणाली, " मला क्षमा कर. माझ्यावर रागावूं नकोस. पण—"

रडें अनावर झालें. तिच्या तोंडांतून शब्द निघेना. तिच्या प्रेमभावनेचा असा दुर्दैवी अंत झाला, यामुळें ती अतिशय व्याकुळ झाली आहे असेंच दमनला वाटलें.

" ताई " तो प्रेमळपणें हांक मारून म्हणाला, " वेडी का तूं ! विषारी सर्प दंश करण्यापूर्वींच दृष्टीस पडला म्हणून समाधान मानण्या-

ऐवजीं जर मनुष्य दुःख करूं लागला तर तें वेडगळपणाचं नाहीं का ? तुझं प्रेम अस्थानीं होतं हें समजल्यावर तुला आनंद वाटला पाहिजे. अग, रुबीवर एके काळीं मी किती उत्कट प्रेम केलं आणि माझ्या प्रेमाचा अव्हेर करणाऱ्या रुबीचा आतां मला तिरस्कार वाटतो ना ?"

शेवटचें वाक्य उच्चारलें खरें पण आपण साफ खोटें बोलतों आहों असा संशय अनामिकेला आला नाहीं ना अशी शंका येऊन त्यानें तिच्याकडे पाहिलें.

"दादा," अनामिका रडें आवरून मोठ्या धीरानें म्हणाली, "त्यांनीं माझी एक विवस्त्र प्रतिमा रंगविली आहे आणि ती प्रदर्शनांत ठेवण्याकरतां ह्या दोन दिवसांत ते पॅरीसला पाठविणार आहेत."

"ताई !" दमन एकदम आश्चर्यानें ओरडला, "पण तूं त्याला संमति कशी दिलीस ?"

दमनचा चेहरा रागानें एकदम लाल झाला. आपल्या बहिणीची शोकाकुल मुद्रा पाहून देखील त्याच्या क्रुद्ध नजरेंत मार्दव उत्पन्न झालें नाहीं. तो अनामिकेकडे डोळे वटारून रागानें पहात होता. त्याच्या भालप्रदेशावर रुळणाऱ्या केसांच्या झुबक्यामागें उमटलेली रक्तवाहिनी फुगीर दिसत होती. त्या वेळीं रजनिकान्त समोर असता तर आपण काय केलें असतें कोणास ठाऊक असेंच त्याला वाटलें.

"खरंच स्त्रिया किती भाबड्या असतात !" दमन उद्वेगानें म्हणाला, "एखाद्या लुच्चा लफंग्याच्या गोड थापांना भुलून त्याच्या स्वाधीन होतात आणि मग मात्र दुर्दैवाला दोष देतात. पुष्कळ वेळां तुला मी सांगितलं होतं कीं रजनिकान्ताची वर्तणूक संशयास्पद दिसते. तुला तें अगोदर पटलं नाहीं आणि आतां दुराचारी म्हणून त्याच्यावर शिक्का मारतेस."

अनामिका हातानें तोंड झांकून रडत होती. दमन मधून मधून निश्वास टाकीत होता. क्षणभर अनामिकेविषयीं त्याला तिरस्कार वाटला. पण नंतर तिची दया येऊन त्यानें पुन्हां गंभीर स्वरांत विचारलें, "पण रजनिकांताकडून तें चित्र तूं काढून कां घेतलं नाहींस ?"

" ते त्याला अतिशय जपत असतात आणि सहजासहजीं तें चित्र हातचं कधींच सोडायचे नाहींत ते. " अनामिका स्फुंदत म्हणाली " दादा, मला काय कल्पना, ते इतके नीच असतील ही! तुझ्याशीं लग्न करीन असं त्यांनीं वचन दिलं, म्हणून मी त्यांच्या कह्यांत गेलें. "

" चल आतां. शशीला भेटून पुढं काय करायचं तें ठरवूं. "

गाडी शशिधरच्या दवाखान्याच्या रस्त्याकडे वळत होती तोंच बसच्या स्टँडवर शशिधर उभा दिसला. दमननें टॅक्सी थांबविली; आणि त्याला आंत घेऊन म्हटलें " शशी, आम्ही तुझ्याकडेच येत होतों. "

" पण तूं लाहोरहून केव्हां आलास ? " शशिधरनें प्रश्न केला.

" आतांच घरीं गेलों आणि सरळ तुझ्याकडे येतों हा. " दमन पुढें म्हणाला, " चल तुझ्या खोलीवर. तुझ्याशीं पुष्कळ बोलायचं आहे. रजनिकान्ताचा विवाह झाला आहे हें तुला कसं समजलं ? संशय येत होता तसा. चल खोलीवर तिथं सर्व सांगतों. "

" पण अनाताईनं ही गोष्ट एवढी मनाला कां लावून घ्यावी ? उद्यां त्यानं फसवून आणखी कांहीं विश्वासघात केला असता—मग ? यापेक्षां झालं तें ठीक नाहीं का ? " शशिधर पुढें म्हणाला, " आठ दिवसांपूर्वी रजनिकान्त आपल्या एका स्नेह्याच्या ऑपरेशनसाठीं डॉक्टर डेव्हिसनकडे विचारायला आला होता. आम्हीं सर्जिकल वॉर्डमधून जात होतों. तेथें एक उत्तरहिंदुस्थानचा ॲपेंडीसचा पेशंट होता. मी वॉर्डमधून पुन्हां मागें फिरत असतां तो म्हणाला, ' डॉक्टर तुमच्या बरोबर आत्तां रजनिकान्त चित्रकार होते का ? ' मी विचारलें, ' तुमची ओळख कुठची ? ' तेव्हां त्यानें सांगितलें कीं आपण त्याच्या बायकोचा नातेवाईक आहे म्हणून. मी त्याला मग सर्व माहिती विचारली. रजनिकान्ताला दोन मुलेंहि आहेत. मी त्या दिवशीं संध्याकाळींच अनाताईला हा प्रकार सांगितला. खरंच, दगलबाज नीच माणसं अगदीं सज्जनासारखीं दिसतात पुष्कळ वेळां. "

अनामिका पुन्हां रडूं लागली. शशिधरला त्याचें कारण कळेना. दमनदेखील खिन्न दृष्टीनें खालीं पाहूं लागला. तो कांहींच बोलेना. यावरून कांहींतरी विपरीत परिणाम झाला असला पाहिजे असें त्यानें ताडलें.

सर्वजण शशिधरच्या खोलींत गेल्यावर दमननें सर्व प्रकार त्याला सांगितला. बराच वेळ कोणीच बोललें नाहीं. शेवटीं दमन मान वर करून उदासपणें म्हणाला, "मग शशी, तुला काय करावं असं वाटतं?"

"आपण त्याला प्रथम सामोपचारानं सांगून पाहूं कांहीं जमलं तर."

"तो कुठला ऐकायला?" दमन एकदम म्हणाला, "पॅरीसच्या प्रदर्शनांत पाठविण्याच्या लायकीचं तें चित्र असलं तर तो तें सहजासहजीं देईल असं नाहीं वाटत मला."

"दमन, मला वाटतं आपण त्याला कायदेशीर नोटीस देऊं, कीं हें चित्र आमच्या खाजगी मालकीचं आहे आणि तें तुला कुठंही प्रसिद्ध करतां येणार नाहीं. नाहींतर अब्रूनुकसानीबद्दल आणि चोरीबद्दल तुला कोर्टांत खेचूं."

शशिधरची ही कल्पना त्यांना पसंत पडली. ताबडतोब आपण एका वकिलामार्फत रजनिकान्ताला नोटीस द्यावी व तें चित्र जप्त करण्यासाठीं अर्ज करावा असें ठरवून ते दोघे निघाले. अनामिका नॅन्सीच्या खोलीवर गेली.

"दमन," शशिधर खोलीबाहेर पडतांच म्हणाला, "अनाताई इतकी हळुवार अन्तःकरणाची आहे का? रजनिकान्त किती झाला तरी कलावंत. सुंदर कला-निर्मितीकरतां तो वाटेल तें पापकर्म करील आणि अनाताईसारखी सौंदर्यसंपन्न स्त्री आपल्याला प्रतीक म्हणून मिळत असतांना तो सहजासहजीं ती संधि कशी सोडील?"

"पण शशी, ताईची आतां किती चमत्कारिक स्थिति झाली आहे! तें चित्र पाहून सारा समाज काय म्हणेल? तिच्याशीं लग्न करायला कुणी तयार होणार नाहीं आणि तिला निष्कारण वाटेल तशी समाजाची निर्भर्त्सना सहन करावी लागेल. एक वेळ मी ताईची समजूत घातली असती, पण आईला काय वाटेल?" दमन गहिंवरून पुढें म्हणाला, "आईकरतां मी माझं सर्वस्व द्यायला तयार आहें. शशी, अविवाहित मातेनं जन्म देतांना माझ्यासाठीं किती छळ सोसला असेल याची कल्पना

झाली, की हृदय भरून येतं. तिनं मला जीवदान दिलं. या उपकाराची फेड माझ्याकडून कशी होणार? शिवाय तिनें लोकनिंदेला न जुमानतां आम्हां दोघांकरतांच ना गेलीं पंधरा वर्षे जगांत एकलकोंड्यासारखीं घालविलीं! आईनं सहन केलेल्या हालअपेष्टा आणि निंदा मला माहीत आहेत. त्या दुष्ट कृत्याबद्दल साऱ्या जगाला शासन करावं असं मला वाटतं. खरंच, कां कुणाला माहीत; पण दिवसेंदिवस साऱ्या मानवजातीबद्दल मला तिरस्कार वाटूं लागला आहे."

दमनचे तेजस्वी डोळे सात्त्विक संतापानें अधिकच विस्तृत झाले होते. कांहीं वेळ स्वस्थ राहून तो गंभीरपणें म्हणाला, "शशी, साम्यवादाकडे माझा कल दिवसेंदिवस अधिकच झुकत आहे व त्याच प्रमाणांत मी माझं सुख घालवीत आहें असंच मला वाटतं. क्षणभर माझ्या मनांत येतं, कीं ह्या अडाणी, स्वार्थी, कपटी जगाच्या स्वास्थ्यासाठीं धडपडून मी काय करणार? पिंजऱ्यांत कोंडलेल्या सिंहाला बाहेरून टोंचून त्याच्या वेदना पाहून आणि त्वेषाच्या आरोळ्या ऐकून आनंदित होणाऱ्या लोकाप्रमाणेंच सारें जग आहे. त्या जगाकरतां आपल्या आयुष्याची, सुखाची, कर्तबगारीची आणि प्रेमाची राखरांगोळी करण्यास आपण तयार व्हावं याचंही मला नवल वाटतं. पण क्षणार्धात माझ्या ध्येयाचा मला अभिमान वाटतो. एक वेळ असंही वाटतं, कीं सुखाला तरी एवढं महत्त्व कां द्यावं? सुखदुःख हीं तरी आपल्या मनाची विकृतीच ना? मग मनुष्याला मरणांतदेखील सुख मानतां येईल."

शशिधर त्याच्या बोलण्याकडे विशेष लक्ष देत नव्हता, नाहीं तर त्यानें हसून त्याची थट्टाच केली असती. पण आतांची वेळ निराळी आहे हें जाणून तो गप्प राहिला होता. आयुष्य ही गंभीरपणें विचार करण्याजोगी गोष्टच नव्हे असें तो कधीं कधीं म्हणत असे. आपला इच्छित व्यवसाय मनुष्य उत्साहानें करूं लागला कीं त्याला जीविताचें अंतिम ध्येय काय हा प्रश्न सोडविण्याकरतां वेळच सांपडायचा नाहीं.

शशिधरला पैशाची कधीं ददात नव्हती, विशेष असा आजारही कधीं त्याला जाणवला नाहीं आणि वडिलांच्या बेफिकीर वृत्तीमुळें त्याला

बरेचसें स्वातंत्र्य मिळालें होतें. म्हणून त्याचें हें जीविताबद्दलचें तत्वज्ञान सयुक्तिक आहे असें दमन म्हणत असे.

दमनच्या विचाराचा ओघ बदलण्याकरतां शशिधर मध्येंच म्हणाला,

" दमन, उद्यां आपण दोघेही रजनिकान्तला भेटूं. पण नको, मीच एकटा भेटून पहातों तो वळला तर—"

" बरं आहे. पण मला बिलकुल आशा वाटत नाहीं त्याची. "

इतक्यांत समोर बस् उभी राहिली. दोघेही आंत चढले शशिधरनें दोन तिकिटें घेतलीं. बस् जोरानें आपला मार्ग काढीत होती. दमन रस्त्यांत दिसणाऱ्या परिचित गृहस्थांना यंत्राप्रमाणें हात वर करून सलामी देत होता. पण त्याच्या मनांत विचारांचें काहूर माजलें होतें. उद्यां रजनिकान्त काय उत्तर देईल ? त्याचा परिणाम काय होईल ? हा प्रकार कोर्टांत गेल्यावर कसें होईल ? आई काय म्हणेल ? अशा प्रकारचीं चित्रें सारखीं त्याच्या डोळ्यापुढें उभीं रहात होतीं.

शशिधर जवळच बसून वर्तमानपत्र चाळीत होता व कांहीं विशेष बातमी असल्यास त्याला स्पर्श करून तो मजकूर दमनला दाखवित होता. पण दमन त्याच्याकडे पाही आणि आपण तें वाचलें अशा अर्थानें उगाच होकार देत होता.

उतरण्याची जागा येतांच शशिधरनें उठून वर्तमानपत्राची घडी दमनच्या खांद्यावर आपटून ' चल ' अशा अर्थानें मान हालविली.

दोघेही खालीं उतरले व जवळच्या एका इमारतींत चढून वकिलाकडे गेले. वकीलसाहेब घरींच होते. त्यांनीं सर्व प्रकारची कायदेशीर चौकशी करून रजनिकान्ताला देण्यासाठीं नोटिशीचा मसुदा तयार केला.

" बरं दमन, मग उद्यां सकाळीं त्याच्याकडे जाऊन तेथून तुझ्याकडे येतों. जातों मी. आतां मला सुटी आहे. "

" अच्छा, थँक्स., " असें म्हणून दमननें त्याला निरोप दिला.

रात्रीं बिछान्यावर पडल्यानंतर दमन सारखा विचार करीत होता. अनामिका म्हणाली होती कीं तें चित्र एकदोन दिवसांतच पॅरीसला रवाना

व्हावयाचें आहे. तेव्हां आतां दिरंगाई उपयोगी नाहीं. शिवाय आपल्या नोटिशीमुळें रजनिकान्त सावध होऊन खात्रीनें त्या चित्राची तो तात्काल व्यवस्था केल्याशिवाय राहावयाचा नाहीं.

दमन एकदम बिछान्यावर उठून बसला. घरांतील दिवे मालविल्यामुळें सभोंवार अंधार पसरला होता. त्यानें सूक्ष्म दृष्टीनें सभोंवार पाहिलें. अनामिका पलिकडल्या कॉटवर स्वस्थ झोंपली होती. दुसऱ्या दालनांतील कॉटचा कर्रकर्र आवाज ऐकून शकुन्तलाबाई अजून जाग्या आहेत हें त्यानें ओळखलें. पुन्हा बिछान्यावर अंग टाकून तो विचार करूं लागला.

उद्यां आपण रजनिकान्ताला कोर्टांत खेंचला तरी काय उपयोग? अनामिकेच्या त्या दिवस्या चित्राला प्रसिद्धी मिळूं नये हाच आपला उद्देश. पण तो सफल न होतां उलट आपणच तें चित्र चवाठ्यावर टांगलें असेंच नाहीं का होणार? हा विचार मनांत येतांच तो एकदम चमकला व बिछान्यावरून उठून उभा राहिला.

" आई—" त्यानें हांक मारली.

" काय बाळ?" शकुन्तलाबाईनीं बिछान्यावरूनच विचारलें.

" आई, मी सिनेमाला जातों. ताई गाढ झोंपली आहे. मला झोंपच येत नाहीं अगदीं. मी कदाचित् तेथून शशिधराकडे झोंपायला जाईन."

" कां? आलास कीं हांक मार मला." शकुन्तलाबाई उठून पदर सांवरीत म्हणाल्या.

" शशिधर पण त्याच पिक्चरला जायचा होता. त्याच्याबरोबरच तिकडे जाईन." दमननें घाईघाईनें पोशाख केला. टेबलाचा खण उघडून त्यानें हळूच टॉर्च खिशांत घातला व तो जलद पावलांनीं खालीं उतरला. रस्त्यांतून जाणाऱ्या टॅक्सीला उभी केली व चटकन् आंत चढून त्यानें दादरकडे जोरानें गाडी हांकण्यास सांगितलें.

त्याच्या चेहऱ्यावर भीषण व्यग्रता दिसत होती. कोणतें तरी भयंकर कृत्य करण्याकरतां मन उद्युक्त होत असतांना होणाऱ्या मानसिक

वेदना त्याच्या मुखावर स्पष्टपणें दृग्गोचर होत होत्या. मधून मधून तो आपल्याशींच कांहींतरी गुणगुणत दांतओंठ चावून समोर पहात होता. केसांतून हाताचीं बोटें फिरवून क्षणभर गच्च मुठी आंवळून तो स्तब्ध राहिला. ग्रँटरोड, भायखळा, लालबाग, परेल इत्यादि शहर विभाग दृष्टीसमोरून कधीं गेले हें त्याला समजलेंच नाहीं. दादरजवळ येतांच ड्रायव्हरनें प्रश्न केला, " साब, कहां लेना ? "

" यांही खडी करो. " असें म्हणून दमन खालीं उतरला व एकदम चालूं लागला.

ड्रायव्हरनें मोटार मागोमाग घेऊन अदबीनें विचारलें, " माफ करो साब; पैसा नहीं दिया आपने. "

दमननें चटकन् तुमानीच्या खिशांतून काढून त्याच्या हातावर नोट ठेवली व तो पुन्हां चालूं लागला.

यावेळीं अकराचा सुमार झाला होता. हॉटेलांतून रेडीओची गडबड बंद झाली होती. थंडी बरीच पडल्यामुळें रस्त्यावर जवळ जवळ कोणीच दिसत नव्हतें. श्रीमंतांच्या टुमदार बंगल्यांत शांतता नांदत होती. मधूनच एखाद्या बंगल्यांतील दिवाणखान्यांत विजेच्या दिव्याचा मृदु प्रकाश दिसत होता. क्वचित् एखादी मोटार शिंग न वाजवितां झटकन् जात होती. याशिवाय जिकडे तिकडे सामसूमच भासत होतें.

दमन झपझप पावलांनीं पारशी कॉलनींतून चालला होता. मुख्य रस्ता सोडून तो लहान गल्लींत वळला. रस्त्यांतील प्रखर दिव्याच्या प्रकाशामुळें, त्याच्या भेसूर छाया बंगल्याच्या भिंतीवर पडत होत्या. त्याच्या वाढत्या गतीवरून कांहीं तरी भयंकर बेत त्यानें केले असावेत हें स्पष्ट दिसत होतें. विचारतंद्रींतच मधूनमधून तो विचित्र हातवारे करीत होता. यावेळीं त्याचा नेहमींचा सस्मित उमदा चेहरा अतिशय व्यग्र कांहींसा क्रूर दिसत होता.

सुमारें पंधरा-वीस मिनिटें चालल्यावर दमन एकदम उभा राहिला. सर्वत्र भयाण शांतता होती. समोर दिसणाऱ्या बंगल्याच्या तिसऱ्या मजल्यावर त्यानें नजर टाकली. आजूबाजूच्या बंगल्यामध्येंही एकहि दिवा

दिसत नव्हता. त्यानें पुन्हां आपली नजर चौफेर फिरविली. पण कोणाचीहि चांहूल ऐकूं येत नव्हती. पावलांचा बिलकुल आवाज न करतां तो जिना चढूं लागला.

दुसऱ्या मजल्यावर येतांच दमन कांहींवेळ स्तब्ध राहिला. त्याच्या हाताला कम्प सुटला होता. छातीही जोरानें धडधडूं लागली व त्याला घामही आला. आपले हात ताब्यांत आणण्याकरतां त्यानें घट्ट मुठी आवळल्या होत्या. हातांतील टॉर्चे दिवाही त्या दाबाखालीं किंचित् कर-करला तो दिवा पेटवून त्यानें दाराकडे पाहिलें 'रजनिकान्त, आर्टिस्ट' ही पाटी पाहून तो एकदम निश्चल उभा राहिला. शेजारच्या क्वामध्यें कुणी बिऱ्हाड नाहीं हें माहीत असूनही त्यानें दारावर प्रकाश पाहून पुन्हां आपली खात्री करून घेतली.

इतक्यांत कसला तरी प्रकाश चमकला म्हणून दमननें दचकून मान वर केली. आकाशांतून एक तारका दिव्य तेजानें तुटून पडत होती. कोंडून धरलेला श्वास सोडून त्यानें घंटेच्या बटनावर हात ठेवला. पण पुन्हां एकदम त्यानें हात मागें घेतला.

अखेरीस मनाचा निश्चय करून तो गॅलरीच्या कठड्यावर चढला व दाराच्या गजांतून हात घालून त्यानें जवळच्या खिडकीची कडी काढ-ण्याचा प्रयत्न केला. थोड्याच वेळांत त्याला त्यांत यश आलें. गॅलरीच्या कठड्याला गच्च धरून त्यानें आंत उडी मारली. तो आवाज इतकासा मोठा नव्हता तरी एखादा भयंकर स्फोट व्हावा त्याप्रमाणें दचकून तो अगदीं निश्चल स्तब्ध राहिला. कांहीं वेळ चाहूल घेऊन त्यानें दाराचा कडी कोयंडा काढाला व मागें फिरून तो चांचपडत पुढें सरकूं लागला.

दमन त्या खणांतून पलीकडल्या खोलींत गेला. सर्वत्र शांतता अस-ल्यामुळें गाढ झोंपेंत रजनिकान्तानें सोडलेला दीर्घ श्वास एखाद्या सर्पाच्या फुत्काराप्रमाणें त्याला भीषण वाटत होता. क्षणभर कानोसा घेतांच रजमिकान्त कुठें झोंपला आहे हें त्याच्या लक्षांत आलें.

तो तसाच चांचपडत पलीकडल्या मोठ्या दालनांत गेला. हातां-तील दिवा पेटवून सभोंवार पाहूं लागला. चारी बाजूला भिंतीवर लाव-

लेल्या विवस्त्र, अर्धवस्त्र स्त्री-पुरुषांच्या सुंदर प्रतिमा त्याला दिसल्या. त्या अंधुक प्रकाशांतसुद्धां त्या आकृतींत सजीवता दिसत होती. समोरच्या प्रतिमेंतील सुंदर स्त्री आपल्याकडे प्रेममधुर दृष्टीनें पहात आहे असेंही क्षणभर त्याला वाटलें.

दमन खिशांतून चाकू काढून हातांत घेऊन क्रमाक्रमानें चित्रावर प्रकाशाचा झोत पाडून तीं निरखून पहात होता. इतक्यांत एकदम अनामिकेची प्रतिमा त्याच्या दृष्टीस पडली. जणूं काय आपल्यासमोर ती विवस्त्र उभी आहे अशा कल्पनेनें त्यानें दिवा विझविला. इतक्या अल्पावधींतदेखील रजनिकान्तानें चित्राला किती जिवंतपणा आणला आहे याची दमनला जाणीव झाली. क्षणभर अनामिकेचा त्याला मनस्वी संताप आला. तें चित्र छिन्नविच्छिन्न करावें या विचारानें चाकू उघडून तो चित्रफलकाकडे गेला.

एवढ्यांत रजनिकान्ताच्या कॉटचा आवाज झाला. दमन श्वास कोंडून जागच्याजागीं निस्तब्ध उभा राहिला. पुन्हा सर्वत्र सामसूम झाली. दमननें हलके पाय उचलून तो दाराकडे वळला तोंच खळकन् आवाज होऊन त्याच्या पायाच्या धक्कयानें पाण्याचें ग्लास फुटलें. दमन चित्राला घट्ट बिलगून उभा राहिला होता.

"कोण!" असें दरडावून ओरडत रजनिकान्त बिछान्यावर उठून बसला.

दमन झटकन् बाहेरच्या दाराकडे निसटला. रजनिकान्तानें बिछान्याजवळचा दिवा पेटविला व एकदम जाऊन त्याच्यावर झडप घातली.

"रजनिकान्त, खबरदार मला अडवशील तर. अनाताईचं चित्र न्यायला मी आलों होतों." दमन त्याचें मनगट घट्ट पकडून त्वेषानें उत्तरला.

"दमन, बदमाष, दरोडेखोर." रजनिकान्त दांत चाऊन ओरडला.

हे त्याचे शब्द ऐकतांच दमननें झटकन् त्याच्या तोंडांत एक थप्पड लगावली. त्यामुळें त्या काळोखांतहि रजनिकान्ताच्या डोळ्यापुढें प्रकाश

चमकला. त्यानें एकदम "चोर, चोर पकडा" अशा आरोळ्या ठोकण्यास सुरवात केली. जवळच्या इमारतींत झटकन् दिवे पेटूं लागले.

दमननें तात्काळ चाकू काढून जोरानें त्या चित्रांत खुपसला व पुढें पाठीं तें तीक्ष्ण पातें ओढून त्यानें तें चित्र अगदीं छिन्नविच्छिन्न करून टाकलें.

आपल्या अत्यंत सुंदर कृतीचा तो शेवट पाहून रजनिकान्त एक. दम चवताळून गेला. सर्व सामर्थ्य एकवटून दमनवर त्यानें जोरानें प्रहार केला. त्या प्रहारानें व्याकुळ होऊन तो खालीं कलंडला. रजनीकान्त सारख्या आरोळ्या ठोकीत होता. दमन पुन्हां उठतांच त्यानें त्याचा घट्ट गळा दाबला. दोघांची झटापट सुरू झाली. दोघेहि धाडकन् भिंतीवर आदळून खालीं पडले.

दमनच्या हातांतील चाकू घेण्याकरतां रजनिकान्तानें त्याच्या हाताला कडकडून चावा घेतला. दमननेंसुद्धां त्याचा प्रतिकार करण्या-करतां आपली सर्व शक्ती खर्च करून त्याचे गाल दाबून मानेवर एक जोराचा तडाखा दिला.

"नीचा!" दमन दात ओंठ चाऊन ओरडला. रजनिकान्तनें घेत-लेल्या चाव्यामुळें त्याच्या हातांतून जोरानें रक्त वाहूं लागलें व चाकूवरची पकड कांहींशी सैल झाल्यामुळें रजनिकान्तानें एकदम चाकू हिसकावून घेतला. तो चाकू दमनच्या मानेंत खुपसणार होता तोच त्यानें त्याचें मनगट एकदम गच्च पकडून जोराचा एक ठोंसा दिला. रजनिकान्त धाडकन् दारावर आदळला. पण पुन्हां त्वेषानें उठून आपली सर्व शक्ती एकवटून त्यानें चाकूचा रोख दमनच्या छातीवर धरला. दमननें पुन्हां आपल्या डाव्या हातानें तो वार चुकविण्याचा प्रयत्न केला. पण मनगट पकडतां न आल्यामुळें त्याच्या दंडाला जबर जखम झाली. दमनला भयंकर वेदना होऊं लागल्या त्या आवेशांत त्यानें आपली मूट घट्ट दाबून रजनिकान्ताच्या हनुवटीवर अतिशय जोरानें प्रहार केला. तो ठोंसा एवढा तीव्र होता कीं रजनिकान्ताच्या दृष्टीपुढें अंधार पडला; त्याला

शरीराचा तोल सावरतां येईना. तो थाडकन् जीन्यावर आदळला व पायऱ्यांवरून धडधडत खालीं गेला.

दमन धांप टाकीत रक्तबंबाळ स्थितींत उभा होता. त्याच्या डाव्या हातांतून सारखा रक्तस्राव चालला होता. कपाळालाही जखम झाली होती. पुढें आलेले केंस मागें सारताना रक्ताचा ओघळ त्याच्या भाल प्रदेशावर घसरला होता. अंगांतील शर्ट फाटून त्याच्या चिंध्या लोंबत होत्या. त्याच्या हृदयांत आगीनें पेट घेतला होता. त्यामुळें झालेल्या जखमांचीसुद्धां जाणीव त्याला नव्हती.

देहभान विसरून शून्यपणें तो खालीं पहात होता. जिन्याच्या शेवटच्या पायरीवर रजनिकान्ताचा देह निःश्चेष्ट पडला होता.

कांहीं वेळानें दमन भानावर आला. तो धडपडत कसाबसा जिना उतरून खालीं आला. थरथरणाऱ्या हातानें टॉर्च पेटवून त्यानें रजनिकान्ताकडे पाहिलें. तो मूर्च्छित होऊन पडला होता. त्याच्याही मस्तकाला मार लागल्यामुळें त्यांतून रक्त वाहत होतें व त्याचा उजवा हात छाती खालीं मिळाल्याळें चाकूचें पातें त्याच्या कुशींत रुतलें होतें.

दमननें खालीं वांकून रजनिकान्ताचें मनगट हातांत घेतलें व नाडी मोजण्याकरतां चाचपूं लागला. इतक्यांत ‘ बदमाष ! हरामखोर ! ’ असें म्हणत दंडाला व मानेला चौघांनीं गच्च पकडून त्याला रस्त्यावर खेंचला. गर्दींत जिकडून तिकडून दमनवर वाटेल तसे प्रहार होऊं लागले. त्याबरोबर चवताळून तो त्यांना हिसका देऊन ओरडला, “ खबरदार !”

त्या आवेशपूर्ण धमकीचा परिणाम होऊन “ इसको मत मारो. पोलीस को बुलाव” अशा वाक्याचा गलबलाट सुरू झाला. त्या गर्दींत एकच गोंधळ उडाला होता. रस्त्यावर लोकांची सारखी गर्दी वाढून रेंटॉरेंट चालली होती. पुष्कळ लोकांना खरा प्रकार समजला नाहीं व त्यामुळें जिकडे तिकडे वाटेल त्या अफवा उठत होत्या. कुणीतरी आग लागली असावी असें वाटून फोन केल्यामुळ आगीचा बंबसुद्धां घणघणाट करीत आला. हजारों लोकांनीं रस्ता गजबजून गेला होता.

सारा प्रकार दमनच्या पूर्णपणें लक्षांत आला. यावेळीं शशिधर जवळ हवा होता असें त्याला किती तरी वाटलें. आईची आणि अनामिकेची त्याला आठवण झाली व उद्यां त्यांना काय वाटेल हा विचार त्याच्या मनांत उभा राहिला. रजनिकान्त मृत्युवश तर झाला नसेल ना या कल्पनेनें त्याचें हृदय धडधडूं लागलें.

कांहीं लोक त्याच्या गलित देहला घट्ट धरून जणुं काय आपणच मोठ्या धीरानें त्याला पकडलें अशा मिजाशीनें लोकांना दूर होण्याकरतां हुकूम फर्मावित होते. पण दमनचें लक्ष त्यांच्या उद्दाम वृत्तीकडे बिलकुल नव्हतें किंवा आपल्याला धरण्याची गरज नाहीं असेंहि सांगण्याचें त्याला महत्व वाटलें नाहीं. कांहीं लोक त्या गर्दीत धुसून काय प्रकार झाला म्हणून त्यालाच सरळ सवाल करीत होते. पण दमन कांहींच उत्तर न देतां स्तब्ध उभा होता. एक वेळ त्याला रजनिकान्ताच्या स्थितीबद्दल चौकशी करावीशी वाटली व त्यानें सभोंवार गराडा देऊन असलेल्या लोकांकडे पाहिलें. जवळच उभा राहून सहानुभूतीच्या आर्द्र दृष्टीनें त्याच्याकडे पहात एक तरुण उभा होता.

" कृपा करून तो गृहस्थ सावध झाला का मला सांगा. " दमननें इंग्रजींत विनंती केली.

पण त्या तरुणानें अतिशय स्निग्ध स्वरांत आपल्याला माहीत नाहीं म्हणून दिलगिरी व्यक्त केली.

थोड्याच वेळांत मोटारमधून पोलीस आले व त्यांनीं गर्दी हटवून दमनला गांठलें. इन्स्पेक्टर साहेबांनीं त्याच्या चेहऱ्याकडे निरखून पाहून आश्चर्यानें उद्गार काढले, " कोण ! मिस्टर दमन ! "

दमननें मान वर करून त्याच्याकडे पाहिलें. इन्स्पेक्टरसाहेब कांहींशा आनंदानें हंसतच होते. एका मजूर पुढाऱ्याला पकडण्याकरतां गेलों असतां वारंटांतील कायदेशीर दोष दाखवून रिकाम्याहातानें आपल्याला मागें फिरविणारा भाई दमन खुनी दरोडेखोर म्हणून हातांत सांपडला याबद्दल त्यांना अतिशय समाधान वाटलें. जामिनावर मोकळीक न मिळणाऱ्या कच्च्या कैद्याला आपण कशा प्रकारें वागवूं शकतों याची त्यांना आठवण झाली.

" मि. दमन, चला आतां चौकीवर झोंपायला. "

" थँक यू. " असें तिरस्कारानें उत्तर देऊन दमननें बेड्यांकरतां हात पुढें केले.

त्याच्या तेजस्वी वागणुकीचें तेथील सर्व लोकांना मोठें नवलच वाटलें व इन्स्पेक्टरनें उच्चारलेलें नांव ऐकून तर त्यांच्या आश्चर्याला पारावारच राहिला नाहीं.

पोलीस शिपायानें त्याच्या हातांत बेड्या घातल्या. स्पष्ट ऐकूं येतील अशा प्रकारें शंकाकुशंका व्यक्त करणाऱ्या जनसमूहाबद्दल सिंहाप्रमाणें तो बेफिकीर दिसत होता. त्याप्रसंगींसुद्धां त्याची पुढें आलेली विस्तृत छाती, रुबाबदार चेहरा, आणि तेजस्वी डोळे त्याच्या उमद्या स्वभावाची व मनाच्या मोठेपणाची साक्ष देत होते.

एक वेळ त्यानें आपल्या हातांतील जड शृंखलांकडे नजर टाकली. उद्यां आपल्या आईची स्थिति काय होईल याची कल्पना करून त्यानें दीर्घ निश्वास सोडला.

इतक्यांत अँब्युलन्स-गाडी आली. रजनिकान्तला स्ट्रेचरवरून आंत ठेवतांच इन्स्पेक्टरसाहेब दमनकडे वळले. इतक्यांत एक मध्यम गृहस्थ पुढें होऊन दमनच्या पाठीवर हातानें थोपटून प्रेमळपणें म्हणाला, " मुला, ईश्वर तुझी या संकटांतून सुटका करो."

त्या सहानुभूतीच्या स्पर्शानें व शब्दानें दमनला किती तरी बरें वाटलें व त्यानें मनःपूर्वक त्याचे आभार मानून खालीं पाहिलें. एवढ्यांत इन्स्पेक्टरसाहेब त्याच्या खांद्यावर हात ठेवून म्हणाले, " चला रावसाहेब, बसा आतां गाडींत. "

" रजनिकान्तांचं कसं आहे ! ते शुद्धीवर आले का ! " दमननें उत्सुकतेनें प्रश्न केला.

इन्स्पेक्टरनें तुच्छतेनें हास्य करून म्हटलें, " मला माहीत नाहीं. हं चला. " आणि जवळच उभ्या असलेल्या मोटारकडे त्याला नेलें.

सभोंवार जमलेल्या जमावामध्यें लोटालोट आणि गोंगाट सुरू झाला. त्या गडबडींत पोलीसांच्या मोटारीच्या शिंगाचाही आवाज स्पष्ट ऐकूं येत

नव्हता. मोटारच्या फूटबोर्डवर उभा असलेला शिपाई हातांतील दंडुका हालवून मोटारकरतां मार्ग काढीत होता.

लवकरच मोटार मोकळया रस्त्यावर आली. कांहीं अन्तर गेल्यावर सर्वत्र सामसूम असल्याचें पाहून दमनला तो मध्यरात्रीचा समय असावा असें वाटलें. त्याचा घसा तहानेमुळें कोरडा पडला होता. अंगावरील जखमांच्या वेदनाही त्याला जास्त जास्त तीव्रतेनें जाणवत होत्या. रजनि-कान्त खुशाल असेल ना, हा विचार करीत त्यानें पाठीमागें अंग टाकलें. आपला क्षीण देह पाठच्या गादीवर आधारून त्यानें कांहीं लाल डोळे मिटले. "आई, आई ग!" असें म्हणत त्यानें बाजूला मान टाकली व ग्लानी आल्यामुळें तो स्तब्ध झाला. मोटार पोलीस चौकीकडे जोरानें चालली होती.

———



त्या रात्रीं शशिधर रुग्णालयांत रात्रपाळीवर काम करीत असल्यामुळें त्याला सर्व प्रकार तात्काल समजला. त्यानें रजनिकान्ताची स्थिति पाहिली. त्याची नाडी अगदीं अस्पष्टपणें चालली होती. एक दोन इन्जेक्शनें देऊनही कांहीं आशाजनक परिणाम दिसून न आल्यामुळें तो अगदीं घाबरून गेला होता.

दमनच्या सर्व जखमा बांधल्यावर त्याला पोलीस पहाऱ्यांत ठेवण्यांत आलें होतें. पण त्याला असह्य वेदना होत असल्यामुळें तो तळमळत होता.

शशिधर त्याच्याकडे जाऊन म्हणाला, "दमन, किती वाईट गोष्ट झाली ही!"

"रजनिकान्ताची प्रकृति चिंताजनक का आहे?" दमननें आर्त स्वरांत प्रश्न केला.

"विशेष नाहीं. पण कुणी सांगावं—" शशिधर क्षणभर गोंधळून उत्तरला.

"पण शशि, उद्यां आईला आणि ताईला तूं काय सांगशील? नॅन्सीला बरोबर घेऊन घरीं जा. मला थोडं पाणी दे अगोदर."

दमन पाण्याचे चार घोंट घेऊन पुढें म्हणाला, "शशी, मी तें चित्र नाहींसं करणार होतों. पण रजनिकान्त ऐकेना व त्याच्या हातांतील चाकूचा वार चुकविण्याच्या धडपडींत मी दिलेल्या ठोशामुळें तो जिन्यावरून खालीं पडला. त्याला कुठं फ्रॅक्चर झालं आहे का?"

दमनला बोलतांना फार त्रास होत होता. पण शशिधरला ती माहिती आवश्यक वाटत होती. रजनिकान्ताच्या स्थितींत कांहींच सुधारणा

न होतां तो अधिक अत्यवस्थ होत होता. हातांतील चाकू त्याच्या उजव्या बाजूच्या बरगड्यांत खुपसला होता. धडकन् वरून पडल्यामुळें त्याच्या मेंदूला इजा झाली होती व मानसुद्धां मोडली होती. डॉक्टरनीं एकसारखे अनेक उपाय चालविले होते; पण सर्व यत्न अयशस्वी ठरून पहाटेच्या सुमारास तो मृत्युवश झाला होता.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं शकुन्तलाबाईंना हा प्रकार कसा सांगावा हा शशीधरला प्रश्न पडला होता. शेवटीं सकाळींच तो त्यांच्या घरीं गेला.

त्याला एकटा पहातांच शकुन्तलाबाई एकदम म्हणाल्या, "दमा कुठं आहे?"

"मामी, त्याला रात्रीं ताप आल्यामुळं तो माझ्या खोलींत झोंपला आहे. त्यानं तुम्हाला बोलावलं आहे."

अनामिकेला शशीधरच्या भाषणाचा संशय येऊन ती तीक्ष्णपणें त्याच्याकडे पहात होती.

"रात्रीं तो आणि मी सिनेमाला गेलों होतों. तिथंच त्याला थंडी वाजून एकदम ताप आला." त्यानें आपले विकार दडवून पुन्हां म्हटलें.

थोड्याच वेळांत टॅक्सींतून सर्व मंडळी हॉस्पिटलकडे जाण्यास निघाली. वाटेंत शशीधरनें हळुहळु सुरवात करून त्यांना खरा प्रकार सांगितला.

हॉस्पिटलमध्यें पोहोंचतांच त्यानें प्रमुख डॉक्टरच्या परवानगीनें दमनला भेटण्याची सवलत मिळविली. त्याच्या सगळया अंगावर बांधलेल्या जखमा पाहातांच शकुंतलाबाई रडूं लागल्या. अनामिकाही त्याच्या बाजूला बसून हुंदके देऊं लागली. दमनच्या डोळयांत अश्रू उभे राहिले.

"आई," तो अतिशय क्षीण स्वरांत म्हणाला, "आत्तांच हे हवालदार सांगताहेत कीं रजनिकान्त मृत्युवश झाला. खरं का रे शशी! खरोखरच मला त्याच्या कृत्याबद्दल शासन करायचं नव्हतं."

अनामिकेला रडें आवरेना. रजनिकान्ताविषयीं वाटणारी प्रेमभावना यावेळीं जागृत होऊन तिला असह्य दुःख झालें.

नॅन्सी तिची समजूत करीत होती. आतां दमनदादाच्या बचावासाठीं आपल्याला धडपडलें पाहिजे हें नॅन्सीचें वाक्य ऐकतांच तिच्या डोळ्यापुढें त्याच्या भवितव्याबद्दल भीषण चित्र उभें राहिलें. रजनिकान्ताचा खून केल्याच्या आरोपावरून आपला दादा आरोपीच्या पिंजऱ्यांत उभा रहाणार या कल्पनेनें तिला अतिशय दुःख झालें. त्याला झालेल्या जबर जखमा पाहून तिच्या मनांत दमन गुन्हेगार आहे हा विचार फार काल टिकत नव्हता. पण रजनिकान्त मृत्युवश झाला हें ऐकून ती विव्हळत होती.

"नॅन्सी," ती स्फुंदून म्हणाली, "मीच सर्वस्वीं दोषी आहे. दादाला मी ही गोष्ट सांगितली नसती तर आज हा घोर परिणाम झाला नसता. पॅरीसला माझं चित्र सर्वांनीं पाहिलं असतं तर काय बिघडलं असतं ! पण त्यावेळीं तें चमत्कारिक वाटलं. असं होईल हें स्वप्न कुणाला पडलं होतं !"

शकुन्तलाबाईंना दमनबद्दल मोठी आशा वाटत होती. पण आतां मात्र त्यांच्या दृष्टीसमोर भवितव्याबद्दल भीषण दृश्यें दिसूं लागलीं.

"मामी, आतां योग्य ती तयारी केली पाहिजे." अशी शशीधरकडून सूचना मिळतांच त्यांनीं आपलें दुःख कसेंबसें आंवरलें. दमनचा निरोप घेऊन त्या शशीधराबरोबर वकिलाचा सल्ला घेण्यास निघाल्या.

मुंबईतील सर्व वर्तमान-पत्रांतून ह्या प्रकाराचा उल्लेख प्रामुख्यानें करण्यांत येत होता. घरोघर तो एक मोठा चर्चेचा विषय होऊन बसला होता. व्यवहारी लोक तद्विषयक वर्तमानपत्रांतील बातमी वाचून दमनवर ठेवलेला आरोप कोणता असावा, त्याला शिक्षा होईल कीं तो निर्दोष म्हणून सुटेल इत्यादि गोष्टींचा कायदेपंडिताप्रमाणें खल करीत होते.

पण या सर्वांपेक्षां कॉलेजांतील विद्यार्थ्यांमध्यें त्याची चर्चा विशेष जोरानें चालली होती. क्रिकेटच्या आंतर-कॉलेज व प्रान्तीय सामन्यांत प्रामुख्यानें चमकणारा दमन भयंकर गुन्ह्यामुळें बंदिवासांत पडला आहे हें पाहून सर्वांना अतिशय वाईट वाटत होतें.

पण भांडवलशाहीचे पुरस्कर्ते व साम्यवादाकडे तिरस्कारानें पहाणाऱ्या कांहीं लोकांना मात्र त्याच्यावरील आरोप ऐकून आनंद वाटणें

सहाजिक होतें व ते मोठ्या दिमाखानें न्यायाधिशांनीं निकाल देण्यापूर्वींच त्याला कोणतें भयंकर शासन मिळेल याबद्दल आपला निश्चित निर्णय देत होते. पोलीस अधिकाऱ्यांनादेखील मिरवणुका, सभा यांमध्यें प्रामुख्यानें भाग घेणारा व आपल्या शांतता प्रस्थापित करण्याच्या कार्यांत व्यत्यय आणणारा कंटक कायमचा काढतां येईल तर तें हवें होतें. यामुळें त्यांनीं आरोप सिद्ध करण्याकरतां लागणारी सर्व तयारी जोरांत केली होती.

पण शकुन्तलाबाईसुद्धां कांहीं स्वस्थ बसल्या नव्हत्या. मुंबईतील फौजदारी कामामध्यें प्रसिद्ध असलेला कायदेपंडित त्यांनीं आपल्या बाजूनें उभा केला होता. रजनिकान्ताच्या शेजारीं रहाणाऱ्या कांहीं गृहस्थांनीं त्यांना स्वखुशीनें दमनच्या बाजूनें साक्ष देण्याचें कबूल केलें होतें. या सर्व परिस्थितीपुढें खटल्याचा निकाल कसा लागतो याबद्दल सर्वत्र विलक्षण उत्सुकता दिसत होती.

अखेरीस कांहीं दिवसांनीं खटल्याचा दिवस उजाडला. त्या दिवशींच्या वर्तमानपत्रांनीं खटल्याचा सर्व इतिहास देऊन लोकांत पुन्हा कुतूहल उत्पन्न केल्यामुळें कोर्टांत काम सुरूं होण्यापूर्वींच बऱ्याच तरुण स्त्री–पुरुषांनीं गर्दी केली होती. शेवटीं कोर्ट सुरू होण्याची वेळ झाली.

दमनला पोलीसांनीं न्यायासनापुढें आणला, तेव्हां प्रेक्षकांत गडबड उडाली. त्याचे कॉलेज मित्र व स्नेही मंडळी त्याच्याजवळ जाऊन 'Wish you good luck. God be with you' अशा वाक्यांनीं सदिच्छा व्यक्त करीत होती. तेथें असलेल्या विद्यार्थिनी त्याच्याकडे दयार्द्र दृष्टीनें पहात होत्या. दमन नम्रपणें मस्तक वांकवून आपल्याला त्यांच्या स्नेहाची जाणीव असल्याचें दाखवीत होता. पुढें येतांच त्यानें सभोंवार विषण्ण दृष्टीनें पाहिलें. बाजूच्या खुर्चीवर आपल्या बंधूबरोबर रुबी बसली होती. चटकन् उठून ती दमनच्या जवळ आली व अतिशय व्याकुळ होऊन आर्त स्वरांत हलकेच म्हणाली, "दमन, तूं खात्रीनं निर्दोषी आहेस. आणि न्याय तुलां मिळालाच पाहिजे. My best love and hopes to you. Best of luck."

दमननें उदासीनतेनें रुबीकडे पाहिलें. हृदयाला पीळ पडून बाहेर पडणाऱ्या तिच्या शुभ–चिन्तनाबद्दल त्यानें मनःपूर्वक तिचे आभार मानले. रुबी अश्रु पुशीत पुन्हां आपल्या खुर्चीवर बसली. जनसमूह आपल्याकडे जिज्ञासेनें पहातो आहे याचें तिला बिलकुल महत्व वाटलें नाहीं.

दमननें पुन्हा सभोंवार दृष्टी फिरविली. शकुन्तलाबाई, अनामिका व शशिधर जवळच होते. त्या भयंकर रात्रीनंतर कमला अजूनपर्यंत त्याला भेटली नव्हती. त्यानें पुष्कळ वेळां ती कुठें आहे म्हणून अनामिकेला प्रश्न केला होता. पण तिनें ती बाहेर गांवीं गेली आहे, तिथेंच ती आजारी पडली आहे अशी सबब सांगून त्याचें समाधान करण्याचा प्रयत्न केला होता. पण आतां मात्र खरा प्रकार त्याच्या लक्ष्यांत येण्यास वेळ लागला नाहीं. तिनें आज कोर्टातही येऊं नये हें पाहून तो अतिशय खिन्न झाला.

" ताई, खरं खरं सांग मला. कमला कशी आली नाहीं ? " अनामिकेला खुणावून पिंजऱ्याजवळ बोलावून त्यानें हलक्या स्वरांत विचारलें.

" दादा " अनामिका दाटलेल्या स्वरांत नाइलाजानें उत्तरली, " तिच्या वडिलांनीं तिला आमच्याशीं कोणत्याही तऱ्हेचा संबंध ठेवायचा नाहीं अशी सक्त ताकीद दिली आहे. "

दमनच्या समाधानासाठीं ती खोटें बोलत होती.

" पण तूं तिला माझा निरोप सांग—" कांहीं वेळ स्तब्ध राहून तो पुन्हा म्हणाला, " कीं तुला एकदां तरी भेटून जाण्यास सांगितलं आहे. कदाचित् खटल्याच्या निकालाबरोबर माझाही निकाल लागणार आहे. ताई, तिला म्हणावं खुनाचा आरोप आहे माझ्यावर ! "

मन शांत ठेवण्याचा आटोकाट प्रयत्न जरी दमन करीत होता, तरी कदाचित् आपल्याला फांशीची शिक्षा होईल या विचारानें त्याचें मन थरारत होतें. कोर्टात जमलेल्या प्रेक्षक समुदायाकडे त्यानें शून्य दृष्टीनें पाहिलें.

शशिधरनें त्याची व्याकुल चर्या पाहून धीर देण्याच्या उद्देशानें म्हटलें, " दमन, आपली केस फारच जोरदार आहे. तूं खास निर्दोषी ठरणार ! "

दमननें दीर्घ निश्वास टाकला. जगांतील आपली जीवन-यात्रा लवकरच भयंकर रीतीनें संपणार ह्या कल्पनेनें त्याच्या बुद्धीला क्षणभर बधिरता आली. कदाचित् खुनी ठरून फांसावर लटकणें नशीबीं येईल, साम्यवादाविषयींचे कल्पनेनें बांधलेले सुंदर मनोरे एकदम कोसळतील, आयुष्यांतील कार्याची आंखलेली रूपरेषा, कमलेबरोबर अपेक्षिलेला सात्विक आनंद आणि निर्मल प्रेम, जगाच्या इतिहासांत नामनिर्देश होईल अशी बाळगलेली उत्कट महत्त्वाकांक्षा, सारें सारें न्यायाधिशाच्या लेखणीच्या एका फटकाऱ्यासरशी जळून खाक होणार या विचारानें त्याला कसेंसेंच वाटलें.

" शशी, आईला जरा बोलाव इकडे. "

" काय पाहिजे तुला ? मामीना एखादे वेळीं घेरी यायची ! "

दमननें नकारार्थक मान हालविली. त्याच्या बाजूला असलेल्या कांहीं विद्यार्थ्यांमध्यें फांशीच्या शिक्षेविषयीं चर्चा चालली होती. तत्त्व-प्रतिपादनाच्या भरांत एक विद्यार्थी कांहींसें मोठ्यानेंच म्हणाला, " Death sentence must be abolished. ( फांशीची शिक्षा कायद्यानें बंद झाली पाहिजे. ) "

दमननें दचकून मागें पाहिलें. स्वतःला देहान्त प्रायश्चित्त मिळणार असेंच सर्वांचें मत आहे या विचारानें त्याचें हृदय धडधडूं लागलें.

इतक्यांत अकराचे ठोके पडून न्यायाधीश येत असल्याचा पुकारा झाला. सर्व प्रेक्षकवर्ग उठून उभा राहिला. न्यायमंडपांत विलक्षण शांतता पसरली होती. कायदेपंडितांच्या अंगांतील काळ्या झग्यांकडे पाहून ख्रिस्ती लोकांच्या दफन—विधीचें चित्र दमनच्या दृष्टीसमोर उभें राहिलें.

न्यायाधिशानें आसनावर बसतां बसतां सूक्ष्म दृष्टीनें त्याच्याकडे पाहिलें.

दमनची स्थिति केविलवाणी झाली होती. त्याचे डोळे कांहींसे खोल गेले होते. केंस विंचरले नसल्यामुळें ते भालप्रदेशावर अव्यवस्थितपणें पुढें आलेले होते. त्याच्या अंगावरचें तेज कमी झालें होतें. चेहरा अगदीं सुकून गेला होता. दीर्घ निश्वास टाकतांना त्याच्या रुंद वक्षस्थलाची हाल-

चाल स्पष्ट दिसत होती. पण त्याच्या मुखावर अशा परिस्थितींतही एरवीं दिसणारें औदार्य विलसत होतें व चेहऱ्यावरील मार्दव आणि गांभीर्य यांचा आकर्षक मिलाफ त्याच्या उदार अन्तकरणाची साक्ष पटवीत होता.

थोड्याच वेळांत कोर्टाच्या कामास सुरवात झाली. सरकारी कायदे-पंडितानीं खटल्याचा इतिहास सांगून त्याचें स्वरूप स्पष्ट केलें; व आरोपीवर खून, चोरी व ट्रेसपास हे तीन आरोप असल्याचें सांगितलें. आरोपीतर्फे सर्व आरोप नाकबूल करण्यांत येतांच कामास पुढें सुरवात झाली.

सरकारी कायदेपंडित बॅरीस्टर गौरीप्रसाद यांनीं दमनवरील आरोप कोणत्या पुराव्यावरून शाबीत होतात हें सांगण्यास सुरवात केली. ती सारी हकीगत दमन शांतपणें ऐकत होता. खऱ्या प्रकाराला किती तिखटमीठ लावण्यांत येतें हें ऐकून लवकरच लागणाऱ्या निकालाबद्दल तो अगदीं उदास झाला.

चित्र चोरण्याकरतां आरोपी मोठा तीक्ष्ण धारेचा चाकू घेऊन मयत चित्रकार रजनिकान्त याच्या स्टुडिओंत गेला व तेथें आरोपी व मयत यांच्यामध्यें झटापट होऊन आरोपीनें त्याला बेशुद्ध पाडलें व रजनिकान्त मृत्युवश झाला असें समजून त्याला नेत असतां शेजारच्या बंगल्यांत चाहूल ऐकतांच बंगल्याच्या जिन्यावरच मयताला टाकून आरोपीनें पळण्याचा प्रयत्न केला, अशा प्रकारची सरकारतर्फेची मांडणी ऐकून दमनला अतिशय खेद आणि आश्चर्य वाटलें. एवढेंच नव्हे तर ही गोष्ट आपल्या दृष्टीसमोर घडली व ती सर्वस्वीं सत्य आहे असें शपथेवर सांगणाऱ्या साक्षीदाराची त्याला एकदम चीड आली व त्यानें त्याच्याकडे अत्यंत तिरस्कारानें पाहिलें. फांसावर लटकणाऱ्या कांहीं लोकांना तरी असाच न्याय मिळत असतो का ? असा विचार त्याच्या मनांत क्षणभर येऊन गेला.

शांत चित्तानें दमन साक्षीदाराकडे पहात होता. आपला यत्किंचित्-देखील वैरभाव अगर ओळखही नसतांना क्षुल्लक स्वार्थासाठीं आपला देह फांसावर लटकविण्यास तयार झालेल्या साक्षीदारांच्या साक्षी तो मोठ्या विस्मयानें ऐकत होता. मनुष्याच्या हीनावस्थेचें प्रदर्शन त्याला अतिशय

निराशाजनक वाटलें. पण आपल्या मनाची शांती त्यानें बिलकुल ढळूं दिली नाहीं. उलट होणाऱ्या घोर शिक्षेबद्दल तो निःशंक मनोवृत्ति धारण करीत होता.

सरकारतर्फे सर्व पुरावा संपल्यावर दमनच्या बाजूनें बॅरिस्टर रामदास यांनीं बचावाचें भाषण करण्यास सुरवात केली.

आरोपी व रजनिकान्त यांचा अतिशय स्नेह होता आणि म्हणूनच आरोपी रात्रीं त्याच्या खोलीवर गेला होता. विस्मरणामुळें रजनिकान्तानें दार बंद केलें नव्हतें. आरोपी सरळ त्याच्या खोलींत गेला व आपल्या भगिनीचें चित्र घेऊन बाहेर येऊं लागला. दुसऱ्या दिवशीं मयत चित्र-काराला तें चित्र मी नेलें असें कळविण्याचा आरोपीचा उद्देश होता. पण एवढ्यांत मयत चित्रकार रजनिकान्त जागा होऊन त्यानें तें चित्र हिसकावून घेण्याचा प्रयत्न केला व त्या धडपडींत चित्र फाटून गेलें. तेव्हां मयतानें आरोपीवर चाकूनें अनेक वेळां हल्ला केला व त्याचा प्रति-कार करीत असतां मयत इसम जिन्यावरून पडून दवाखान्यांत मरण पावला अशी आपली बाजू मांडली.

डॉक्टराच्या साक्षींत मयताला झालेली जखम पडल्यामुळें हातांतील चाकू अंगाखालीं सांपडून छातींत खुपसूं शकेल. आरोपीच्या उजव्या बाहूवर चाकूचा वार झाला असल्यामुळें मयतानेंच तो केला असला पाहिजे. शिवाय मयत रजनिकान्ताच्या छातीला झालेली चाकूची जखम मृत्यूस कारण होण्याएवढी गंभीर स्वरूपाची नव्हती. अशा प्रकारचा पुरावा उलट तपासणींत बाहेर आला. रजनिकान्ताच्या नोकरानेंही साक्षींत आपल्या धन्याचा व आरोपीचा दाट स्नेह होता व आरोपी स्टूडिओवर कधींही आला तर त्याच्या स्वाधीन किल्ली कर असा आपल्या धन्याचा हुकूम होता ही गोष्ट कबूल केली.

अनामिका साक्षीदाराच्या पिंजऱ्यांत उभी राहिली तेव्हां तिला पहाण्याकरतां सर्व लोकांची चळवळ सुरू झाली. प्रत्येकजण कान लावून तिचें भाषण उत्सुकतेनें ऐकत होता. तिनें एकवेळ दमनकडे अतिशय आर्द्र दृष्टीनें पाहिलें. त्यांची दृष्टादृष्ट होतांच खालीं मान घालून दमननें दीर्घ निश्वास सोडला.

अनामिका सरकारी कायदेपंडिताच्या प्रश्नाला शांतपणें उत्तरें देत होती. दमनदादाच्या बचावासाठीं आपल्या सर्वस्वाची होळी केली पाहिजे या एकाच विचारानें अब्रूची यत्किंचितही पर्वा ती करीत नव्हती. आपल्या आचरणाचे कबुलीजबाब ती देत होती.

" लग्न करण्याचें वचन देऊन मला भुरळ पाडली, आणि पॅरिसच्या प्रदर्शनार्थ ठेवण्याकरितां माझें विवस्त्र चित्र काढून झाल्यानंतर रजनिकान्त विवाहित असून त्याची पत्नी व मुलें हयात आहेत असं अनपेक्षितपणें मला समजलं. हा प्रकार समजतांच तावडतोब निघून ये, अशी मी दादाला लाहोरला तार पाठविली. तो आल्यावर कांहींही करून तें चित्र रजनिकान्तकडून आण असा हट्ट मी धरला. "

अशा प्रकारची साक्ष ऐकून सरकारी वकिलानें तिच्यावर अनैतिक वर्तनाचा आरोप येईल अशा कितीतरी सूचक प्रश्नांचा भडिमार केला. त्यांचीं उत्तरं अनामिका निर्भीडपणें देत होती. या तिच्या मनोधैर्याची सर्व प्रेक्षकवर्गांत चर्चा सुरु झाली. आपल्यावर निष्कारण खोटे आरोप करून आपल्या प्रेम-संबंधाचें विडंबन करणाऱ्या कायदेपंडिताचा तिला एकदोन वेळ अतिशय तिरस्कार वाटला व कांहीं प्रत्युत्तरांच्या वेळीं तिचा कंठ दाटून येऊन डोळ्यांत अश्रू उभे राहिले. पण नेहमींच्या सरावापुढें त्याला त्याचें बिलकुल महत्त्व वाटलें नाहीं. त्यानें दिलगिरी व्यक्त करीत प्रश्नाचा तसाच सपाटा चालविला होता. परंतु तिच्या उत्तरापासून कांहींच निष्पन्न न होतां तिच्या कळकळीचा परिणाम पंचाच्या मनावर आपणाला प्रतिकूल होत आहे असें पाहून त्यानें तिची उलट तपासणी एकदम थांबविली.

इतक्यांत घड्याळांत पांचाचे ठोके पडले. न्यायाधीश त्या दिवसाचें काम आटपून उठले. अजूनपर्यंत एकाग्रतेनें ऐकत असलेल्या प्रेक्षकवर्गांत एकदम गलबलाट सुरू झाला. मधाच्या पोळ्यावर बसलेल्या मधमाशावर कोणीतरी दगड मारतांच एकदम गुणगुणत त्यांनीं जसें सैरावैरा धांवावें त्याप्रमाणें सारे लोक इकडे तिकडे बोलत फिरूं लागले.

दमनच्या भोंवतीं गराडा पडला होता. कांहीं तरुण मंडळी शकुन्तलाबाई, अनामिका आणि इतर मंडळी यांच्या आजूबाजूस रेंगाळून त्यांचें भाषण ऐकण्याचा प्रयत्न करीत होती. त्या सर्व मंडळींत अनेक प्रकारचे तर्ककुतर्क चालले होते. दमन निश्चित सुटणार असें कांहीं लोक म्हणत होते, तर कांहीं लोक गंभीर मुद्रेनें त्याच्या सुटकेची आशा दिसत नाहीं असा निर्णय देत होते. जवळच उभ्या असलेल्या शशिधरला त्यांचे अंदाज बिलकुल हास्यास्पद वाटत नव्हते. एखाद्याला दमनच्या सुटकेबद्दल निश्चितपणानें बोलतांना ऐकून तो उत्साहानें तिकडे लक्ष देत होता तोंच " No, his offence is quite clear and he shall be hanged." (अरे, गुन्हा शाबीत झालाच आहे. फांशीचीच शिक्षा होणार.) असे कुणाचे तरी हृदयभेदी शब्द ऐकतांच त्याच्या अन्तःकरणाला चटका बसत होता.

" नॅन्सी, दमन सुटेल असं तुला वाटतं ना ? " बाजूला उभ्या असलेल्या नॅन्सीला त्यानें हताश होऊन प्रश्न केला.

" खात्रीनें ते निर्दोषी ठरतील. " असें म्हणतांना देखील तिच्या चेहऱ्यावर शशिधरच्या संशयी मनाला निराशाच दिसली.

खटल्याचा शेवटचा दिवस उजाडला. त्या दिवशीं न्यायमंदिरांत अतोनात गर्दी लोटली होती. न्यायाधीश आपल्या आसनावर बसल्यानंतर थोड्याच अवधींत काम पुढें सुरू झालें. दोन्ही पक्षाच्या कायदेपंडिताची वक्तृत्वपूर्ण जोरदार भाषणें ऐकून सर्वसाधारण श्रोतृवर्ग बुचकळ्यांत पडला होता. आरोपीची बाजू ऐकून दमन सर्वस्वी निर्दोषी आहे असें एकवेळ वाटावें तोंच पुन्हा सरकारी कायदेपंडिताचें निश्चित स्वरूपाचें भाषण ऐकून मनाचा तोल दुसऱ्या बाजूला जावा. सर्वांच्या मनोवृत्ति असे हेलकावे खात होत्या.

सर्व श्रोतृवर्ग एकाग्रतेनें तीं भाषणें ऐकत असल्यामुळें जिकडे तिकडे विलक्षण गांभीर्य पसरलें होतें. दोन्ही पक्षाची परस्पर विरोधी भाषणें आटोपल्यावर न्यायाधिशांनीं पंचास खटला समजाऊन देण्यास सुरवात केली. त्यांची मुद्रा गंभीर झाली. जबाबदारीची जाणीव

असल्यामुळें त्यांची वृत्ति शांत होती. यामुळें सर्व लोक अत्यादरानें त्यांच्याकडे पहात होते. त्यांनीं सर्व आरोपांचें स्वरूप सांगून कायदा काय आहे याचें स्पष्टीकरण केलें व पुढें आलेल्या पुराव्याचें समालोचन करून पंचास आपलें मत देण्यास विनंती केली.

न्यायाधिशाच्या भूमिकेंतील समतोलपणा, गांभीर्य आणि सात्विकता हीं त्या अधिकारी वाणींत स्पष्टपणें दृग्गोचर होत होतीं. न्यायदेवतेचा कठोरपणाही त्यांच्या ठायीं स्पष्ट दिसून येत होता. आपलें दीर्घ व अस्खलित भाषण संपवून त्यांनीं पंचास विचारविनिमय करण्यासाठीं पलीकडल्या दालनांत जाण्यास सांगितलें व ते देखील सभा मंडपांतून आपल्या खोलींत गेले.

सर्वत्र गंभीर वातावरण पसरलें होतें. बहुतेक सर्व व्यक्तींच्या तोंडावर दुःखाची दाट छाया उमटलेली दिसत होती. शकुन्तलाबाई व अनामिका आपला दुःखावेग आवरण्याचा आटोकाट प्रयत्न करीत होत्या तरीदेखील त्यांच्या डोळयांतून वहाणारे अश्रु क्षणभरही थांबले नव्हते. त्या दोघी परमेश्वराची सारखी करुणा भाकीत होत्या. तेथें असलेल्या स्त्रियासुद्ध त्यांच्या स्थितीकडे पाहून व्याकूळ झाल्या होत्या.

दमन मात्र शून्य दृष्टीनें समोरच्या रिकाम्या न्यायासनाकडे पहात होता. पंच कसेंही मत व्यक्त करोत आपण आतां वाटेल त्या निकालास तोंड देण्यास सिद्ध आहों असाच भाव त्याच्या मुद्रेवर दिसत होता. त्याच्या विलक्षण शांत वृत्तीबद्दल सर्व मंडळींना आश्चर्य वाटत होतें. तो खरोखरीच निर्दोषी असावा असें ते आपआपसांत कुजबुजत होते.

शशिधर मात्र अगदीं घाबरून गेला होता. दमनला आपण धीर द्यावा असें त्याच्या मनांत आलें. पण त्याच्या तोंडांतून शब्दच बाहेर फुटेनांत. डोळ्यांतलें अश्रु पुसून तो धीरानें त्याच्याजवळ राहण्याचा प्रयत्न करीत होता इतक्यांत दमननेंच त्याला हांक मारली,

"शशी, आईला नॅन्सीबरोबर तूं घरीं पाठव. असें घाबरूं नका, खरंच मी अगदीं निर्धास्त आहें."

आपल्या तत्वाकरितां वाटेल तो छळ सोसून अढळ शांतीनें मरणाला कवटाळणाऱ्या विभूतिप्रमाणें उच्चारलेले दमनचे ते शब्द ऐकून सर्व लोक आश्चर्यचकित झाले. पण शशिधरनें कितीही विनविलें तरी शकुन्तलाबाई व अनामिका घरीं जाण्यास तयार होईनात. त्याचा नाइलाज झाला.

घड्याळाचा कांटा पुढें सरकत होता. पंचाच्या आगमनाकडे सर्वांचे डोळे लागले होते. सर्वत्र भीषण स्तब्धता वावरत होती. इतक्यांत पंच बाहेर आले. तेथें जमलेल्या स्त्रीपुरुषांच्या हृदयांत विलक्षण कालवाकालव होत होती. शकुन्तलाबाईंचे प्राण तर गळ्याशींच आले होते. एका कुटुंबाच्या सुखदुःखाचा अखेरचा निर्णय लागावयाचा होता. सर्वांची कल्पनाशक्ति कांहींकाळ बधीर झाल्या प्रमाणें दिसत होती. पंच–प्रमुखाच्या चेहऱ्यावरील भाव जाणण्याचा प्रत्येकाचा प्रयत्न चालला होता. त्याच्या तोंडून आकाशवाणी होणार असल्याप्रमाणेंच सर्व उत्कंठेनें त्याच्याकडे पहात होते.

जसा जसा वेळ होत होता तसतशी उत्कंठा वाढूं लागली. न्यायाधीश येत असल्याचा पुकारा झाला. क्षणभर सर्वांनीं श्वास कोंडून धरला. मनावरील दुःखाचा दाब शकुन्तलाबाईंस असह्य होऊन त्यांनीं एकदम हुंदका दिला व मूर्च्छा येऊन त्या धाडकन खालीं पडल्या. त्या गंभीर व शांत वातावरणांत तो आवाज किती तरी मोठा वाटला. मातृ–हृदयाच्या त्या दारुण यातना पाहून सर्वांनीं दीर्घ निश्वास टाकले. तेथें असलेल्या कांहीं स्त्रियांना तो देखावा असह्य होऊन त्या न्याय–सभेंतून बाहेर गेल्या.

पुन्हां सर्वत्र स्तब्धता पसरली. न्यायाधीशानें गंभीर स्वरानें पंचांना त्यांचा निर्णय विचारला. तेव्हां पंचप्रमुख आपल्या आसनावरून उठून उभा राहिला. त्याच्या मुद्रेवरील गांभीर्य भीतिप्रदच वाटत होतें. घसा साफ करून तो शांतपणें बोलूं लागला.

“आरोपीवर असलेल्या पहिल्या आरोपाबद्दल म्हणजे खुनाच्या आरोपाबद्दल आरोपी निर्दोषी आहे असें आम्हीं पंच एकमतानें ठरवितों.”

पंच–प्रमुखाच्या तोंडांतून ते शब्द बाहेर पडतांच श्रोतृसमुदायांत केवढा तरी गलबलाट झाला. आनंदाच्या लहरीमुळें सर्व श्रोत्यांचे चेहरे

एकदम उमलले. जिकडे तिकडे समाधानाचा श्वास बाहेर पडूं लागला. कांहीं मंडळी तेवढा निर्णय ऐकतांच आनंदानें सभा–गृहांतून निघून गेली. दारावरील हवालदारानें आर्डर, आर्डर, अशा हुकूमानीं शांतता प्रस्थापित करण्याचा प्रयत्न केला. परंतु तिकडे कुणीच लक्ष दिलें नाहीं.

अनामिकेचे दुःखाश्रूनीं वाहणारे डोळे आतां आनंदाश्रूनीं वाहूं लागले. शशिधरला तर दमनला घट्ट मिठी मारावी असेंच वाटलें. अभिवादन व अभिनंदन करणाऱ्या स्नेह्यांचा स्वीकार मस्तक नमवून दमन करीत होता. जवळच उभी राहून अत्यानंदामुळें रुबी रडत होती.

सर्व लोकांची नजर अनामिका, दमन, शशीधर आणि शकुन्तलाबाईकडे क्रमाक्रमानें पहात होती. शकुन्तलाबाईचा भार अंगावर तोलून रुबी त्यांना वारा घालीत होती. तिचे देखील डोळे आनंदाश्रूनीं ओथंबले होते.

दमनच्या चेहऱ्यावर जरी समाधानाची छटा दिसली तरी भयंकर गुन्ह्याच्या आरोपांतून सुटल्यामुळें वाटणारा अत्यानंद त्यानें आवरून धरला होता. शशिधरला आनंदानें हंसतांना पाहून त्यानें किंचित् स्मित करून पुन्हा आपली दृष्टी निर्विकार केली.

पंच–प्रमुख अजूनही भाषणाच्या हेतूनें उभा आहे हें दिसतांच कांहीं लोकांना क्षणभर भीति वाटली. गडबड तशीच चालू होती. न्यायाधीश शांतपणें स्मित करीत तो देखावा पहात होते. पुन्हां शांतता प्रस्थापित झाल्यावर पंच–प्रमुख पुढें बोलूं लागला.

" परंतु आरोपीवर असलेल्या दुसऱ्या व तिसऱ्या आरोपाबद्दल म्हणजे चोरी व ट्रेस्पास याबद्दल आरोपीस एकमतानें दोषी ठरविण्यांत येत आहे. "

ह्या निर्णयामुळें सर्वत्र एकदम स्तब्धता झाली. न्यायाधीशानें तो निर्णय मान्य करून आरोपीस त्याच्या तरुण वयाकडे व आपल्या भगिनीच्या अब्रूरक्षणार्थ केलेला हा गुन्हा आहे हें जाणून एक वर्ष व दोन वर्षें सक्त मजुरीची एकाच वेळीं भोगण्याची शिक्षा फर्मावली.

दमनला झालेल्या शिक्षेमुळें सर्वांना वाईट वाटलें; नाहीं असें नाहीं पण त्याचें एवढेंसें महत्व कोणालाच वाटलें नाहीं. आपला दादा मृत्युमुखांतून परत आल्याबद्दल अनामिकेचा आनंद गगनांत मावत नव्हता. तरी त्याचा वियोग दोन वर्षें आपणांला सहन करावा लागणार ह्या विचारानें तिला रडूं कोसळलें.

शकुन्तलाबाईकरतां मागविलेली ॲम्ब्युलन्स–गाडी येतांच शशिधरनें त्यांना रुबी आणि नॅन्सीबरोबर घरीं पाठविलें. गाडी घरीं पोहोंचतांच दमनला फांशीची शिक्षा झाली असावी असाच आजूबाजूंच्या सर्व लोकांचा समज झाला.

दमन पिंजऱ्यांतून बाहेर येतांच अनामिकेनें त्याला घट्ट मिठी मारली.

"ताई," दमन कंठ साफ करीत घोगऱ्या स्वरांत म्हणाला, "घाबरूं नकोस, आईच्या प्रकृतीकडे लक्ष ठेव. माझी बिलकुल काळजी करूं नका."

"दादा–दादा, मला–क्षमा–करशील–ना ? होय–म्हण–एकदां." अनामिका स्फुंदत स्फुंदत म्हणाली.

दमनच्या हातांतील बेड्यांचा खळखळाट झाला. अनामिकेच्या हृदयावर जोराचा आघात झाला. या सर्वाला कारण आपण ही जाणीव तिला झाली. तिनें केविलवाणी मुद्रा करून आपल्या दादाकडे पाहिलें. दमननें वांकून शृंखलायुक्त हातांनीं आपले अश्रू पुसण्याचा प्रयत्न केला.

तो हृदयद्रावक देखावा पाहून कैद्याला नेणारे हवालदारही किंचित् भावनाकुल होऊन उभे राहिले. पण बेड्यांचा आवाज ऐकतांच त्यांनीं दमनला चालण्याचा इषारा दिला.

"बरं शशी, येतो हं." दमन गहिंवरून म्हणाला, "सर्वांचा मी आभारी आहे. नॅन्सीला सांग. रुबीलाही सांग. ताई, कमलेला म्हणावं मी तुझी सारखी वाट पहात होतों. ताई, रडूं नकोस. आईला माझा नमस्कार सांग, तिची समजूत घाल आणि म्हणावं दमन हंसत तुरुंगांत गेला."

मोठ्या कष्टानें खरोखरच तो हंसला. तें दृश्य पाहून लोकांना त्याच्या उदार मनाचें कौतुक वाटलें. सहानुभूतीनें त्यांनीं कळवळून पाहिलें. आजू-

बाजूला उभ्या असलेल्या आप्तेष्टांचा निरोप घेऊन तो न्यायमंदिरांतून खालीं आला. पोलीसांच्या मोटारजवळ जातांच सर्वांना नमस्कार करून तो आंत चढला.

अनामिका व शशिधर एका टॅक्सींतून त्या पोलीसांच्या मोटारच्या मागून चालले होते. शेवटीं दमननें त्यांना हातानें खुणावून जाण्याची विनंती केली.

शशिधरनें ड्रायव्हरला मोटार दुसऱ्या रस्त्यास वळविण्यास सांगितली. अनामिका साश्रु नयनांनीं दमनकडे पहात होती. ती मोटार दिसेनाशी होतांच हातरुमालानें तिनें डोळे व नाक पुसलें.

" शशिधर, आईबरोबर नॅन्सी आहे ना ? " तिनें खोल आवाजांत प्रश्न केला.

" हो; आम्ही जाईतोंपर्यंत ती तिथंच असणार. " असें म्हणून त्यानें घड्याळांत पाहिलें.

मोटार चौपाटीकडे आली होती. पश्चिम समुद्रामध्यें सूर्य मावळला होता. " So ends the day. " असें म्हणून शशिधरनें खिशांतून हातरुमाल काढून आपला चेहरा पुसला.

अनामिका मागें रेलून डोळे मिटून स्वस्थ पडली होती. तिच्या मिटलेल्या नेत्रांतून अश्रूंचे ओघळ वहातच होते.

---



त्या दिवशीं संध्याकाळीं शकुन्तलाबाई गच्चींत आरामखुर्ची टाकून विचार करीत बसल्या होत्या. दुपारपासून पावसानें झोड उडविली होती. सूर्य मावळण्याचे सुमारास कोठें आकाश कांहींसें स्वच्छ झालें होतें. पण जिकडे तिकडे उदासीनता वावरत होती. अद्याप रात्र झाली नव्हती, तरी पश्चिम क्षितिजावर आभाळ आल्यामुळें काळोख पडला होता.

शकुन्तलाबाईंना आठवण झाली. अशाच पावसाळ्यांतील एका दिवशीं दमनचा जन्म झाला. नंतर तीन वर्षांनंतर अशाच दिवशीं आपल्या पतीचें भांडण होऊन आपण गृहत्याग केला, तेव्हांपासूनच दुर्दैव हात धुवून पाठीस लागलें. इंदु, शशिकला आणि आपण. इंदु लहानपणींच गेली. शशी आज संसारांत सुखी आहे. आयुष्यांत किती खांच खळग्यांत जावें लागलें ! दमाच्या जन्मापासून थोडे का तापत्रय भोगले ! आणि अजून तरी काय ? प्रेमाच्या माणसांतील एखादें जरी सोडून गेलें तरी आपण जगणार नाहीं असें सारखें आपल्याला वाटत असे आणि अजूनही आपण जिवंतच आहोंत !

शकुन्तलाबाई गतकालचें समालोचन करीत होत्या. मागच्या आठवणीनें त्या अतिशय अस्वस्थ व व्याकुळ झाल्या. पण कांहीं केलें तरी तीं स्मृतिचित्रें डोळ्याआड होत नव्हतीं.

आपली केवढी महत्वाकांक्षा ! सगळ्या जगानें आमच्याकडे मत्सरानें पहावें. पतीबद्दल आपल्या काय काय अपेक्षा होत्या ! स्त्रियांच्या उद्धाराकरितां वाहून घ्यावयाचें हा आपला निश्चय ! स्त्री-उद्धारासाठीं धडपडण्याच्या साऱ्या आकांक्षाचे आपण होतों कोठें व आज आहोंत कोठें !— या विचारानें त्यांना वेड लागण्याची पाळी आली. समाधानाची जागा त्या पाहूं लागल्या. कल्पनासृष्टींत सुखाचे बांधलेले उंच उंच मनोरे त्या

सत्यसृष्टींत दिसले नाहींत तर त्यांत निराशाजनक असें कांहींच नाहीं असें त्या मनाला पटविण्याचा प्रयत्न करूं लागल्या.

आयुष्यांत मिळालेल्या कटु अनुभवामुळें आणि हृदयावर झालेल्या वज्राघातामुळें आपण केवळ दैवाधीन आहोंत असें त्यांस नेहमीं वाटत असे. आणि त्यांच्या ह्या दैववादाबद्दल दमन व अनामिका तिच्याशीं नेहमीं वाद करीत असत.

दमनला शिक्षा झाली त्याला आज उणेंअधिक वर्ष होत आलें होतें. उद्यां त्याला भेटण्यासाठीं येरवड्यास जावयाचें असल्यामुळें शकुन्तलाबाई अतिशय अस्वस्थ झाल्या होत्या. तो कारागृहांत पडल्यापासून त्याची प्रकृति कितीतरी क्षीण झाली होती. प्रत्येक भेटीच्या वेळीं तो अधिक अधिक अशक्त झाल्यासारखा त्यांना दिसला. यामुळें उद्यां कांहीं तरी विचित्र प्रकार दिसेल कीं काय म्हणून त्या अतिशय चिंतातुर झाल्या होत्या. शाळेंतल्या मास्तरनीं व कॉलेजच्या प्रोफेसरनीं अनेक वेळां सांगितलें होतें, कीं "तुम्हीं दमनला विलायतेला पाठवा. अशी कल्पक बुद्धी आणि तीव्र जिज्ञासा विद्यार्थ्यांमध्यें क्वचितच आढळते. पुढंमागं जागतिक विद्वान लोकांत त्याची गणना झाल्याशिवाय रहाणार नाहीं.' शकुन्तलाबाईंना तें पटलें होतें व त्या दमनला विलायतेस पाठविण्याच्या विचारांत होत्या.

पण आज त्यांच्या मनांत कोणते विचार होते ? आज दमन तुरुंगांत खडी फोडीत आहे. उद्यां सुटल्यावर तो स्वस्थ बसायचा नाहीं. कारण तुरुंगांत तरी तो कोठें स्वस्थ होता ? "आई, त्या बंदिशाळेंत मी किती तरी बांधवांना शिकवित आहे आणि मी पण शिकत आहे. माझ्या सुखांत जर कोणती कमतरता असेल तर ती तुमच्या सर्वांच्या सहवासाचीच." हें प्रत्येक पत्रांत लिहिलेलें असायचें.

दमनची दिवसेंदिवस दिसणारी त्यागी वृत्ति शकुन्तलाबाईंना जरी भीतिप्रद वाटत होती तरी त्याच्या उदार वृत्तीबद्दल त्यांना आदरच वाटत होता. आपण त्याच्या ध्येयनिष्ठेच्या आड येण्याचा प्रयत्न करतों तो केवळ स्वार्थबुद्धीनेंच होय असें त्यांना वाटत होतें. त्याच्या कार्यांत आप-ल्याला मदत करितां येणार नाहीं काय असादेखील विचार त्यांच्या मनांत

"एकसारखा अलीकडे घोळत असे. त्याच्याजवळ असलेलीं आर्थिक शास्त्रावरील व राजनीतीवरील पुस्तकें वाचून त्यांच्याही मनाचा कल साम्यवादाकडे झुकत होता व जगांत उदात्त राज्यघटना आणि शुद्ध आनंद जर निर्माण करायचा असेल तर उदात्त साम्यवादाच्या पायावर तो उभा राहूं शकेल असें त्यांनामुद्धां वाटूं लागलें होतें.

दमन लिहिलेल्या पत्रांत म्हणत असतो कीं, "आई, निर्मल ध्येयावर अढळ निष्ठा ठेवून वागतांना येणाऱ्या अडचणी व होणाऱ्या हालअपेष्टा खरोखरीच मला किती आनंद देतात हें माझ्या हृदयांत शिरल्याशिवाय तुम्हांला बिलकुल कळायचें नाहीं. ह्या मंदिरांत माझ्या मनाला वाटणारी शांती किती उदात्त आहे! आई, इथं येणारे खुनी, दरोडेखोर, चोर वगैरे गुन्हेगार पुष्कळ वेळां किती समंजस, प्रेमळ व भावनाप्रधान असतात! माझ्यावर त्यांचें किती प्रेम आहे; भय्या, म्हणून त्यांनीं मारलेली हांक किती प्रेमळ असते. समाजांतील हे मौल्यवान घटक घातक म्हणून फेंकण्यांत आम्ही किती अन्याय करतों बरं! आई, खून, दरोडा, चोरी, अफरातफर हे सगळे समाजांतील विषमतेचे परिणाम आहेत. मी माझ्या सोबत्यांचा मानसशास्त्रदृष्ट्या अभ्यास करतों आहें. प्रामुख्यानें मला हेंच दिसून येतें कीं पुष्कळसे गुन्हेगार दारिद्र्यानें गांजलेले, लहानपणींच शिक्षणास अंतरलेले असेच असतात. पण त्यांचं अन्तःकरण अगदीं मृदु असतं. कांहीं दिवसांपूर्वीं एक दरोडेखोर बंदिवासांतून सुटतांना माझ्या गळयाला मिठी मारून किती ओक्साबोक्शीं रडला! खरंच आई, ह्या बंदिशाळेंत होणारा मानसशास्त्राचा अभ्यास आमच्या कॉलेजांतही कधीं झाला नसता. शिवाय आतां पुन्हा कधींही ह्या भव्य भिंतीच्या आंत जातांना कसल्याच प्रकारची मला भीती वाटायची नाहीं."

दमनचीं अशा स्वरुपाचीं पत्रें वाचून शकुन्तलाबाईंना समाधान वाटत असे; तरी त्याच्या कार्याला प्रोत्साहन देण्यास त्यांचें मन बिलकुल तयार नव्हतें. पण ध्येयसिद्धीसाठीं वाटेल त्या संकटांत उडी घेण्यास तयार असलेल्या दमनला मार्गे खेंचण्याचा किती जरी प्रयत्न केला तरी तो सर्वस्वीं विफल आहे असें त्यांना वाटत होतें. आत्महत्या करून आपली

जीवितयात्रा संपवावी असें त्यांच्या मनांत कधीं आलें तर 'मुलां-करतां तुला जगलं पाहिजे' हे लक्ष्मीमावशीचे शब्द त्यांच्या कानांत गुणगुणत असत.

दुसऱ्या दिवशीं अनामिकेला घेऊन त्या येरवड्यास गेल्या. कैद्यांना भेटण्याकरितां म्हणून राखून ठेवलेल्या खोलींत त्या दमनची वाट पहात होत्या. इतक्यांत दमन धांवत तेथें आला. शकुन्तलाबाईनीं वात्सल्यानें त्याला घट्ट हृदयाशीं धरलें. त्यांच्या डोळ्यांतून घळघळ अश्रुधारा वाहूं लागल्या. अनामिकेनेंही दमनचा हात घट्ट धरून सद्गदित होऊन त्याला अस्फुट हांक मारली.

"आई, तूं आजारी होतीस का?" त्यानें गहिंवरून विचारलें.

"नाहीं बाळ. पण तूं कधीं सुटशील असं मला झालं आहे." शकुन्तलाबाई आवंढा गिळून म्हणाल्या.

"मी परदेशच्या कॉलेजांत आहें असं समज ना. आई, मी पूर्वी कधीं पुराणं वाचलीं नव्हतीं. पण तुरुंगाच्या लायब्ररींत मी तीं सर्व वाचलीं. मला फार फार आवडलीं तीं. खरंच, महाभारतांतील शांतिपर्व तर किती उद्बोधक वाटला! मनाला किती समाधान आणि आनंद वाटतो! शिवाय व्यासांच्या स्वभावरेखाटनाची तर फारच स्तुति करावीशी वाटते. विचार-शक्तीला केवढं खाद्य मिळतं! पुराणं वाचून माणसाला आपला दृष्टिकोन विस्तृत आणि उदार करतां येतो. खरंच आई, ज्यावेळीं तुमच्या आठव-णीनं मी उदास होतों तेव्हां मी महाभारत वाचावयास घेत असतों त्यामुळं पुष्कळ उत्साह वाटतो आणि सभोंवारचं निराशाजनक वातावरण चटकन् नाहींसं होतं."

"दादा," अनामिका मध्येंच म्हणाली, "शशिधर नॅन्सीला घेऊन बेळगांवला गेले आहेत."

"कां बरं! लवकरच त्यांचा विवाहाचा बेत आहे कीं काय?" दमननें उत्सुकतेनें प्रश्न केला.

"नाहीं. ते म्हणतात, कीं तूं तुरुंगांतून सुटेपर्यंत आपण लग्न करणार नाहीं."

"कांहींतरीच। त्याला म्हणावं कीं 'दमननें तुला त्वरित लग्न कर-ण्याचा अतिशय आग्रह केला आहे. तुरुंगांत ती सुवार्ता ऐकावी अशी त्याची फार इच्छा आहे.' खरंच नॅन्सीसारखी सुस्वभावी मुलगी क्वचित्‌च आढळेल. तिच्या वागणुकीवर आर्य-संस्कृतीची भरपूर छाप पडल्यासारखी दिसते. पण ताई कमला काय म्हणते? खरं खरं सांग. हें बघ, कमला माझ्यावर रागावली आहे. हेंच ना तूं लपवितें आहेस? सहाजिकच आहे. माझ्या हातून चुकून का होईना पण गुन्हा झाला. तिच्या दृष्टीनं मी दुराचारी ठरलों तर त्यांत तिची काय चूक?"

"दादा," अनामिका रागानें म्हणाली, "कमलेवर तूं व्यर्थ प्रेम करतो आहेस. श्रीमंतींत वाढलेली, आईबापांनीं लाडावलेली अचरट मुलगी ती! तिला तुझ्या प्रेमाची किंमत कशी कळायची! ज्यावेळीं तुझा निरोप सांगायला मी गेलें तेव्हां म्हणते, 'मी गुन्हेगाराशीं मैत्री करूं इच्छित नाहीं.' आणि मीसुद्धां तिला सांगितलं, 'आम्हीही असल्या श्रीमंत अचरट माण-साशीं संबंध ठेवूं इच्छित नाहीं.' आणि तडक निघून आलें."

"ताई," दमन निश्वास टाकून खिन्नपणें म्हणाला, "ती तरी कुठं चुकली? देशाच्या न्यायदेवतेनेंच मला गुन्हेगार ठरविलं ना? साम्यवादा-कडं अत्यंत तिरस्कारानं पहाणाऱ्या जमीनदाराची ती कन्या. अद्यापपर्यंत आमच्याशीं तिनं सख्य दाखविलं हेंच आश्चर्यकारक नाहीं का?"

"दादा, रावबहादुर देशपांड्याच्या मोठ्या मुलाशीं तिचा विवाह परवां व्हावयाचा आहे. तो कसलीतरी परदेशी पदवी घेऊन आला आहे. हिला शोभेलसा शंखोबाच आहे तो."

दमननें मान वर करून स्थिरपणानें अनामिकेकडे पाहिलें. क्षणभरानें सावध झाल्याप्रमाणें त्यानें दीर्घ निश्वास टाकला.

कमला आपणास सर्वस्वी अन्तरली आहे अशी त्यानें मनाला जाणीव करून घेतली होती. तरीदेखील यावेळीं त्याला वाईट वाटलें व क्षणभर तिच्याबद्दल तिरस्कारही वाटला. स्त्री ही अत्यंत दुर्बल मनाची आणि संशयी स्वभावाची बाहुली आहे असा 'सिद्धान्त त्यावेळच्या मनस्थितींत त्यानें मनाशीं निश्चित केला.

शकुन्तलाबाई कांहीं तरी बोलणार होत्या तोंच दमन मान वर करून म्हणाला, " ताई, कमला कधींच स्वतंत्र असं जीवित जगलीच नाहीं. वडील म्हणजे एखादा सर्वज्ञानी परमेश्वराचा अवतारच तिला वाटत असतात आणि तिला तरी तसं कां वाटूं नये ? विपुल पैसा मिळविलेल्या कुठच्या मनुष्याला अक्कल नसते असं आम्ही म्हणूं ? अलोट संपत्ती, समाजांत मिळणारा मानमरातब आणि सुदैवानं सुरळीत चाललेला प्रपंच अशा स्थितींत कोडकौतुक पुरविणाऱ्या बापाविषयीं कुठल्या कन्येला मोठेपणाची कल्पना होणार नाहीं ? अस्सं. एकंदरींत कमलेचा विवाह निश्चित झाला म्हणायचा."

" दमा, " शकुन्तलाबाई प्रेमानें त्याच्या पाठीवरून हात फिरवीत म्हणाल्या, " कमलेसारख्या शेंकडों मुली माझ्या बाळावरून ओंवाळून टाकाव्यांत ! खरंच बाळ, झाल्या गोष्टीबद्दल मला समाधान वाटलं. तूंच मला सांग, तिनं कधीं तरी तुला सुख दिलं असतं का ? तुझं ध्येय समजून घेण्याएवढी ती बुद्धिवान् होती का ? तुरुंगवास, ऐच्छिक दारिद्र्य आणि मजुरांचं पुढारीपण ह्या तीनें गोष्टींचा आनंदानें स्वीकार करणाऱ्या पतीबद्दल तिनं कधीं तरी अभिमान बाळगला असता का ? "

" आई, माझ्या ध्येयाबद्दल तुला अभिमान वाटतो तर ? " त्यानें एकदम आतुरतेनें प्रश्न केला.

" बाळ, " शकुन्तलाबाईंना गहिंवरून आलें. प्रेमानें त्याला हृदयाशीं धरून दाटलेल्या स्वरांत त्या म्हणाल्या, " तुझ्यावरून मी माझे प्राणसुद्धां ओंवाळून टाकीन. "

" मग आई, माझ्या ध्येयाला हातभार लावण्याचें कां करीत नाहींस ? "

" दमा, " शकुन्तलाबाई आंवंढा गिळून म्हणाल्या, " मी माझ्या छकुल्याकडे व्यवहारी दृष्टीनं पहातें. ध्येयनिष्ठेसाठीं वाटेल तो छळ सोसणाऱ्या थोर विभूतींच्या हालअपेष्टांचं चित्र माझ्या डोळ्यासमोर उभं राहातं. कुठल्या ध्येयैवाद्याच्या पदरीं सुखाचा लवलेश तरी येतो तें सांग ना. "

"पण त्या कीर्ति मंदिराकडे जाण्याचा मी प्रयत्न करतों त्यावेळीं तुम्ही माझ्या मार्गात अडथळा कां आणतां ? सुख आणि दुःख या मनाच्या कल्पना आहेत. खरोखरींच मला माझ्या ध्येयासाठीं झगडतांना किती किती आनंद होतो ! कीं खरंच आई, कित्येक वेळां या आपत्ती अडचणींचा परिणाम माझ्या मनावर बिलकुल होत नाहीं. उलट मला दुप्पट धैर्य येतं ! ब्रह्मानंद याहून कांहींतरी वेगळा असेल असं नाहीं वाटत मला."

"दादा," अनामिका मध्येंच म्हणाली, "पण स्वार्थत्याग कशासाठीं करायचा ? तुझ्या उदार तत्त्वाचे अनुयायी किती थोडे आहेत याची तुला कल्पना आहे का ?"

"ताई,जेलरसाहेबांच्या चांगुलपणाचा फायदा घेऊन असल्या राजकीय विषयावर आपण बोलणं बरं नाहीं. पण असं बघ, जगांत अनुदारपणा, स्वार्थ आणि अविश्वास यांचं प्राबल्य आहे म्हणून सत्यान्वेषण करणाऱ्या मनुष्यानं हातपाय गाळणं उचित होईल का ? साधारण समाजाच्या पचनीं न पडणाऱ्या तत्त्वांची वाढ नेहमीं अगदीं नकळतच होत असते. त्या निसर्गसिद्ध नियमाला मदत करून आपल्या कल्पवृक्षाला आपण लवकरच बहर आणूं असं नाहीं का तुला वाटत ? ताई, एकएक व्यक्ति जरी आमच्या मार्गाकडे वळली तरी अगदीं नकळतच आमचा साम्यवाद हा एक विस्तीर्ण वृक्ष होऊं शकेल. जुलुमानें प्रस्थापित केलेल्या शांततेच्या मनोऱ्यामध्यें किती गुलाम कोंडले गेले आहेत हें कुणाला दिसतं ? खरंच, राहून राहून मला मानवी स्वभावाचं आश्चर्य वाटतं ! निःस्वार्थी उदारबुद्धि मानवाच्या आटोक्याबाहेरची का आहे ? पण आई, रजनिकान्ताच्या पत्नीला तूं कधीं भेटली होतीस का ?"

"हो बाळ, तिलाही तो छळीत असे. तिला एवढी रक्कम दिल्यामुळें ती आमच्याबद्दल आदरच बाळगते."

रजनिकान्ताचा विषय निघाल्यामुळें अनामिका एकदम खिन्न झाली. ही गोष्ट दमनच्या तात्काल लक्षांत येऊन विषय बद्दलण्याच्या हेतूनें तो म्हणाला, "आई, अगदीं अलीकडे प्रसिद्ध झालेलीं पुस्तकं पाठव हं. पोटाची भूक शमविण्यापेक्षां तुरुंगांतील मानसिक भूक फार असह्य होते

बघ. मग कैद्यांशीं गोष्टी करण्यांत वेळ घालवितों. खरंच आम्हा कैद्यांमध्यें किती सलोखा आहे! आपण गुन्हा कसा केला, कां केला याचं वर्णन एकएकजण मोकळेपणानं करूं लागला कीं एखादी चटकदार कादम्बरीच आपण वाचीत आहों असं वाटतं. कांहींना आपल्या पापकृत्याबद्दल किती किती पश्चात्ताप झालेला असतो. ती सारी हकिगत सांगतांना ते ढळढळां रडतात! पण खरा पश्चात्ताप झाला तरी फक्त तुमच्या स्वर्गांतच गुन्ह्याच्या शिक्षेची माफी होते! कांहीं मात्र पुरे बनलेले असतात; त्यांच्या ठिकाणीं बहुतेक मानसिक विकृती आणि विकृत वासनाच दिसतात. अगदीं थोड्याशा लोभाखातर वासनावश होऊन पशूप्रमाणें खून करतील. पण सर्वसाधारण कैद्यांच्या पूर्वचरित्राकडे पाहिलं तर त्यांच्या पापाचरणास सभों वारची परिस्थितीच बरीचशी कारणीभूत असते. तो बघ ताई, तो तिकडे बुरुडकाम करतो आहे ना! त्यानं बायकोचा खून केला होता. पण कां? बायको वाईट चालीची निघाली तेव्हां यानें तिला घराबाहेर काढली. तिनं पोटगीसाठीं दावा आणला. बायको दुसऱ्याबरोबर गेली म्हणून अगोदरच अब्रूसाठीं त्याला वाईट वाटलं होतं. त्यांत आणखी नोकरी गेलेली आणि पोटगी देण्याबद्दल कोर्टाचा हुकूम! रागाच्या भरांत गेला आणि एक मोठा दगड तिच्या डोक्यांत घातला. पण किती प्रेमळ आहे तो! माझा आठ दिवसापूर्वीं पाय मुरगळला तेव्हां रोज सारखा चोळीत होता तो. असे इथं किती तरी सुस्वभावी कैदी आहेत."

"आणि दमा, तूं सर्वांचा बडा भाई ना?" शकुन्तलाबाईंनीं त्याच्या अंगावरून हात फिरवीत त्याला प्रश्न केला.

"खरंच मी जर आणखी दोन वर्षे इथं राहीन तर बाहेरच्या जगाविषयीं मला बिलकुल उत्कंठा वाटायची नाहीं. खरी समता या कारागृहांतच वावरते. खुनी, चोर दरोडेखोर, बनावट सही करणारे, लांचखाऊ, राजद्रोही सारे सारे आम्ही एका वर्गांतले! एकाच दर्जाचें जेवण जेवतों, एकत्र झोपतों, खडी फ़ोडतों, चक्की फिरवितों, करंड्या विणतों, कपडा बनवतों. स्वार्थ नाहीं, चोरी नाहीं, धर्म, जात कांहीं नाहीं. खरंच हीच समता साऱ्या देशांत प्रस्थापित होईल तर ह्या तुरुंगाच्या भिंती आपोआप पडून जमिनदोस्त होतील!"

दमननें मुठी गच्च आवळल्या. उत्साहानें त्याचे डोळे चमकत होते.

"दमा," शकुन्तलाबाई स्निग्धपणें म्हणाल्या, "तुझ्या स्वार्थी आईला साम्यवाद कळत नाहीं असं नाहीं. पण तो वळत मात्र नाहीं. तुझ्या पुण्याईनं तुझी आईदेखील तुझ्या उदात्त कार्याला हातभार लावील."

दमननें चटकन् आईला घट्ट मिठी मारली. पायांतील लोहशृंखला एकदम तोडून टाकण्याचें सामर्थ्य आपल्या अंगीं आहे अशा आत्मविश्वासानें त्यानें दीर्घ श्वास घेतला.

"आई, आई," तो एकदम अत्यानंदानें ओरडला, "माझ्या कार्याला याहून जास्त उत्तेजन कुठं हवं होतं? ताई, बोल तूं देखील मला मदत करशील ना? आमच्या ह्या पवित्र त्रिवेणी संगमांत साऱ्या जगाला धुवून पुढं मागें आपणाला निर्मल करतां येणार नाहीं का?"

त्याच्या मनाला वाटणारा सात्विक आनंद अवर्णनीय होता. भावनांचा मधुर आस्वाद घेतांना त्याला सारें जग आपल्या मनाला दुजोरा देत आहे असें वाटलें. कार्यसिद्धिचा आनंद तो क्षणभर अनुभवित होता.

इतक्यांत जेलर तेथें आला व मनगटावरील घड्याळाकडे पाहून भेटीची वेळ होऊन गेली असें सांगितलें. अनामिकेला आपलें कर्तव्य बजावणाऱ्या त्या अधिकाऱ्याचा राग आला व ती त्याच्याकडे चिडून पहात आहे हें लक्षांत येतांच दमन परस्परांचा परिचय करून देण्यासाठीं म्हणाला, "ताई, हे आमचे जेलरसाहेब—ही माझी बहीण आणि ही आई."

जेलरनें नमस्कार करून हास्य केलें व तो पुन्हा बाहेर गेला, तेव्हां दमन पुढें म्हणाला, "अधिकार आणि नम्रपणा यांची क्वचित्‌च दिसणारी सांगड तुम्ही यांच्याकडे पहाल. बरं आई, तुम्ही माझी बिलकुल काळजी करू नका."

शकुन्तलाबाईनीं त्याला हृदयाशीं गच्च धरला व त्याचें तोंड कुरवाळीत आवंढा गिळून त्या म्हणाल्या "दमा, प्रकृतीची काळजी घे बरं."

"बरं. ताई, तुझा अभ्यास चांगला चालला आहे ना? शशीला माझा निरोप सांग कीं तूं आपला विवाह जर पुढं ढकललास तर दमनला

अतिशय वाईट वाटेल. शुभस्य शीघ्रम म्हणावं. नॅन्सीला पण मी विचारलं आहे म्हणून सांग. रुबीकडून मला पुस्तकं येत असतात. मी तिचा अत्यंत आभारी आहे म्हणून कळवं."

"बरं येतें हं, दादा." अनामिकेच्या दाटलेल्या कंठांतून शब्द बाहेर पडला.

शकुन्तलाबाईंनीं त्याला प्रेमानें गोंजारून त्याचे पटापट मुके घेतले व रडें आवरण्याचा प्रयत्न करीत त्या कशाबशा खोलीबाहेर पडल्या. बाहेरच्या भव्य दाराभोंवतीं गुंडाळलेल्या शृंखला सोडून हवालदारानें दरवाजा खुला केला. बंदिशाळेंतून बाहेर पडतांना शिक्षा भोगण्याकरतां आंत जाणाऱ्या कैद्याएवढेंच त्यांना वाईट वाटत होतें.

बाहेर येतांच त्यांनीं नाक व डोळे पुसले. संध्याकालीन सूर्याचे सोनेरी किरण त्या दरवाजांतून आंत जात होते. बाहेर संगिनीयुक्त बंदुक खांद्यावर घेऊन पहारेकरी बुटाचे टप्टप् असा आवाज करीत येरझाऱ्या घालीत होता. बंदिशाळेच्या उंच भिंतीवर पडलेली त्याची विस्तृत छायाही त्याच्याबरोबर पुढेंमागें होऊन पहारा करीत होती.

जवळच रस्त्यावर उभ्या असलेल्या मोटारींत त्या दोघी चढल्या. खिन्नपणें समोर पहात शकुंतलाबाई विचार करीत होत्या.

ध्येय आणि सुख यांच्यामध्यें एवढी फारकत असावी ना ? पुत्राला दिलेलें वचन आणि सुखी संसाराची लालसा यांचा मेळ आपणाला कसा घालतां येईल, हा प्रश्न त्याच्यापुढें पडला होता. तरुणपणीं दमनप्रमाणें आपणही म्हणत असूं, कीं 'माझ्या ध्येयमंदिराकडे उदार दृष्टीच्या दिवटीनें आणि महत्त्वाकांक्षेनं जातांना सुख जरी कितीही आड आलं तरी आपण आपली दिशा बिलकुल बदलणार नाहीं.' त्यावेळीं मावशी-नानाचा एक विरोधी शब्दसुद्धां आपल्याला राग येण्यास भरपूर होत असे. आणि आज आपणच दमनचा वाटेल तसा कोंडमारा करतों आहो. असा विचार करतांना त्याच्या मनाला अतिशय यातना होत होत्या.

आईच्या दुःखपूर्ण मुद्रेकडे पाहून अनामिका आर्त स्वरांत म्हणाली, "आई, आम्ही थोडा वेळ बंडगार्डनमध्यें फिरुं या. मग तुला जरा बरं वाटेल."

शकुन्तलाबाईंना तिच्या इच्छेखातर संमति दर्शविली.

थोड्या वेळांत मोटार बंड—गार्डनच्या फाटकापाशीं उभी राहिली.

यावेळीं संध्याकाळ झाली होती. पश्चिम आकाशांत आरक्त छटा पसरली होती. समोर दिसणाऱ्या टेकडीवर हिरवळ दिसत होती. बागेंतील फुलझाडें आणि पुष्पलता बहरून गेल्यामुळें सर्वत्र सुगंध पसरला होता. सुंदर फुलांच्या ताटव्यावर पडलेल्या संधिप्रकाशामुळें त्यांच्या मनोहर रंगसौंदर्याला विलक्षण मोहकता आली होती.

बागेंत कॉलेजकुमारांच्या जोड्या मधून मधून वादविवाद करीत इकडे तिकडे फिरत होत्या. लहान लहान गोजिरवाणीं मुलें एकमेकांचे हात धरून वर्तुलाकार नाचत होतीं. तरुण जोडपीं लतामंडपाखालीं बांकावर बसून प्रणयगीत गुणगुणत होतीं.

अनामिका व शकुन्तलाबाई बागेंतील कठड्याजवळ उभ्या राहून समोरच्या नदीकडे पहात होत्या. पाण्याचा प्रचंड झोत धरणावरून एक-सारखा खालीं पडत होता. त्याचा अखंड गंभीर आवाज त्या वातावरणांत अधिकच गांभीर्य उत्पन्न करीत होता.

शकुन्तलाबाई आज कित्येक वर्षांनीं पुन्हा त्या गार्डनमध्यें फिरत होत्या. सहाजिकच गतकालाची गोड स्मृति होऊन त्या अगदीं अस्वस्थ झाल्या. त्यावेळीं शशिकला आणि आपण दोघींही अविवाहीत कॉलेजकन्या होतों. आयुष्याबद्दल, संसाराबद्दल किती मधुर कल्पनांचे मनोरे बांधित आपण दोघींही या बागेंत बसत असूं! त्यावेळीं दिसणारीं फुलें आजही तशींच फुलताहेत. त्या काळच्या लहान लहान रोपट्यांचे आज जोमदार वृक्ष झाले आहेत. आपल्याही हृदयांत अशाच सुंदर भावनांचा आणि आकां-क्षांचा बगीचा फुलत होता. पण आज त्याचें काय झालें! प्रेमजलावर जोपासलेला तो निरागस बगीचा तिरस्काराच्या विषारी झंजावातानें करपून गेला. पण त्या भावनावृक्षाचीं खोल गेलेलीं पाळेमुळें मात्र आज शल्यासारखीं हृदयाला बोंचत राहिलीं आहेत. विचार करतां करतां त्यांच्या डोळ्यांत पाणी आलें. त्या गहिंवरून म्हणाल्या, "अना, दैव म्हणून काय असतं हें पहा-यचं असेल तर कुणीही माझ्या आयुष्याकडं पहावं. सुमारें वीस वर्षांनीं मी

या बागेंत पुन्हा पाय ठेवतें आहें. सभोंवार मला विशेष असा कांहींच फरक दिसत नाहीं. पण माझ्या मनोवृत्तींत केवढा बदल झाला आहे म्हणून सांगूं! नाना-मावशीच्या सान्निध्यांत एक काळ असा होता, कीं मी अगदीं सुखाच्या शिखरावर उभी आहें असं मला वाटत असे. त्यावेळीं शशिकला नेहमीं म्हणायची—'शकू, तुझं सुख पाहून मला अगदीं हेवा वाटतो.' आणि आज तेंच मी तिला म्हणावं असं झालं आहे. किती सुखानं तिचा संसार चालला आहे! एक मुलगा विलायतेला गेला आहे. मुलगी सुशिला चांगल्या स्थळीं पडली. धाकटे दोन मुलगे पण चांगले शिकताहेत. त्यांनीं पैसा केला. मानमरातब मिळविला आणि सुखाचा संसार केला."

"आई," अनामिका मध्येंच अतिस्वरांत म्हणाली, "दादाच्या ह्या साम्यवादाला कांहीं आळा घालण्याचा प्रयत्न करणं अगदीं अवश्यक झालं आहे."

"अग, मलासुद्धां तसं वाटतं खरं, पण त्याच्या उदार ध्येयापासून त्याला परावृत्त तरी कसा करायचा? त्याला वाटणारी कळकळ, उत्साह आणि आकांक्षा किती म्हटलं तरी नाहींशी करणं अशक्य आहे. ध्येय-निष्ठेमुळंच त्याला समाधान वाटतं. अना, आणि असं बघ, त्यानं अंगि-कारलेल्या मार्गांत केवळ आपल्या स्वार्थाकरतांच ना अडथळा आणायचा? 'हिनं आपल्या मुलाला तुरुंगांत जाण्यास प्रोत्साहन दिलं.' असं जगानं म्हटलं तर मी तो आरोप एकवेळ सहन करीन. पण माझ्या दमाला असं वाटतां उपयोगी नाहीं, कीं आपली आई आपल्या कार्यशक्तीचा नाश करून आपल्या सात्विक आनंदाला आणि उज्वल कीर्तीला मागं खेचते आहे."

अनामिका कांहींच बोलली नाहीं. आपण व्यक्त केलेल्या विचारा-बद्दल तिला थोडेंसें वैषम्य वाटलें. शून्य दृष्टीनें ती समोर पडणाऱ्या पाण्याच्या लोंढ्याकडे पहात होती. जलाच्या पृष्ठभागावर फेंसाच्या सुंदर आकृति रांगोळीप्रमाणें शोभून दिसत होत्या.

सभोंवार अंधार पडला. बगीच्यांतील दिवेही पेटले.

शकुन्तलाबाईंनी दीर्घ निश्वास टाकला व त्या करुण स्वरांत पुन्हां म्हणाल्या, "अना, साम्यवादावरील पुस्तकं वाचून आणि विचार करून माझासुद्धां अधिक अधिक कल तिकडे झुकूं लागला आहे. न्यायदेवतेच्या नांवाखालीं जगांत पावलोपावलीं होणारा अन्याय, गरिबांच्या झोंपड्या जमीनदोस्त होऊन त्या ठिकाणीं उभारल्या जाणाऱ्या श्रीमंतांच्या हवेल्या आणि भुकेनं प्राण व्याकुळ झालेले गरीब लोक पाहून असं वाटतं, कीं एक-वेळ व्यक्तिस्वातंत्र्य हिरावून नेणारा साम्यवाद पत्करला, पण ही गुलाम-गिरी नको. अग, आपलंच पहा. दमाचा हा खटला लढतांना आपल्या-जवळचा सारा पैसा गेला. आणि इतकं असून तरी आपण कोणता न्याय मिळविला तर निरपराधी दमाची फांशीच्या शिक्षेतून सुटका केली. अना, माझं वय असूनही मला आतां शाळेंत काम करायला उत्साह वाटत नाहीं. आणि अलीकडे प्रकृतिदेखील बरोबर नाहीं. अना, लग्नाबद्दल तुझा विचार काय आहे ?"

"आई," अनामिका गहिंवरून म्हणाली, "मला आतां लग्नच करूं नये असं वाटतं. शिवाय तूं एकटी नाहींस का ?"

"अग, मी एकटी असलें म्हणून का तूं आपल्या आयुष्याचा असा नाश करून घेणार आहेस ? तुला मामा नाहीं, आजोबा नाहीं, कुणी नाहीं. तुमच्यापैकीं कोणी आप्त तुला जवळ करील ही आशाच नको. तुझा भाऊ कोणत्या पंथाचा हें तूं पहातेसच. अजून तुझं सारं आयुष्य जायचं आहे. माझंच पहा ना ? त्यावेळीं नाना–मावशीचं आणि पैशाचं पाठबळ नसतं तर आज हे दिवस मी पाहिले नसते."

शकुन्तलाबाईंचा कंठ दाटून आला. त्यांच्या तोंडांतून शब्दही बाहेर फुटेना. अनामिकेनेंही हातरुमालानें डोळे पुसले व मागें पाहिलें. बागेंतील बहुतेक गर्दी कमी होऊन दोनचारच लोक बाकांवर बसले होते.

"आई, जाऊं या ना ? शशीमावशी वाट पहात असेल आपली."

दोघींही मागें फिरून चालूं लागल्या. बगीचाच्या फाटकापाशीं सायकलचें कुलूप काढून दिवा पेटवीत असलेल्या विद्यार्थ्यांचा कंपू वाद-विवाद करीत होता.

" I hate all capitalists." त्यांतील एकजण सायकलवर बसत म्हणाला.

" No, I love all socialists." दुसऱ्या विद्यार्थ्यानें प्रत्युत्तर केलें, " भांडवलशाहीच्या काळ्याकुट्ट ढगाला रुपेरी कडा आहेतच."

" अरे, कशाला हा वितंडवाद ! एका साम्यवादाच्या भगिनीच्या सौंदर्यामुळंच तुमचा हा भांडवलशाहीविरुद्ध मजूरशाही हा वाद सुरू झाला. शेम, शेम."

इतक्यांत सर्वांचें लक्ष त्या दोघींकडे गेलें. चटकन् आपल्या गाड्यांवर आरूढ होऊन त्यांनीं पळ काढला. शकुन्तलाबाई किंचित् हास्य करून खिन्नपणें म्हणाल्या, " एकच विषय, पण प्रत्येकाचा दृष्टिकोन किती वेगळा !"

" अनामिकेलाही हंसूं आलें. पण ती विषय बदलण्याकरतां म्हणाली, " आई, शशीमावशी किती प्रेमळ स्वभावाच्या आहेत ग ! लहानपणापासून तुझी आणि त्यांची अशीच मैत्री आहे का ?"

" हो, अगदीं अशीच. कुणाचाही संसार तिनं सुखी केला असता असाच तिचा स्वभाव."

" मी तिला आमच्याबरोबर मुंबईस येण्याचा आग्रह करते आहे. येईल बहुतेक. आई, तूं पण सांग हं ?"

" बरं." असें म्हणून शकुन्तलाबाईनीं पदर गच्च अंगाशीं धरला. मोटारच्या वेगामुळें अंगाला थंड वारा सारखा झोंबत होता. स्टेशनवरील गाड्या शीळ फुंकीत पुलाखालून जात येत होत्या. अनामिकेच्या मनांत दमनच्या सुटकेबद्दल सारखा विचार चालला होता. मधुर कल्पनेच्या सुखस्वप्नांतून मोटारला ब्रेक लागतांच ती एकदम जागी झाली. मोटार समोर येणाऱ्या एका तरुणीला तिच्याबरोबर असलेल्या तरुण प्रियकरानें एकदम आपल्या जवळ ओढली होती. आपलें संरक्षण करणाऱ्या तरुणाबद्दल तिच्या हृदयांत उत्कट भावना उचंबळून ती लज्जेनें आरक्त झाली होती व अधोमुख होऊन ती मधुर स्मित करीत होती. त्या तरुणाच्या

चेहऱ्यावर वीरश्रीचें हास्य झळकत होतें. त्यांच्या सहजगत्या होणाऱ्या हालचालींत देखील प्रणयी भावनांचें सुंदर आविष्करण होत होतें.

आपल्या आयुष्याला असेंच नूतन चैतन्य मिळेल का ह्या विचारानें अनामिकेच्या मनांत ठाणें दिलें. मोटार डॉ. नाईकांच्या बंगल्यासमोर उभी राहिली तेव्हां ती विचार तंद्रीतून सावध झाली.

" डॉक्टर आले वाटतं." असें म्हणून शकुन्तलाबाईसह ती बंगल्यांत शिरली.

———

# १०

शशिधर नॅन्सीसह बेळगांवास गेल्यास चारपांच दिवस झाले असतील नसतील तोंच रावसाहेब वकिलांचा मुलगा लवकरच एका युरोपियन बाईशीं रजिस्टर्ड पद्धतीनें विवाह करतो आहे अशी बातमी सबंध शहरांत पसरली होती. या बातमीची गुणगुण रावसाहेब मजकुरांच्या कानीं आली नव्हती असें नाहीं. पण कोर्टांत विरुद्ध पक्षाची सरशी होत असतांही आपल्या मनाची शांती ढळूं न देण्याची संवय या बाबतींतही त्यांच्या उपयोगीं पडली. स्वतः मुलगा कधीं तरी तो विषय आपल्याशीं काढील आणि योग्य प्रकारें आपण त्याचे कान उपटून हातांत देऊं या विश्वासानें त्यांनीं विशेष विचारपूस केली नव्हती.

रावसाहेब हे जरी नवमतवादाचे पुरस्कर्ते नव्हते तरी तरुणांच्या नीतिमत्तेविषयीं त्यांचीं मतें सनातनी थाटाची बिलकुल नव्हतीं. पाश्चिमात्य पद्धतीचें आणि विशेषतः वैद्यकीय शास्त्राचें शिक्षण घेत असतां तरुणांची नीतिमत्ता सभोंवारच्या वातावरणांत अपेक्षेप्रमाणें सोंवळी राहणें असंभवनीय आहे व त्याबद्दल एवढें आश्चर्य अगर खेद करण्याजोगें विशेष कांहीं नाहीं, असेंच कधीं कधीं ते समवयस्क माणसाला सांगत असत. आणि यामुळेंच त्यांनीं नॅन्सीबरोबर चाललेल्या शशीधरच्या प्रणयलीलांकडे कानाडोळा केला होता. विद्याभ्यास संपवून बेळगांवांत दवाखाना थाटून दिल्यावर शशिधर आपला पूर्व-प्रणय विसरून आपण पसंत केलेल्या श्रीमंत सुंदर मुलीशीं लग्न करावयाला खास कबूल होईल अशी खात्री त्यांना वाटत होती. शशिधरला तिच्याबद्दल वाटणारी लालसा आणि आपलेपणा यांचीं पाळेंमुळें त्याच्या हृदयांत किती खोलवर गेलीं आहेत हें चाळीशी कधींच उलटून गेलेल्या रावसाहेबांना कळणें सर्वस्वीं अशक्य होतें.

ही गोष्ट त्यांच्यापुढें काढावी असें त्यांच्या पत्नीला अनेक वेळां वाटे. पण त्यामुळें होणारा स्फोट शक्य तों पुढें ढकलावा ह्या इच्छेनें त्या कधींच बोलल्या नव्हत्या. पण एके दिवशीं अनपेक्षितपणें प्रकरण 'बोर्डा' पुढें आलेंच.

शशिधर नॅन्सीसह क्लब मधून नुकताच आला होता. आपल्या खोलींत टेनिसची रॅकेट तो प्रेसमध्यें घालीत असतां पलीकडल्या दालनांतून रावसाहेबांनीं हांक मारली, "शशी, कपडे उतरल्यावर इकडे ये हं."

शशिधरनें रॅकेट तशीच ठेवून घाईघाईनें कोट काढला व तो पलीकडच्या दालनांत गेला.

"बस असा," असें म्हणून रावसाहेबांनीं जवळच्या खुर्चीकडे बोट दाखविलें व हातांतील वर्तमानपत्र त्याच्याकडे देत ते म्हणाले, "हा मजकूर तूं पाहिलास का?"

शशिधरनें तो मजकूर वाचला, पण तो कांहींच बोलला नाहीं.

"शशी, पण अगोदर मला सांग, ती तुझ्याबरोबर आली आहे ती कोण रे?"

"नॅन्सी विल्सन. बाबा, तुम्हाला या सर्व गोष्टी माहीत आहेत."

रावसाहेबांनीं कांहींच उत्तर केलें नाहीं. जणुं काय साक्षीदाराची उलट तपासणी चालविल्याप्रमाणें त्यांनीं दुसरा प्रश्न केला, "काय करते ती?"

"नर्स आहे."

"कुठं?"

"मुंबईला. नॅशनल जनरल हॉस्पिटलांत."

"नर्सशीं एवढी दोस्ती करायला, मुंबईतल्या पांढरपेशांच्या साऱ्या पोरी मेल्या का रे?"

रावसाहेब एकदम रागानें ओरडले, "कोण आहे रे तिकडे?"

दारांत गडी उभा राहिला.

"रावबा, खालीं जा आणि तुझ्या बाईसाहेबांना म्हणावं कीं वर बोलावताहेत. आणि हें बघ ती मडमबाई जर विचारपूस करूं लागली तर आम्ही कामांत आहों म्हणावं. जा लवकर."

रावसाहेबांनीं पुन्हा शशिधरला उद्देशून बोलण्यास सुरवात केली.

"तुझे हे चाळे गेलीं दोन तीन वर्षं मी पहातो आहे. चालले आहेत. म्हटलं येशील शुद्धीवर. पण दिवसेंदिवस तूं तर आरेखाबाहेर जात आहेस. तुझा दोस्त कोण, तर तो तुरुंगांत खडी फोडीत असलेला मवाली सोशालिस्ट दमन. त्या खुनाच्या लफड्यांत सांपडला असतास, मग? आतां ही एक नर्स बयाबाई. तरी बरं. मी तुला कॉलेजच्या शिक्षणाकरतां एकदम विलायेतलाच पाठविणार होतों तो पाठविला नाहीं. नाहीं तर हातालाच सांपडला नसतास! यंदा तूं नापास झालास तरीही मी बोललों नाहीं. तुझ्या खर्चाचा हिशोबही कधीं मी मागितला नाहीं. तूं कुठच्या तरी युरोपिअन् पोरीच्या नादीं आहेस असं मला कधींच समजलं होतें. वाटलं, असेल कुठली तरी क्लासमधील विद्यार्थिनी नाहीं तर प्रोफेसर, ऑफिसरची मुलगी. ही असली पांच रुपड्याची पब्लिक हॉस्पिटलमधील नर्स असेल असं नव्हतं मला वाटलं."

रावसाहेबांचा पारा सारखा चढत होता. प्रत्येक वाक्याला सारखें खरमरीत उत्तर त्यांना द्यावें असें शशिधरला वाटत होतें. पण वडिलांशीं उत्तरास प्रत्युत्तर करण्याचा तो पहिलाच प्रसंग असल्यामुळें तो क्षणभर स्तब्ध राहिला. इतक्यांत मनोरमाबाईही तेथें आल्या. रावसाहेबांकडे त्यांची दृष्टी वळतांच ते एकदम उद्गारले, "पहा आपल्या चिरंजीवाचे पराक्रम. आजच्या या अंकांत काय लिहिलं आहे पाहिलंस का? मला आतां कोर्टात चेंबर्समध्यें सर्व लोक सारखे प्रश्न करतील. काय शशी, गप्प कां तूं? मला ह्या लग्नाच्या बातमींत कांहीं तथ्य वाटत नाहीं हें खरं. पण लोकांना निष्कारण चर्चा करण्यासारखं आपण, अगोदर करावं कशाला? बेळगांवांत तूं निदान पन्नास शंभर घरांत अगदीं चुलीपर्यंत जात असशील. पण तेथें तुला दोस्ती करायला एकही पोर सांपडली नाहीं? आणि ही नर्स आख्या मुंबईत प्रसिद्ध असलेली—"

"बाबा," शशिधर एकदम चिडून म्हणाला, "नॅन्सीबद्दल प्रोफेसर्सचं चांगलं मत आहे हें तुम्ही वाटेल त्याला विचारा."

"वा अगदीं चांगलाच हवाला देतो आहेस." रावसाहेब तुच्छतादर्शक शब्दांत म्हणाले, "अरे, मी कांहीं झोपलों नव्हतों. सर्व कांहीं माझ्या कानावर आलं होतं; पण मी तिकडे लक्ष्य दिलं नाहीं. आतां तर त्याचा कळस झाला. मुंबईत शेण खात होतास त्याबद्दल इतकं वाटलं नाहीं. पण आतां ती घाण बेळगांवांत तुझ्या आईबापासमोर आणायला तुम्हाला शरम नाहीं वाटत?"

रावसाहेबांचे हे शब्द ऐकून शशिधरला मनस्वी राग आला व तो एकदम उत्तरला, "बाबा, तुमचं हें बोलणं सद्‌गृहस्थाच्या तोंडीं शोभत नाहीं. फौजदारी कोर्टांत—"

"वा, वा, बराच हुशार झालास! मला कोर्टांत खेचणार तूं! तुझी समजूत काय आहे ती तरी एकदां कळूं दे मला. मी म्हणजे तुला यःकिंचित् म्हातारा वाटतो का रे?" रावसाहेब रागानें गुरगुरले व बाजूला दाराला धरून असलेल्या पत्नीकडे पाहून म्हणाले, "पहा, आपले कुलदीपक किती शहाणे झाले आहेत ते! कारट्या, त्या भिकारड्या पोरीच्या नादीं लागून माझा अपमान करतोस?"

"बाबा," शशिधर निश्चयानें ठासून उत्तरला, "तुम्हांला हें निक्षून सांगतों कीं तुम्ही नॅन्सीला कितीही शिव्या दिल्या तरी ती आपली सून होणार आहे हें निश्चित."

"कारट्या!" दांत ओंठ चावून रावसाहेब एकदम ओरडले. हातांजवळ कांहीं असतें तर खात्रीनें त्यांनीं त्याच्या डोक्यांत घातलें असतें. शशिधर बिलकुल न घाबरतां धीटपणें उभा होता. मनोरमाबाई मात्र अगदीं घाबरून गेल्या व त्यांच्या डोळ्यांतून अश्रू वाहूं लागले.

अल्पावधींतच रावसाहेब भानावर आले. आपली ही वर्तणूक आपल्या धंद्याला शोभेशी नाहीं याची त्यांना जाणीव झाली व यामुळें कदाचित् आपल्या प्रयत्नांत यश न येतां उलट मुलगा हट्टाला पेटेल व

मग तो वळणावर बिलकुल येणार नाहीं असें वाटून रावसाहेब पुन्हां म्हणाले, “शशी, बापाला अशीं उत्तरं देतांना तुला शरम नाहीं वाटत?”

“पण तुम्हीच अशा उत्तराकरता अट्टहास धरल्यावर मी काय करूं?”

“हें बघ तुला सांगतों. यंदा तुझं लग्न करायचा आमचा विचार आहे आणि त्यासाठीं मी एक सुशिक्षित सुंदर आणि श्रीमंत मुलगी पाहून ठेवली आहे.”

“माफ करा मला. पण मी नॅन्सीशीं अगोदरच वचनबद्ध झालों आहें.”

“त्यांत काय मोठंसं? We can give her damages.” रावसाहेब म्हणाले.

“पण मला तिच्याशींच लग्न करायचं आहे. माफ करा बाबा. पण कुणाशीं लग्न केल्यानं मी सुखी होईन हें तुमच्यापेक्षां माझ्या मनानं ठरविलं तर जास्त सयुक्तिक नाहीं का?”

“तुला वेड तर लागलं नाहीं ना? गाढवा, त्या गोऱ्या कातडीला भुलून कांहींतरी अविचार करूं नकोस. आपल्या घरंदाज कुळाला अशी काळोखी फासूं नकोस.”

“बाबा, तुम्ही पैशाला, मोठेपणाच्या भपक्याला भुललेले आहांत. नॅन्सीच्या उदार स्वभावाची तुमच्या पक्षपाती दृष्टीला परीक्षा कशी व्हावी?” शशिधर तळमळीनें चिडून उत्तरला.

एकदम त्याचा कंठ दाटून आला. आपल्या प्रेमविवाहाच्या मार्गात येणाऱ्या अनेक अडचणींची कल्पना असल्यामुळें मन खंबीर करण्याचा त्यानें कितीही प्रयत्न केला तरी या वेळीं आईची शोकाकुल स्थिती पाहून त्याला अतिशय वाईट वाटलें. वडिलांना अशा प्रकारचीं उलट उत्तरें करतांना त्याला असह्य मानसिक यातना होत होत्या. रावसाहेबांनीं मात्र मनांतील सर्व विचार दाबून आपल्या चेहऱ्यावरील करारीपणा तसाच अढळ ठेवला होता. ते निश्चयी स्वरांत म्हणाले, “मूर्खा, आपल्या घराण्याचा नांवलौकिक वाढवायचा सोडून तूं या परधर्मीय

भिकारड्या पोरीला घरांत आणून सर्वांना तोंडं काळीं करायला लावणार ? शरम नाहीं तुला ?"

"बाबा, असलीं बोलणीं आपल्याला शोभत नाहींत." शशिधर तिरस्कारानें म्हणाला.

"भिकारडी नाहीं तर काय ?" रावसाहेब अधिकच तुच्छतेनें म्हणाले, "असेल एखाद्या सोल्जरची पोर ! तिच्या आईबापाचा पत्ता आहे का ?",

"पत्ता नाहीं, म्हणूनच मी म्हणतों ती एखाद्या गव्हर्नरची अगर बड्या अधिकाऱ्याची मुलगी असावी. श्रीमंत आणि अधिकारसंपन्न अशा समाज–शिष्टांना आपल्या असंमत संततीचं पितृत्व लपवावंसं वाटतं आणि तें त्यांना शक्यही होतं. पण भिकाऱ्याला आपल्या पितृत्वाबद्दल लाज वाटत नसते आणि त्यांना तें छपविणंही शक्य नसतं." शशिधर पुन्हां त्वेषानें म्हणाला, "शिवाय आईबापाचा पत्ता नाहीं मग ती सोल्जरची कन्या म्हणण्यापेक्षां गव्हर्नरची कन्या आहे असं कां म्हणूं नये ? नॅन्सीचे शिष्टाचार किती सभ्य वळणाचे आहेत ! स्वभाव किती उदार आहे आणि ती किती सुसंस्कृत आहे ! यावरून ती कुणातरी वरिष्ठ अधिकाऱ्याची कन्या आहे खास."

आपल्यासमोर इतर वेळीं खालीं मान घालून बोलणारा शशिधर आज दृष्टीला दृष्टी भिडवून उद्धटपणें प्रत्युत्तर करतो आहे असें पाहून त्यांना अतिशय आश्चर्य वाटलें. शशिधरच्या सडेतोड उत्तरानें आपल्याला गप्प बसण्याची पाळी आली हें सहन न होऊन ते चिडून ओरडले, "चूप, तुझ्याशीं वादविवाद करायची माझी बिलकुल इच्छा नाहीं. तूं मला बरोबर ओळखत नाहींस. तूं जर त्या भिकारड्या पोरीशीं संबंध ठेवणार असलास तर माझा मुलगा मेला असं मी समजेन."

मनोरमाबाईंनीं एकदम हुंदका दिला. क्षणभर सर्वत्र स्तब्धता होती. टेबलावरील दिवा बारीक होत असावा असेंच शशिधरला वाटलें. मनोरमाबाईंच्या हुंदक्याचा आवाज बऱ्याच मोठ्यानें होत होता. रावसाहेबांनीं खुर्चीचे दोन्ही हात गच्च पकडले होते. त्यांच्या नजरेंत भीतिप्रद क्रूरपणा दिसत होता.

त्यांनीं पुन्हा गर्जना करण्यास सुरवात केली.

"तूं इतका बेईमान, बदमाष असशील ही माझी कल्पना नव्हती. जा त्या पोरीबरोबर वाटेल तो धिंगाणा घाल; पण यापुढं या घराची पायरी चढशील तर खबरदार. यापुढं तोंड दाखवशील तर— "

"बाबा, तुम्ही हें निक्षून सांगतां आहां ना ?" बोलतांना शशिधरच्या डोळ्यांत पाणी आलें.

"बाळ शशी," असें म्हणून मनोरमाबाईंनीं मुलाला जवळ ओढलें, व आवंढा गिळून म्हणाल्या, "तुम्ही उगाच चिडूं नका. मी त्याची समजूत घालतें."

"तूंच त्याला बिघडवला आहेस," रावसाहेब खेंकसून म्हणाले, "ह्या पोराला त्या सटवीपुढें सगळीं तुच्छ आहेत. त्याला आई नको, बाप नको. फक्त ती एक बाजारबसवी—"

"हं बाबा ! बस्स झालं !!" शशिधर एकदम चवताळून उद्गारला. रागानें बोलतांना त्याचे ओंठ सारखे थरथरत होते. "बापाला मुलगा मेल्यावर त्या मुलाचा तरी पित्याशीं काय संबंध ? नॅन्सीबद्दल असं अमंगळ बोलतांना तुमच्या मनाला कांहींच वाटत नाहीं ? नॅन्सीच्या शीलाबद्दल बोलण्याचा आपणाला काय अधिकार आहे ? हें मला समजत नाहीं."

शशिधरचे हे उद्गार रावसाहेबांना असह्य होऊन ते ताडकन खुर्चीवरून उठून उभे राहिले.

"कारट्या," ते एकदम किंचाळले, "पोरा, हो माझ्या घरांतून बाहेर. एक क्षणभर माझ्या दृष्टीसमोर उभा राहशील तर खबरदार. चल नीघ. जा त्या सटवीला घेऊन चालता हो कुठं तो."

मनोरमाबाई चटकन् मध्यें पडल्या नाहीं तर रावसाहेबांनीं मुलावर खात्रीनें हात टाकला असता. मनोरमाबाईंनीं मोठ्या शिकस्तीनें आपलें रडें आंवरलें व शशिधरला घेऊन त्या खालीं गेल्या.

रावसाहेबांच्या संतापाची परमावधी झाली होती. त्यांना भोंवळ आल्यासारखें वाटलें. त्यांनीं आरामखुर्चीवर अंग टाकलें. त्यांनीं दोन्ही

हातांनीं आपलें मस्तक गच्च दाबून धरलें. त्यांच्या साऱ्या अंगाची लाही लाही होत होती.

कांहीं वेळानें ते जरासे शांत झाले. त्यांनीं मान वर करून पाहिलें. त्यांच्या डोळ्यांत पाणी आलें. रावबा पलंगावरील बिछाना सारखा करतांना तिरप्या नजरेनें त्यांच्याकडे पहात होता.

रावसाहेबांना अजूनही आशा वाटत होती. एवढ्या इस्टेटीचा वारसा रद्द करण्याची धमकी देतांच शशिधर शुद्धीवर येईल, मग निदान ती गोरी पोर तरी त्याच्याशीं लग्न करायला कबूल होणार नाहीं. शशिधरला पाठवित असलेली मासिक रक्कम बंद करतांच त्याला कॉलेजांतील अभ्यासक्रम चालवणें, त्या पोरीचे लाड पुरविणें, सर्व गोष्टी साहजिकच बंद होतील आणि मग त्याच्या त्या प्रेमाच्या मोठमोठ्या गप्पा आपोआप नाहींशा होतील असा त्यांना भरंवसा वाटत होता.

पण दुसऱ्या क्षणीं त्यांच्या मनांत अशी कल्पना येत होती. शशिधर हट्टी आणि आपल्याप्रमाणेंच मानी आहे. तो कांहीं देखील ऐकायचा नाहीं. त्याचे मित्र आहेत. एक वर्ष कसें तरी करून तो आपला मेडिकल कोर्स पुरा करील. त्या पोरीनेंसुद्धां कांहीं तरी माया जवळ केली असली तर असल्या धाकदपटशानें तीं वळतील हें संभवनीय नाहीं. कदाचित् शशिधर म्हणतो त्याप्रमाणें ती पोर सालस, सुस्वभावी असूं शकेल.

पण रावसाहेबांचा आत्मविश्वास असल्या विचारांना जास्त वेळ थारा देईना. एक वेळ त्यांच्या मनांत असाही विचार आला, कीं इतकेंही करून शशिधरनें तिच्याशीं विवाह केला तर मग त्याला वाळींत टाकायचा काय ! पण ही कल्पना त्यांना असह्य झाली.

आपल्या ज्ञातीच्या सम्मेलनाच्या वेळीं प्रामुख्यानें पुढाकार घेणाऱ्या व अभिमानानें अध्यक्षपदारूढ होणाऱ्या रावसाहेबांची सून ही एक ॲंग्लो इंडियन नर्स असावी हें त्यांच्या मोठेपणाला किती लांच्छनास्पद आहे या विचारानें त्यांचें हृदय दुभंग झालें. आपली पत्नी मुलाची समजूत घालील अशी त्यांनीं आपल्या मनाची समजूत करून घेतली.

विचार करतां करतां घड्याळांत साडेआठाचा ठोका पडला. इतक्यांत मनोरमाबाई डोळे पुसून दारांत उभ्या राहिल्या. रावसाहेबांच्या दृष्टीला दृष्टी भिडतांच पुन्हा त्यांच्या डोळयांत पाणी आलें. बोलण्याचा प्रयत्न करतांना त्यांच्या ओंठांची किंचित् हालचाल झाली. पण शद्ब मात्र बाहेर फुटेना.

" जेवण झालं ? " रावसाहेबांनीं निर्विकार चेहरा करीत प्रश्न केला.

" नाहीं. शशी आत्तांच निघून जातोय्. " मनोरमाबाई कसेंबसें आवंढा गिळून म्हणाल्या.

" ठीक झालं. जेवढं लवकर तोंड काळं करील तेवढं बरं. " रावसाहेब त्रस्त स्वरांत उत्तरले.

" त्याला राहायला नाहीं का सांगत ? माझं तो अगदीं ऐकत नाहीं. "

" तुला अगोदर त्याला आग्रह करायला सांगितला होता कुणी ? " रावसाहेब एकदम चिडून उद्गारले.

मनोरमाबाईनीं झाला प्रकार सहन केला होता. पण आतां मात्र त्यांच्यानें बिलकुल राहवेना.

" आपल्या मुलाला तुम्ही बाहेर काढणार तर ? " त्यांच्या हृदयाला पडणारा पीळ या शब्दांत स्पष्ट व्यक्त होत होता.

पण रावसाहेबांनीं कांहींच उत्तर केलें नाहीं.

मनोरमाबाई पुन्हा दाटलेल्या स्वरांत म्हणाल्या, " शशी हट्टानं आपणांला न जुमानतां जें करणार त्याला संमति देऊन आपला मान राखणं अधिक समंजसपणाचं नाहीं का ? "

" काय ? तो कसा तिच्याशीं लग्न करतो तें मी पहातों. " रावसाहेब खुर्चीवर उठून बसत ओरडले.

" शशी माझा पण मुलगा आहे. मीही त्याला पूर्णपणें ओळखतें. शिवाय नॅन्सीमध्येंदेखील दोष काढण्यासारखं मला कांहीं दिसत नाहीं. ती पोर अगदीं सालस अन् गुणी आहे. "

" तूंच त्या पोराला फूस देते आहेस ! " रावसाहेब अधिकच चिडून उत्तरले.

मनोरमाबाई स्थिर दृष्टीनें त्यांच्याकडे पाहूं लागल्या. त्या अर्थपूर्ण कटाक्षानें रावसाहेब क्षणभर बिचकले व पुन्हा ते गोंधळून निश्चयी स्वरांत म्हणाले, “घराण्याची अब्रू घालवायला तयार झालेल्या कुल-दीपकाला मी प्रोत्साहन देण्यास बिलकुल तयार नाहीं. तुला काय करायचं असेल तें कर. मला कांहीं विचारूं नकोस. माझ्या इष्टेटीला वाटेल तेवढे वारस मिळतील. नाहींतर धर्मार्थ देणगी देऊन कायमचं नांव करून ठेवतां येईल. असल्या भ्रष्ट पोरानं त्या कवडीकिंमतीच्या गोऱ्या पोरीबरोबर वाटेल तसा सांवळागोंधळ घालावा एवढ्यासाठीं मी एवढी इष्टेट खास केलेली नाहीं.”

रावसाहेबांनीं बाजूच्या टेबलावरील चष्मा उचलून डोळ्याला लावला व बाजूला पडलेलें वर्तमानपत्र घेऊन तें वाचण्याचा प्रयत्न ते करूं लागले. मनोरमाबाई अश्रु गाळीत तशाच तटस्थपणें उभ्या होत्या. इतक्यांत रावबानें पुन्हा तेथें येऊन भीतभीत हळूंच म्हटलें, “आई-साहेब, शशि बाबूजी आपल्याला बोलावताहेत.”

मनोरमाबाईनीं पुन्हां एकवार साश्रु नयनांनीं पतीकडे पाहिलें व आंवंढा गिळून त्या मागें परतल्या.

एवढ्यांत शशिधरनें आपलें सामान एकत्र करून बॅगमध्यें भरलें होतें. मनोरमाबाई अत्यंत केविलवाण्या स्थितींत उभ्या असलेल्या पाहून शशिधरनें मान खालीं घालून सुस्कारा टाकला. मनोरमाबाईनीं बोलण्याचा प्रयत्न करतांना, “शशी,” एवढेच शब्द त्यांच्या तोंडांतून बाहेर पडले. शशिधरलाही राहवेना. एकदम आईला मिठी मारून तो रडूं लागला.

“आई, आई, तूं माझ्यावर रागावली नाहींस ना? खरं सांग, नॅन्सी तुला आवडत नाहीं का? आई, मी तिच्याशिवाय जगांत कधींच सुखी होणार नाहीं.”

मनोरमाबाई रडें आंवरण्यासाठीं कांहीं न बोलतां त्याला हृदयाशीं धरून त्याच्या पाठीवरून हात फिरवीत त्याचें सांत्वन करण्याचा प्रयत्न करीत होत्या. शशिधरनें तोंड वर करून आईकडे पाहिलें.

" आई, मी घर सोडून गेलों म्हणून तूं माझ्यावर रागावणार नाहींस ना ? "

" बाळ, शशी, माझ्यासाठीं तरी रहा. माझं ऐकणार ना तूं ? " मनोरमाबाई घोगऱ्या आवाजांत म्हणाल्या.

" आई, मी आतां राहिलों तर उद्यां बाबा मला खेंचून बाहेर काढतील. बाबांनीं ' घरांतून चालता हो ' असं म्हटल्यावर मी आतां कोणत्या तोंडानं इथं राहूं ? माझ्याबद्दल नॅन्सीला किती तिरस्कार वाटेल ? मी आज आतां दरबार हॉटेलांत राहतों. तेथून माझा बेत तुला कळवीन. खरंच, तुझा शब्द मोडतांना मला किती वाईट वाटतं आहे. पण मला कृपा करून आग्रह करूं नकोस. बरं येतों हं मी आई. "

शशिधरनें आईला नमस्कार केला. इतक्यांत नॅन्सी तेथें आली. " शशी, जरा इकडे ये " ती खिन्न स्वरांत म्हणाली, " शशी, तूं रहा इथं. मी जातें हॉटेलांत. तुझ्या आईला दुःख होतं ना ? माझ्यामुळं तुमच्या-मध्यें असा कलह माजावा याबद्दल मला फार वाईट वाटतं. "

" नॅन्सी, तूं मनाला बिलकुल लावून घेऊं नकोस. असा प्रसंग येणार हें मी तुला सांगितलं नव्हतं का ? तुला मात्र हा देखावा पहावा लागला याचंच मला दुःख होत आहे. नॅन्सी, अशा भाषणांनीं माझ्या निश्चयाच्या आड येऊं नकोस. "

एवढ्यांत रावबानें मोटार आणली.

" रावबा, " शशिधर म्हणाला, " ही मोटार मी तुला सांगितली नव्हती. रस्त्यावरील एखादी टॅक्सी बोलाव. "

रावबा क्षणभर गोंधळून उभा राहिला. पण शशिधरनें पुन्हा निक्षून सांगतांच त्यानें बाहेरून गाडी आणली. आपलें सामान आंत ठेव-ण्यास सांगून त्यानें पुन्हा एकदां आईचा निरोप घेतला. खिशांतून हात-रुमाल काढून त्यानें डोळे पुसले. नॅन्सीनेंही मनोरमाबाईना भेटून निरोप घेतला व ती जड पावलांनीं मोटारमध्यें चढली.

मनोरमाबाईनीं मोटारजवळ येऊन पुन्हा एकवार शशिधरला गोंजारून त्याचा मुका घेतला. मोटार दृष्टीआड होईपर्यंत त्या अश्रू गाळीत

फाटकापाशीं उभ्या राहिल्या. गाडी मोठ्या हमरस्त्यावर येतांच शशिधरला रावसाहेबांशीं झालेल्या उत्तराप्रत्युत्तराची आठवण झाली व तो कांहींसें नॅन्सीला उद्देशून म्हणाला, "माझा इष्टेटीवरचा वारसा रद्द करण्याची मला भीति घालतात. पण मी कुठं त्याची पर्वा करतों आहें. माझ्याबद्दल भलतेच शब्द बोलतांना त्यांना कांहींच वाटलं नाहीं."

पुन्हा तो क्षणभर स्तब्ध राहिला. नॅन्सी कांहींच बोलत नव्हती. शशिधरनें ती कांहींतरी बोलेल या अपेक्षेनें एकदोन वेळां तिच्याकडे पाहिलें. पण ती खिन्न मुद्रा करून स्तब्धपणें समोर पहात होती.

"नॅन्सी, तूं बोलत का नाहींस ?" त्यानें आर्द्र स्वरांत तिला विचारलें.

तरीसुद्धां ती गप्पच होती. तिच्या डोळ्यांतून अश्रु खालीं पडले. "नॅन्सी, नॅन्सी," शशिधर तिच्या दोन्ही खांद्याजवळ धरून आपल्याकडे तिचा चेहरा फिरवीत म्हणाला, "नॅन्सी, आज आपण जगांत एकाकी झालों आहोंत. मला क्षमा कर."

"हें काय म्हणतां?" ती सद्गदित होऊन म्हणाली, "तुम्हींच मला क्षमा करा. माझ्यासाठीं तुम्ही सर्व सुखावर पाणी सोडलंत."

शशिधर नॅन्सीच्या वक्षःस्थलावर डोकें ठेवून अश्रू गाळीत होता.

"नॅन्सी, यापुढं कठीण दिवसांना तोंड दिलं पाहिजे."

तिनें शशिधरला घट्ट जवळ धरून गहिंवरून म्हटलें, "शशी, तूं माझ्यासाठीं निष्कारण अलोट स्वार्थत्याग करतो आहेस."

"नॅन्सी, माझा स्वार्थत्याग कसला ? मला तुझ्या सहवासानं जगांतील इतर सुखाचा विसर पडेल. हा सर्व परिणाम मला अगोदरच कळून चुकला होता. बाबा कांहीं झालं तरी आपल्या विवाहाला संमती देणार नव्हतेच. मला आईबद्दल मात्र अतिशय वाईट वाटतं. अगोदरच ती आजारी असते."

नॅन्सीच्या डोळयांसमोरून अनेक प्रकारचीं कल्पनाचित्रें जात होतीं.

रावसाहेबांनीं इष्टेटीचा वारसा रद्द करण्याची धमकी दिल्यावर कदाचित् शशिधर नाइलाज म्हणून आपल्या प्रेमाचा अव्हेर करील

अशी अस्पष्ट भीती बळजबरीनें तिच्या हृदयांत दडून बसली होती. आज त्या कटु कल्पनेचा शेवट झाला म्हणून तिला आनंद वाटत होता तर उद्यां आपल्या पगारावर शिक्षणक्रम चालू ठेवण्यास त्याच्या अभिमानी स्वभावाला कितपत रुचेल याची तिला चिन्ता वाटत होती. कॉलेजमधील विद्यार्थ्यांनीं मत्सरामुळें मारलेले टोमणे तो कसा सहन करील ह्या भीतिप्रद विचाराबरोबर आपल्या प्रियकराला कोठल्याही प्रकारची अडचण भासूं न देतां स्वतःच्या कर्तबगारीवर आपण आनंदी राहणार हा अभिमानास्पद विचार तिच्या मनाला संतोष देत होता.

ती बराच वेळ स्तब्ध राहिलेली पाहून शशिधर व्याकुळ होऊन म्हणाला, " नॅन्सी, तूं माझा तिरस्कार तर करीत नाहींस ना ? तुला किती स्वार्थत्याग करावा लागतो आहे ! " तिनें चटकन् वळून त्याच्या तोंडावर तळहात दाबला व ती प्रेमार्द्र दृष्टीनें त्याच्याकडे पहात म्हणाली,

" शशी, अशी भलतीच शंका मनांत कां बरं आणतोस ? उलट मीच म्हणतें कीं कदाचित् तूंच माझा तिरस्कार करूं लागशील. शशी, तूं आपल्या सर्वस्वावर माझ्यासाठीं लाथ मारावी एवढी माझी लायकी नाहीं. "

तिच्या डोळ्यांत अश्रू आले. कंठ दाटून आल्यामुळें ती स्तब्ध झाली. शशिधरचें तोंड वर करून चुंबन घेतांना तिचे दोन अश्रू त्याच्या गालावर पडले. ते पुशित ती पुन्हा म्हणाली, " शशी, तूं एवढ्या इष्टेटीचा हक्क माझ्यासाठीं सोडतो आहेस तें बरोबर आहे असं तुला वाटतं का ? खरंच, मी म्हणतें कीं तूं आपल्या वडिलांकडे जा आणि—"

" नॅन्सी ! " शशिधर एकदम आश्चर्यानें उद्गारला, " आणि तूं कुठं जाणार ? "

" माझी मुंबईला नोकरी आहेच. " तिनें खालीं पहात हताशपणें उत्तर केलें.

" नॅन्सी, तूं काय बोलते आहेस हें मला समजत नाहीं. " शशिधरचा कंठ भरून आला. आवंढा गिळून तो आर्तस्वरांत म्हणाला, " इष्टेटीचा वारसा रद्द होतांच मी भिकारी झालों तर— "

नॅन्सीनें चटकन् आपल्या हातानें त्याचें तोंड मिटलें व ती स्फुंदून म्हणाली, " शशी, असा गैरसमज करून घेऊं नकोस. पैशाच्या आशेनं तुझ्यावर मी प्रेम करतें असं का तुला वाटतं ? तुझ्यासाठीं मी विश्वाचं राज्य नाकारीन. पण मला क्षमा कर. मला एकच भीती वाटते. "

शशिधर गोंधळून तिच्याकडे विस्मयानें पहात होता.

त्याचा हात स्निग्धपणें हृदयाशीं गोंजारून ती कसेंबसें म्हणाली, " शशी, उद्यां तूं माझा तिरस्कार करूं लागशील. आयुष्याची धडपड अद्याप तुला जाणवली नव्हती. श्रीमंतीच्या जोरावर तुला जगांत परीक्षे-पलीकडे अवघड असं कधींच कांहीं वाटलं नसेल. पण चार दिवसांनीं तुला वाटूं लागेल. मीं माझ्या आईबापांचा संबध तोडला. समाजाला मुकलों, इस्टेट घालविली, अपमान सहन केले. विलायतेला जाण्याची संधि गमा-वली आणि एवढं सारं कशाकरतां केलं तर एका क्षुल्लक स्त्रीसाठीं ! "

शशिधरनें चटकन् तिचे दोन्ही हात पकडले व तो तीक्ष्ण नजरेनें तिच्याकडे पाहूं लागला. नकळतच त्याचे डोळे पाण्यानें भरून आले. गळा दाटून आल्यामुळें त्यानें एकदोन वेळ आंवंढा गिळला व बोलण्याचा प्रयत्न करतांना त्याच्या ओंठाची किंचित् हालचाल झाली. नॅन्सीला त्या भेदक दृष्टीकडे पाहवेना व तिच्या डोळयांतून घळघळ अश्रू वाहूं लागले.

" नॅन्सी, माझा विश्वास तुला वाटत नाहीं ना ? " त्यानें घसा साफ करून कठोर स्वरांत प्रश्न केला.

नॅन्सीनें त्याला एकदम मिठी मारून रडण्यास सुरवात केली. कांहीं वेळानें मान वर करून केविलवाण्या दृष्टीनें त्याच्याकडे पहात ती हुंदके देत म्हणाली, " शशी, चुकलें मी. क्षमा कर मला. "

शशिधरनें तिला आपल्या बाहुपाशांत गच्च धरून तिच्या गालाचें व अधराचें चुंबन घेतलें व कांहीं काल आपला गाल तिच्या मृदु शीतल केसावर आधारला.

टॅक्सी दरबार हॉटेलसमोर उभी रहातांच शशिधर तोंड पुशीत खालीं उतरला व हॉटेलांत जाऊन त्यानें चौकशी केली. पण सर्व खोल्या भरल्यामुळें परत येऊन तो नॅन्सीला म्हणाला, " जागाच नाहीं. चल

आपण कॅंपमध्यें सालडानाकडे जाऊं. त्यानं मला आग्रहानं आमंत्रण केलं आहे. शिवाय फ्रॅन्सिस्च्या पत्नीची तुला चांगली सोबत होईल."

मोटार पुन्हा कॅम्पच्या बाजूकडे वळली. जोरानें वाहणारा वारा त्यांच्या तापलेल्या भालप्रदेशाला सुखद वाटत होता. शशिधरनें घड्याळा-कडे पहात म्हटलें, "फ्रॅन्सिस् क्लबमधून घरीं आलाच असणार."

नॅन्सीनें निश्वास टाकला व खिन्न हास्य करीत ती म्हणाली, "पुष्कळ दिवस अपेक्षिलेला स्फोट झाला एकदांचा आज."

शशिधरही किंचित् हास्य करून उत्साहानें म्हणाला, "आणि त्यामुळं मनाला पुष्कळ हलकं वाटतं आहे. खरंच नॅन्सी, आपल्या सुखाला आजच खरी सुरवात झाली म्हणायची. चांदणंसुद्धां किती सुंदर पडलं आहे ! Darling, this is our honeymoon night."

एवढें बोलून शशिधरनें नॅन्सीला हृदयाशीं धरून तिच्या अधराचें चुंबन घेतलें. ड्रायव्हरनें मोटार जोरांत सोडली होती.



# ११

अनामिका कॉलेज सोडून सिनेमासृष्टींत प्रवेश करते आहे ही बातमी कॉलेजच्या प्रिन्सिपॉलसाहेबांस समजतांच त्यांनीं तिला वर्ग संपल्यावर आपल्याला भेटण्यासाठीं निरोप पाठविला होता. तिनें जरी आपला सर्व बेत अगदीं गुप्त ठेवला होता तरी तिला संशय वाटूं लागला कीं त्यांच्या कानावर कांहीं तरी गुणगुण गेली असावी व तसें असलें तर त्यांनीं केलेल्या प्रश्नांना कशीं उत्तरें द्यावीं याचा ती विचार करूं लागली. वर्गांत प्रोफेसरच्या भाषणाकडे तिचें बिलकुल लक्ष नव्हतें. एखाद्या वेळीं प्रिन्सिपॉलसाहेब हट्टाला पेटले तर काय होईल या विचारांत तिचे तिन्ही तास निघून गेले होते.

विद्यार्थ्यांमध्येंही आपल्या कॉलेजमधील पहिल्या नंबरची सौंदर्यवती कॉलेज सोडून चालली ही बातमी पसरल्यामुळें बरीच चर्चा सुरू झाली होती. कॉलेजमधील नाट्यमंडळाचा सेक्रेटरी तर अतिशयच अस्वस्थ झाला होता. कारण प्रतिवर्षीं आन्तर कॉलेज नाटकाच्या चढाओढींत नेहमीं विजय मिळविण्याचें श्रेय अनामिकेलाच होतें. तिचा सहजसुलभ अभिनय पाहून एखाद्या कसलेल्या नटीनेंही मान खालीं घालावी. त्या वर्षीं इंग्रजींत केलेल्या शाकुन्तल नाटकांतील तिची भूमिका एवढी सुंदर वठली कीं ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटीचा प्रो. बर्क् व त्याची पत्नी खूष झाली आणि त्यांनीं तिचें अभिनंदन करून तिला पारितोषकही दिलें होतें.

संध्याकाळीं कॉलेजचे वर्ग संपल्यानंतर अनामिका प्रिन्सिपॉलसाहेबांच्या बंगल्यावर गेली. तेव्हां साहेब तिची वाटच पहात होते. ती आंत दिवाणखान्यांत जातांच तिला खुर्ची दाखवित ते म्हणाले, “ या बसा, कांहीं चहा वगैरे घेतां का ? शिपाय, दोन कप कॉफी घेऊन ये. ”

साहेबाचें हें आदरातिथ्य अनामिकेला आश्चर्यकारकच वाटलें. कारण त्यांचें आमंत्रण कांहीं तरी अन्यायाबद्दल स्पष्टीकरण मागण्याकरतां व शिक्षा अगर दंड करण्याकरतांच असे. शिवाय कधीं कांहीं कारणास्तव कोणी विद्यार्थी आपण होऊन गेला तर आपण कामांत असल्याचें भासवून पंधरा वीस मिनिटं त्याला समोर उभा करायचा आणि मग शेवटीं आपल्याला सबड नाहीं या सबबीवर परत येण्यास सांगून त्याला रवाना करायचें हा त्यांचा रिवाज होता.

अनामिका खुर्चीवर बसून त्यांच्याकडे भाषणाच्या अपेक्षेनें पाहूं लागली. समोर असलेल्या कागदावर सही ठोकून पेन खालीं ठेवून हातांत हात अडकवित ते म्हणाले, " काय हो, तुम्ही कॉलेज सोडतां आहांत असं ऐकतों मी. खरं का हें ? "

" नाहीं; ती बातमी खोटी आहे. " अनामिका शांतपणें उत्तरली.

ह्या अनपेक्षित उत्तरानें साहेब चमकून पुन्हा उद्गारले, " काय, तुम्ही कॉलेज सोडून सिनेमा कंपनींत जात नाहीं का ? "

" मी सिनेमा कंपनींत जात असलें तरी कॉलेज सोडण्याची काय आवश्यकता ? कॉलेजचे अभ्यास संभाळूनच चित्रपटांत काम करण्याचा मी करार केला आहे. " अनामिका शांतपणें म्हणाली.

प्रिन्सिपॉल अधिकच गोंधळून गेले. पण आपल्या मनांतील विचार दडवून त्यांनीं प्रश्न केला,

" तुम्हाला कॉलेजचा खर्च चालवणं अशक्य होतं का ? मी तुम्हांला फ्री ठेवण्याची व्यवस्था करतों; अर्थात् गरिबी हा कांहीं गुन्हा नाहीं. "

" Poverty is acrime." अनामिकेनें तात्काल उत्तर केलें, " It is crime to endure it. कॉलेजचा खर्च चालविण्याकरतांच मी सिनेमांत नोकरी पत्करीत आहे. "

" पण मिस् अनामिका, पैशाकरतां तुम्ही असला हलका धंदा स्वीकारीत आहांत काय ? "

" माझ्या ध्येयसिद्धीसाठीं धडपडतांना जोंपर्यंत मी असत्याचरण करीत नाहीं तोंपर्यंत मला धंद्याच्या हलकेपणाकडे पहाण्याचं कांहीं एक

कारण दिसत नाहीं. याशिवाय ह्या धंद्यांत मला बिलकुल हलकेपणा वाटत नाहीं."

"Nonsense!" साहेब टेबलावर मूठ आपटीत म्हणाले, "सिनेमांत काम करणं हें कमीपणाचं नाहीं असं कोण म्हणेल? तुम्हाला मी एक दोन शिकवण्या देतों; मग तुम्ही हा नाद सोडाल कीं नाहीं?"

"मी आभारी आहें. पण खरं, मी केवळ पैशाकरतांच हा व्यवसाय स्वीकारीत आहे असं नाहीं. माफ करा, पण मी आपल्याला विचारतें, पैसा असल्यावर आम्ही कोणत्या व्यक्तीला मान देत नाहीं? मग तो पैसा त्यानं कितीही पापाचरण करून मिळविलेला असो. शिवाय जगांतील धनाढ्य लोकांचं विपुल धन क्वचित्‌च सचोटीनं आणि न्याय–नीतीनं मिळविलेलं असतं. आजच्या ह्या जगांत सदाचारानं वागणाऱ्या एखाद्याच मनुष्यानं जवळ पैसा केला असेल."

"तुम्ही अर्थशास्त्र हा ऐच्छिक विषय घेतला आहे वाटतं. पण तुमचं म्हणणं चुकीचं आहे. म्हणजे पैशावरच तुम्ही मानमरातब मिळविणार ना?"

"तसं मुळींच नाहीं. मी सहज एक बाजू सांगितली. मला ह्या धंद्यांत पडण्यास अनेक कारणं आहेत. शिवाय मला हा धंदा बिलकुल त्याज्य वाटत नाहीं."

"तुम्ही याकरतां आपल्या चारदोन वडील माणसांचं जरूर मत घ्या." साहेब गंभीरपणें म्हणाले.

"सर, कुणीही माझं समाधान करावं म्हणजे मी त्या धंद्यांत पडत नाहीं."

"आपल्याला हा धंदा शरीरविक्रयाप्रमाणं वाटत नाहीं का?" प्रिन्सिपॉलसाहेबांनीं भीत भीत प्रश्न केला.

पण अनामिकेला मात्र त्यांत अपमानास्पद असें कांहींच वाटलें नाहीं. असा प्रश्न तिनें अपेक्षिला नसल्यामुळें क्षणभर गोंधळून ती एकदम म्हणाली, "हो, हा तनुविक्रय असेल कदाचित्. पण त्यांत लांच्छनास्पद असं कांहींच दिसत नाहीं."

ह्या उत्तरानें प्रिन्सिपॉलसाहेब अतिशय चकित झाले. तिच्याबद्दल अद्याप बाळगलेल्या आदरभावनेला यामुळें जोराचा धक्का मिळाला. क्षणभर 'एकदम चालती हो' असें तिला सांगण्याचा मोह देखील त्यांना झाला. अनामिका शांत चित्तानें पुढें म्हणाली,

"सर, वेश्यांचा तनुविक्रय हा एका व्यक्तीकरतां असतो. पण नटीचा धंदा हा तनुविक्रय असला तरी तो साऱ्या समाजाकरतां असतो."

"म्हणजे डिग्रीमध्येंच फरक ना?" प्रिन्सिपॉलसाहेब रागीट स्वरांत म्हणाले.

"नाहीं सर, Difference lies in quality and not in quantity." अनामिका आवेशानें उत्तरली, "अस्पृश्यांच्या धंद्याकडे आपण तुच्छतेनं पहातां उपयोगी नाहीं, याचं कारण अस्पृश्य आवश्यक असं कार्य करतात म्हणूनच ना? मग नटीचा धंदा हें समाजाचं आवश्यक किंबहुना महत्त्वाचं कार्य नाहीं काय?"

"आवश्यक आणि महत्वाचं कार्य!" प्रिन्सिपॉलसाहेबांच्या शब्दांत तिरस्कार स्पष्ट जाणवत होता.

"नाहीं तर काय?" अनामिका त्वेषानें म्हणाली, "आज चित्रपट ही समाजाची केवढी गरज होऊन बसली आहे हें सचोटीनं मान्य करणं प्रत्येकाला आवश्यक आहे. आधुनिक यांत्रिक जगांत असह्य विषमतेमुळें जीवितासाठीं धडपडणाऱ्या गरीब मजुराला आणि नोकरपेशाच्या प्रथम-वर्गाला चित्रपटगृह हें केवढं विसाव्याचं स्थान झालं आहे! मग हें कार्य करणाऱ्या नटनटींना तुच्छतेनं उल्लेखण्यांत कोणता पुरुषार्थ आहे?"

प्रिन्सिपालसाहेबांना दृढ विश्वास वाटत होता कीं तिच्याशीं एकदोन प्रश्नोत्तरानंतर आपण तिला त्या हेतूपासून सहज लीलेनें परावृत्त करूं. पण त्यांच्या त्या कल्पनेला केवढा तरी जबरदस्त धक्का मिळाला होता.

"पण मिस् अनामिका, सिनेमासृष्टींत जाऊन नीति बिघडल्याशिवाय बिलकुल रहाणार नाहीं."

" पण सर, नीतीची व्याख्या तरी आपण काय कराल ? कालान्तरानं, देशाच्या परिस्थितीनं, नवीन कल्पनांच्या उदयानं आणि आर्थिक परिस्थितीनं आपल्या नीतिकल्पना कशा पार बदलून गेल्या आहेत आणि सारख्या जात आहेत हें आपणाला समजतंच आहे. कालची नीतिभ्रष्ट कृति आज नैतिक ठरते आहे ना ? आणि सर, मी असाही आपल्याला प्रश्न करतें कीं एखाद्या धंद्यांत नीति-भ्रष्टता आहे असंही घटकाभर मानलं तरी आपण तो धंदा वर्ज्य करतोंच असं नाहीं. वैद्यकीचा धंदा करतांना पुरुष अगर स्त्री डॉक्टर परस्त्री अथवा परपुरुषाच्या अंगाला स्पर्श करतो; पण त्याचं वर्तन आपण नीतिबाह्य कां ठरवित नाहीं बरं ? मग केवळ धंदा म्हणून क्षणभर आलिंगन देणाऱ्या अगर चुंबन घेणाऱ्या नटनटींची एवढीच वागणूक अनैतिक कां ठरवावी ? वैद्यकीय शास्त्रांत तुमच्या नीतीविरुद्ध तर जास्तच मोह असतो असं म्हणतां येईल. "

" पण वैद्यकीय शास्त्रांत असणारे लोक सुशिक्षित असतात; यामुळें त्यांची नीती भ्रष्ट होणं संभवत नाहीं. "

" मग सर, चित्रपटाच्या धंद्यांत सुशिक्षितांनीं जाणं आवश्यक आहे असंच म्हणतां ना ? " अनामिका विजयश्रीच्या आनंदानें म्हणाली.

प्रिन्सिपॉलसाहेब क्षणभर गोंधळले. डॉक्टर लोकांच्या नैतिक वर्तनाचा हवाला आपण उगाच दिला असेंच त्यांना वाटलें. पण विषयाला दुसरें वळण देण्याकरतां ते एकदम म्हणाले, " पण मी विचारतों कीं चित्रपटधंद्यांत पडून तुम्ही कोणता परमार्थ साधणार ! "

" सर, परमार्थाचा मी विचार केला नसला, तरी अर्थ मात्र खास साधणार. शिवाय सामाजिक कार्य केल्याचं समाधानही मला लाभेल. "

" पण चित्रपटानं कसलं समाजकार्य होतं ? " प्रिन्सिपॉलसाहेबांनीं कुत्सित हास्य करीत विचारलें.

" चित्रपटानं समाजसुधारणा, समाजशिक्षण हीं कार्यें होत नाहींत असं कोण म्हणेल ! त्या दिवशीं फ्रान्सच्या राज्यक्रान्तीचं चित्र पहाण्यास तुम्हींच ना साऱ्या वर्गाला सांगितलंत ? " अनामिका पुढें म्हणाली, " गरीबांच्या यातना आणि समाजांतील धर्मनीतीच्या वेडगळ

कल्पना यामुळें होणारा अन्याय्य छळ चित्रपटानं मानव जातीच्या दृष्टी-समोर विचारप्रवर्तक रीतीनें मांडला जातो असं कोण म्हणणार नाहीं ! सर, पुस्तकांचा उपयोग तुम्हाआम्हासारख्या शिकलेल्या लोकांनाच करतां येतो. पण चित्रपटाचं शिक्षण सामुदायिक रीतीनं अगदीं निरक्षर मनुष्यालादेखील घेतां येतं. करमणूक आणि शिक्षण यांचा सुंदर मिलाफ आज सिनेमाएवढा कुठंच दिसत नाहीं. कित्येक वेळां एका विद्वान् लेखकाची विचारप्रवर्तक सुंदर कादम्बरी वाचल्याचं श्रेय किती थोड्या वेळांत मिळत असतं !"

"पण मिस् अनामिका," साहेब अधिकारी स्वरांत म्हणाले, "चित्रपटाचा धंदा शिक्षणार्थ असतो असं दिसत नाहीं."

"असं कसं म्हणतां सर ? कांहीं चित्रपटांना आमच्या देशांत बंदी कां होते ? त्याचा समाजावर होणार परिणाम राजकर्त्यांनां भितीप्रद वाटतो म्हणूनच ना ? आणि विचारांना चालना देणारे असे चित्रपट तयार व्हावे म्हणूनच सुशिक्षितांनीं चित्रपटसृष्टींत प्रवेश केला पाहिजे असं मी म्हणतें शिवाय वेगवेगळे समाज आणि त्यांच्या चालीरीती चित्रपटाच्या साह्यानें आपल्याला समजत नाहींत का ?"

अनामिका त्वेषानें बोलत होती. विश्वविद्यालयाच्या सर्वसत्ताधारी सुलतानापुढें आपण बोलत आहों ह्याचा तिला तत्त्वप्रतिपादनाच्या भरांत कांहीं वेळ विसर पडून ती जोरानें उत्तरास प्रत्युत्तर करीत होती. पण प्रिन्सिपॉलसाहेब मात्र धूर्तपणें अद्यापही सौम्योपचारानें तिला तिच्या निश्चयापासून वळविण्याचा यत्न करीत होते.

ते पुन्हा शांतपणें म्हणाले, "पण आमचा समाज आज नटीच्या धंद्याकडे कोणत्या दृष्टीनं पहातो आहे बरं ?"

"कसा कां पाहीना !" अनामिका तुच्छतेनें म्हणाली, "नटीच्या धंद्याबद्दल तुच्छतेनं बोलणारे पुराणमतवादी ढोंगी वृद्ध गृहस्थही आपल्या सुनामुलींना सिनेमाला पाठवितातच ना ? आपणही पत्नीसह जातातच ना ? एवढंच नव्हे तर मनुष्याच्या विकृत मनोवृत्तीचा फायदा घेऊन केवळ पैसा मिळविण्याकरतां निघालेल्या छिचोर चित्रपटाला हे गृहस्थ

दोन दोन वेळ जात असतील. ज्या समाजाला भांडवलशाहीतल्या तरुण तरुणींना एकमेकांना मिठ्या मारून नाचतांना पाहून शिसारी येत नाहीं, पण एखाद्या नटीचं चित्रपटावर क्षणिक आलिंगन बीभत्स वाटतं त्या अडाणी ढोंगी समाजाची एवढी पर्वा कशाला करायची ? शिवाय मी म्हणतें समाजाला जी गोष्ट एवढी अप्रिय आहे असं तुम्ही समजतां त्याला एवढं महत्व तरी कां दिलं जातं ? बहुतेक मासिकांतून नटनटींच्या चित्रांनीं आणि त्यांच्याबद्दल माहितीनं पानं भरलेलीं दिसतात. घरोघर त्यांच्या लावलेल्या तसबिरी दिसतात. सर, हा विरोधाभास तरी कसा सोडायचा ?"

अनामिकेचें हें भाषण ऐकून प्रिन्सिपॉलसाहेब अगदीं नकळतच आपल्या मनाचें पृथःकरण करूं लागले. मृच्छकटिकांतील वसंतसेना पावसांत भिजते आहे हा देखावा आपल्याला विशेष पहावासा वाटतो. कदाचित् अनामिका आपल्यालाच उद्देशून बोलत असावी असेंच त्यांना वाटलें व कांहींसे चिडून त्यांनीं जोरानें म्हटलें, "वेश्यांच्या खिडक्यांकडे मनुष्य पहातो म्हणून वेश्यांचा धंदा नीच, अश्लील, त्याज्य समजल्याशिवाय रहात नाहीं."

प्रिन्सिपॉलसाहेबांनीं आपण तिला अडविली अशा खात्रीनें किंचित् हास्य केलें.

"पण सर, मला एवढंच म्हणायचं होतं कीं समाज एवढा तिरस्कार दर्शवितो पण बहुधा तो वरकरणीच असतो. कदाचित् ह्या तिरस्कारच्या बुडाशीं मत्सरही असूं शकेल. शिवाय नटीचा धंदा सामाजिक कार्य करण्याच्या उद्देशानं स्वीकारल्यानंतर त्यांत त्याज्य असं मला कांहींच वाटत नाहीं."

"पण तुमचा हेतु कोण पहाणार ?"

"तो माझ्या मनाला समजला म्हणजे झालं." अनामिका तेवढ्याच जोरानें पुढें म्हणाली, "एखादा लेखक आपल्या मनांतील विचार आणि हृदयांतील भावना शब्दांच्या साह्यानं समाजापुढें मांडून समाजसुधारणेचं कार्य करतो तेंच कार्य मी अभिनयानं करून कला–निर्मितीचा पवित्र

आनंद अनुभवणार आहे. एका ठराविकच मार्गानं जाऊन आयुष्याचा खेळखंडोबा करावा असं मला आतां बिलकुल वाटत नाहीं."

"पण तुमचा विवाह अजून व्हावयाचा आहे ना? निदान आमच्या समाजांत नटीशीं विवाह करण्यास सहसा कोणते प्रतिष्ठित तरुण तयार आहेत बरं?"

अनामिका किंचित् खिन्न स्मित करून म्हणाली, "माझा विवाह होईल असं मला आतां वाटत नाहीं. शिवाय मी म्हणतें कीं केवळ नटीचा धंदा स्वीकारला एवढ्याखातर जर माझ्याशीं कुणीही प्रतिष्ठित गृहस्थ विवाह करणार नाहीं तर मलाही तसल्या मनोवृत्तीच्या तरुणाशीं विवाह करण्याची इच्छा नाहीं."

आपल्या युक्तिवादाला यश येईल असें प्रिन्सिपॉलसाहेबांना वाटेना; तेव्हां त्यांनीं आपल्या अधिकारी आवाजांत बोलण्यास सुरवात केली होती. अनामिकेसारखी अजाण पोर अशा प्रकारचीं मतें प्रतिपादन करील अशी त्यांना बिलकुल कल्पना नव्हती. पाश्चिमात्य नीतिवेत्त्यांचे नीतिशास्त्रावरील बडे बडे ग्रंथ त्यांनीं वाचले होते व केवळ सिद्धान्त म्हणून जरी नवीन नीतिकल्पना मान्य केल्या असल्या तरी आपल्या कॉलेजांतील सात्विक शिक्षण घेणाऱ्या पोरीनें अशा प्रकारचीं नीतितत्त्वें प्रतिपादन करावीं ह्याचें त्यांना नवलच वाटलें. एकवेळ तिला एकदम घालवून द्यावी, असा विचार त्यांच्या मनांत आला. पण तरुण स्त्रीच्या नैतिक व विवाहविषयक चर्चेबद्दल त्यांना जिज्ञासा वाटत होती. यामुळेंच त्यांनीं आश्चर्यकारक शांतवृत्ति धारण केली होती. अनामिकेनें त्यांच्या कोठल्याही प्रश्नाला निर्भीडपणें उत्तर दिलें असतें याची जाणीव त्यांना चांगल्याच प्रकारें होती. विद्यार्थिनीशीं बोलतांना आपण एवढा मोकळेपणा दाखविणें योग्य होणार नाहीं या भीतीमुळें त्यांनीं आपली प्रश्नेच्छा प्रमाणांतच ठेवली होती. पण पुन्हां एक वेळ त्यांनीं तिला प्रश्न केला, "चित्रपट धंद्यांत आज कोणत्या प्रकारचे लोक असतात हें तुम्हाला माहीत आहे काय? मग त्यांत आपली नीतिमत्ता शाबूत राहील असं तुम्हाला कसं वाटतं?"

" सर, मी आपल्याला मघांशींच सांगितलं. आपण नैतिक आचरण कशाला म्हणतां ? मी असं म्हणतें कीं एकाद्या व्यक्तीच्या अनैतिक आचरणाचा सामाजिक नीतीवर जोंपर्यंत विघातक परिणाम होत नाहीं तोंपर्यंत समाजानं त्यावर बंधनं घालण्याचा प्रयत्न करणं व्यर्थ नाहीं का ?"

" म्हणजे ? " प्रिन्सिपॉलसाहेब आश्चर्यानें उद्गारले.

" म्हणजे, " अनामिका मोठ्या धीरानें उत्तरली, " तुमच्या दृष्टीनं किंवा सर्वसाधारण समाजाच्या दृष्टीनं नटीचं नीतिभ्रष्ट आचरण जर साऱ्या समाजाला दाखविलं जाणार नसेल व उलट तिच्या अंगच्या गुणांचं सामाजिक दृष्ट्या चीज होणार असेल तर मग तिच्या खाजगी जीवनाबद्दल एवढा बाऊ कशाला करावा ? कारण नीतितत्त्वं ही विशेषतः समाजाच्या स्वास्थ्याकरतांच ठरविलीं आहेत. "

प्रिन्सिपॉलसाहेब तिच्याकडे सारखे स्थिर दृष्टीनें पहात स्तब्ध होते. अनामिका मनांत आलेले विचार बोलून टाकावे म्हणून मोठ्या धीरानें पुढें बोलत होती. ती म्हणाली,

" सर, माफ करा, मी कदाचित् मर्यादेचं उल्लंघन करीत असेन. पण आपल्या उदार आणि शांत वृत्तीमुळंच बोलायला धीर वाटतो. मीं म्हणते, कला आणि नीति यांत प्राधान्य कुणाला द्यावं हा सुद्धां एक प्रश्न आहेच. तसंच सर, पुरुषापेक्षां आम्हां स्त्रियांना दुराचारी व कुमार्गी लोकांपासून आमची नीति शाबूत ठेवणं जास्त सोपं जात असतं. केवळ कथानकासाठीं प्रणयाचा अभिनय केला तर त्या स्त्रीपुरुषाचा प्रेमसंबंध जोडणाऱ्या मनुष्याच्या कोत्या बुद्धीचं प्रदर्शन नाहीं का होत ? आणखी मी असंही विचारतें कीं समाज सुधारण्यासाठीं वैयक्तिक नीतीचा त्याग केला तर या उच्च हेतूकडे पाहून तरी समाज तिकडे दुर्लक्ष करणार नाहीं काय ? "

" पण मिस् अनामिका, " प्रिन्सिपॉलसाहेब म्हणाले, " चित्रपट-सृष्टीचे चालक तुमच्या इच्छेप्रमाणं ध्येययुक्त चित्रपट तुम्हाला तयार करूं देतील असं का वाटतं ? "

" सर, अलबत. हेंच माझं ध्येय आहे आणि माझ्या सौंदर्याच्या साह्यानं आणि अभिनयकौशल्यानं मी तें साध्य करणार." अनामिका निश्चयी स्वरांत म्हणाली.

" मग एकंदरींत तुम्ही आपल्या सौंदर्याचा असा उपयोग करणार!"

प्रिन्सिपॉलसाहेबांचे हे उपहासगर्भ शब्द ऐकून अनामिकेला अतिशय चीड आली व ती त्वेषानें म्हणाली, " देवानं दिलेल्या सौंदर्याचा याहून श्रेष्ठतर उपयोग मला दिसतच नाहीं. उलट मी म्हणतें, कीं उद्यां मला देवाकडे जबाब द्यावा लागेल कीं, तुला दिलेल्या सौंदर्याचा तूं काय उपयोग केलास? मग मी काय सांगूं? अविवाहित राहून अखेरपर्यंत सारें सौंदर्य सोवळं ठेवलं किंवा तें सारें एखाद्या व्यक्तीच्या स्वाधीन करून त्याच्या वासना तृप्त करण्यांत त्याचा व्यय केला. सर, यापेक्षां निसर्ग-सौंदर्याला तहानलेल्या गरीब लोकांना सुखविण्याकरतां व त्यांना शिक्षण देण्याकरतां मी त्याचा सदुपयोग केला असं म्हणतांना मला किती अभिमान वाटेल!"

प्रिन्सिपॉलसाहेब एकदम ताडकन् उठून उभे राहिले. त्यांच्या तीक्ष्ण नजरेकडे तिरस्कारानें पहातांना अनामिकाही बिलकुल घाबरली नाहीं. तीसुद्धां खुर्ची मागें लोटून उभी राहिली.

" मिस् अनामिका, " प्रिन्सिपॉलसाहेब करारी आवाजांत म्हणाले, " असले अश्लील विचार माझ्या कॉलेजांतील विद्यार्थिनीनं बोलावे हें मला अतिशय लज्जास्पद वाटतं."

" आणि असले विचार ऐकायला उत्सुकता वाटावी हें लज्जास्पद नाहीं का?" असा प्रश्न करावा असें अनामिकेला वाटलें, पण ती प्रत्युत्तर न करतां स्तब्ध राहिली.

" तुम्हांला शेवटची ताकीद देतों" प्रिन्सिपॉलसाहेब अधिकारवाणीनें पुढें म्हणाले, " जर तुमचा चित्रपट-सृष्टींत जाण्याचा बेत असेल तर तुम्हाला यापुढें कॉलेजची पायरी चढण्याची मनाई आहे."

अनामिकेचा कंठ दाटून आला. रागामुळें थरथरणारा अधर दाबून धरीत तिनें प्रत्युत्तर केलें,

" मग मी आत्तांच ही कॉलेजची पायरी उतरतें. "

तिनें प्रिन्सिपॉलसाहेबांना नमस्कार केला व ती ताडकन् खोली-बाहेर पडली.

दरवाजावरील स्प्रिंगचें अर्धदार जोरानें हेलकावे खात होतें. प्रिन्सिपॉलसाहेब आश्चर्यानें स्तंभित झाले होते.

कॉलेजच्या फाटकांतून बाहेर जातांच तिनें टॅक्सी बोलावून आंत बसतांच ती हांकण्यास सांगितली. मोटार दिसेनाशी होतांच प्रिन्सिपॉल-साहेबांनीं पेटींतून चिरूट काढून शिलगावला व खुर्चीवर अंग टाकीत ते आपल्याशींच म्हणाले,

" चांगली गरीब पोर, पण अगदीं फुकट गेली. "

———

# १२

रावसाहेबांनीं शशिधरला घराबाहेर काढला ही बातमी सबंध शहरांत वणव्याप्रमाणें अल्पावधींतच सर्वत्र पसरली होती. स्थानिक वृत्तपत्रांतून रावसाहेबांच्या कुलवंत जुनाट घराण्यांतील अप्रसिद्ध ऐतिहासिक थोर पुरुषांची बेळगांवांतील कर्तबगारी वर्णन करून रावसाहेबांनीं असल्या लांच्छनास्पद कुलदीपकाला घराबाहेर हांकलून लावल्याबद्दल अस्पष्टपणें त्यांचें अभिनंदनही केलें होतें. या सर्व प्रकारामुळें रावसाहेबांचा स्वाभिमान दुणावला होता व पत्नीच्या आर्जवामुळें वळत असलेल्या त्यांच्या मनानें पुन्हा उचल खाल्ली. त्यांनीं प्राण गेला तरी शशिधरचें तोंड पहायचें नाहीं असा निर्वाणीचा निर्धार केला. एवढेंच नव्हे तर एखाद्या वृद्ध व्यवसायबंधूनें प्रश्न केलाच तर "आपण मुलाचं क्रियाकर्मान्तर करून मोकळा झालों" असें स्पष्टपणें सांगूं लागले.

बिचाऱ्या मनोरमाबाईंची स्थिती मात्र अत्यंत केविलवाणी झाली होती. शशिधर डॉक्टर होऊन विलायतेहून परत आला मग त्याच्या पसंतीनुसार एखाद्या मुंबईच्या स्वज्ञातीय बड्या घराण्यांतील गोऱ्या गोमट्या मुलीशीं त्याचा लग्नसोहळा करण्याची त्यांची महत्त्वाकांक्षा होती. पण दुर्दैवानें त्या आकांक्षा फोल ठरल्यामुळें त्यांना अतिशय वाईट वाटलें. शशिधरला तारुण्याच्या भरांत नॅन्सीसारख्या गोऱ्या थिल्लर पोरीनें भुरळ पाडली असावी असें त्यांना प्रथम वाटत असे. पण आठ दिवसाच्या परिचयानें त्या कल्पना खोट्या ठरून तिचा प्रेमळ स्वभाव, सभ्य वर्तणूक आणि शांतवृत्ति यामुळें त्यांना तिच्याविषयीं प्रेम वाटूं लागल्यामुळें त्या आपल्या मनाची समजूत घालण्याचा एकसारखा प्रयत्न करीत होत्या. पण शशिधरनें एका आंग्ल युवतीशीं विवाह करावा ही कल्पनाच त्यांना असह्य होत होती.

शशिधर मात्र आतां पूर्णपणें बेफिकीर झाला होता. 'रावसाहेबांना आपला हेतु कसा कळवावा, आई काय म्हणेल व साऱ्या प्रकाराचा परिणाम त्यांच्यावर, स्वतःवर व नॅन्सीवर काय होईल याचा मनाशीं विचार करतांना कल्पनेवर रचलेलें भीषण चित्र त्याच्या डोळ्यापुढें उभें राहात होतें. परंतु आतां तें भय उरलें नव्हतें. त्यानें यःकिंचितूही न डगमगतां रजिस्टर्ड' विवाहाकरतां आवश्यक नोटीस दिली होती. यामुळें सबंध शहरांत घुमघड्याक्यानें त्याच विवाहाची चर्चा चालली होती. खमंग बातमीकरतां भुकेलेल्या दरिद्री वृत्तपत्रांचें पोट त्या विषयानें पुष्कळ कालपर्यंत भरलें होतें व शशिधर—नॅन्सी यांच्या संबंधाबद्दल अश्लील अफवा तीं वर्तमानपत्रें निर्लज्जपणें प्रसिद्ध करून परनिंदेला उत्सुक असलेल्या विकृत वासनेची तहान तृप्त करीत होतीं. त्यांतील ते बीभत्स, अस्पष्टपणें आरोप करून लिहिलेले अग्रलेख आणि स्फुटें वाचून शशिधर कधीं कधीं हताश होऊन म्हणत असे, "माझ्यासारख्या अभेद्य कवच घातलेल्या प्राण्यालादेखील हे निंदेचे तीक्ष्ण बाण असह्य होतात. मग एखाद्या निराधार कोमल स्त्रीहृदयावर हे केवढी खोल जखम 'करीत असतील! ह्या क्षुद्रबुद्धि संपादकांना खुर्चीवर बसून कागदावर वाटेल तसा लेखणीचा हात चालवितांना आपण एका निरपराध प्राण्याच्या हृदयावर, अब्रूवर, सुखावर, साऱ्या जीवितावर केवढ्या दारुण रीतीनं घाव घालतों आहों याची कल्पना तरी असेल का? ते वृत्तपत्रांची ही पेटती मशाल कधीं कुणाच्या सर्वस्वाला लावून तें बेचिराख करतील याचा नेम नाहीं. पण त्यांना तरी दोष कां द्या? आमच्या हृदयांतून वाहणारे रक्ताचे पाट पाहून त्यांना आनंद होतो असें नाहीं. पण आम्हांला टोंचून रक्तस्राव करण्यांतच त्यांचं जीवन असतं."

शशिधरला ह्या सर्व वृत्तपत्रांना कायद्यानें योग्य तें उत्तर द्यावें असेंही वाटलें. पण असल्या क्षुद्र टीकेला प्रत्युत्तर देण्याएवढेंसुद्धां महत्त्व दाखवूं नये असें म्हणून तो गप्प राहिला होता.

बिचारी नॅन्सी मात्र शशिधरला चारी बाजूंनीं तीव्र निंदा सहन करावी लागते म्हणून अतिशय कष्टी झाली होती. तिचा जीव सारखा तळमळत होता. एकवेळ शशिधरला आपण लग्नाचा नकार द्यावा असें

तिला वाटलें. पण याचा अर्थ तो काय करील ? केवळ आपल्या संपत्ती-साठींच नॅन्सीचें सारें प्रेम आपल्यावर होतें असें त्याला वाटेल. शिवाय समाजानें त्याला बहिष्कृत केल्यामुळें आपणच शशिधरला धीर दिला पाहिजे नाहींतर तो आपल्या जीवाला अपाय केल्याशिवाय राहावयाचा नाहीं हा विचार तिच्या मनांत आला. एके दिवशीं पुन्हां तिनें आग्रहानें विचारलें, " शशी, माझ्याकरतां तूं आपल्या जीविताचा सत्यानाश करतो आहेस असं नाहीं का तुला वाटत ? अजून आयुष्याचा खरा खडतर प्रवास तुला करायचा आहे. माझ्यासाठीं तूं बिलकुल वाईट वाटूं देऊं नकोस. मला माझ्या धंद्यांत सदोदित समाधान वाटेल."

"नॅन्सी," शशिधर तिच्याकडे आर्द्र दृष्टीनें पहात म्हणाला, " मला धीर द्यायचा सोडून तूं काय बोलतेस हें ? तुझ्यावांचून मी बिलकुल जगूं शकणार नाहीं. नॅन्सी, समाजशिष्ट कावळयांच्या ओरडीला आम्ही कां म्हणून महत्त्व द्यायचं ? त्यामुळं त्यांना आपला विजय झाला असंच वाटेल. नॅन्सी, तूं बिलकुल घाबरूं नकोस. आम्ही एका समाजाला अन्तरलों तरी आमच्या शिक्षणामुळं, सत्कार्यामुळं व पैशाच्या सामर्थ्यानं दुसऱ्या समाजांत प्रवेश करूं शकूं. जो समाज आमच्या कृतीबद्दल तिर-स्कार व्यक्त करतो त्या समाजांत राहण्याचा अट्टहास करण्यांत अर्थ तरी काय ?"

शशिधर अधिकच उदास होऊन खिन्नपणें पुढें म्हणाला, "आज दमन मोकळा असता तर त्यानं मला किती धीर दिला असता. शक्य तों कसल्याच दुःखाची त्यानें मला जाणीव होऊं दिली नसती. तुला माझ्याबद्दल अविश्वास वाटतो का ?"

"शशी, मला क्षमा कर" नॅन्सी त्याच्या मानेला विळखा घालून गहिंवरून म्हणाली, " वेड्या, तुझ्याबद्दल विश्वास वाटत नाहीं असं नाहीं. आणि जरी माझा त्याग केलास तरीसुद्धां मी कधींही तुझा तिरस्कार करणार नाहीं. शशी, तुझ्या महत्त्वाकांक्षेच्या आड येणारी ही धोंड तूं आपल्या हातांनीं दूर केलीस तर शपथ सांगतें, मी दुःखी होणार नाहीं. माझ्या शशीसाठीं मी याहून मोठा स्वार्थत्याग तो कसला करणार ?"

" नॅन्सी, नॅन्सी, काय बडबडतेस हें!" शशिधर तिला हृदयाशीं घट्ट धरून म्हणाला, " तुझ्याशिवाय मला सुख नाहीं. महत्त्वाकांक्षा नाहीं. यापुढं असल्या भाषणांनीं मला हिणवूं नकोस."

शशिधरच्या डोळ्यांत अश्रू उभे राहिले. नॅन्सी त्याचे डोळे आपल्या हातानें पुसून जड स्वरांत म्हणाली, " शशी, तुझा एवढा आत्मविश्वास असेल तर माझं कांहींच म्हणणं नाहीं. मी तुझ्याबरोबर वाटेल त्या परिस्थितीशीं आनंदानं टक्कर देईन."

शशिधरनें तिला एकदम जवळ ओढून तिचें चुंबन घेतलें.

कांहीं दिवसानंतर जीवाला कांहींतरी विरंगुळा वाटावा म्हणून शशिधर व सालडाना नॅन्सीला बरोबर घेऊन आंबोली घाटांतील रानांत शिकारीला जाण्यास निघाले होते.

उंच घांटमाथ्यावर मोटार गेली तेव्हां नॅन्सीला तो देखावा अतिशय रमणीय वाटला. एका बाजूला दृष्टी न पोहोंचेल एवढी खोल दरी व रस्त्याच्या दुसऱ्या कडेला डोंगराच्या तुटलेल्या उंच कडा यांमधून जोरानें आपला मार्ग काढीत मोटार घांटमाथ्याखालीं उतरत होती. मधून मधून ढगांनीं आच्छादिल्यामुळें खालचा विस्तीर्ण प्रदेश दिसत नव्हता. खालीं पसरलेल्या खोऱ्यांतील अफाट हिरवेंगार मैदान पाहून नॅन्सीला विस्मयच वाटला व तिनें सालडानाला प्रश्न केला, " पावसाळ्यांत इथचा देखावा अतिशय रम्य दिसत असेल नाहीं?"

" वा, तुम्ही अवश्य या त्यावेळीं. कित्येक वेळां इथं धुक्याचा जोर एवढा असतो कीं मोटारच्या बाहेर काढलेला हातही आपल्याला जवळ जवळ दिसेनासा होतो. डोंगराच्या कड्यावरून पाण्याचे मोठाले स्रोत सारखे खालीं पडत असतात आणि जिकडे तिकडे हिरवंगार दिसतं."

इतक्यांत सालडानानें मोटार उभी केली. त्या भागांतील तो इन्जीनिअर असल्यामुळें तेथें असलेल्या चौकीवरील शिपायी पुढें येऊन त्यानें फाटक उघडलें. उद्यां साहेब पाहुण्यांसह यावयाचे आहेत याची वर्दी आदल्या दिवशींच मिळाल्यामुळें शिपायानें सर्व व्यवस्था केली होती.

मोटारींतून खालीं उतरून थोड्याच वेळांत वाटाड्याला घेऊन पलीकडच्या रानांत जाण्यास ते निघाले; शशिधरनें व सालडानानें मोटारींतील बंदुका उचलल्या. काडतुसाचा पट्टा कम्बरेभोवतीं अडकवीत सालडाना म्हणाला, "मिस्, विल्सन, तुम्ही आमच्या जवळच रहा. कित्येक वेळीं या रानांत चटकन् वाघदेखील दिसतो. एका महिन्यापूर्वी मी इकडे आलों होतों. एका झुडपांत भला मोठा एक वाघ बसला होता. मी त्याला अचानक पाहिला व जागच्या जागीं स्तब्ध उभा राहिलों. जरा का मी हालचाल केली असती कीं खात्रीनं त्यानं माझ्यावर उडी घेतलीच असती. माझ्याकडे तो सारखा पहात होता आणि मीही डोळ्याचं पातं न हालवितां त्याच्याकडे पहात घाबरून पण अवसानानं उभा राहिलों. हातांत भरलेली ही बंदुक होती, पण मी ती वर उचलण्याचा प्रयत्न केला असता कीं मेलोंच असतों. शेवटीं त्यानें माझ्याकडे पहातां पहातां एकदम उडी मारली आणि तो पळून गेला. मोटार गांठीपर्यंत माझ्या जीवांत जीव नव्हता. वाघासारखं लबाड जनावर नाहीं. मागाहून येऊन केव्हां झडप घालील याचा नेम नाहीं."

नॅन्सी मोठ्या कुतूहलानें सालडानाच्या शिकारीचें वर्णन ऐकत होती. त्यानें दोन मोठीं काडतुसें काढून आपल्या दुबारी बंदुकींत भरलीं आणि हंसत तो पुढें म्हणाला, "शशिधर, तुमच्या मराठी म्हणीप्रमाणं सशाच्या शिकारीस जातांना वाघाच्या शिकारीची तयारी करावी लागते. मिसेस् सालडानाला एकदां शिकार कशी करतात ती पहायची फार इच्छा झाली म्हणून तिला घेऊन आलों. दोनचार कवडे मारून माग येत होतों. संध्याकाळ झाली होती. इतक्यांत तिला आपला पाय कशावर तरी पडल्याचा भास झाला म्हणून ओरडून ती माझ्या बाजूला धांवली. मी चटकन् हातांतील बंदुक सरसावून टॉर्च पेटविली तो भला मोठा सर्प चिडून तिच्या अंगावर येत होता. पण त्या प्रखर प्रकाशामुळं दिपून फूत्कार करीत फडा उभा करून तिथंच उभा राहिला. मी लगेच गोळी झाडली. ती त्याला नेमकी लागली. तो तडफडत पलीकडच्या झाडींत शिरला."

"मग तो मेला कीं नाहीं?" नॅन्सीनें उत्सुकतेनें मध्येंच विचारलें.

" तें कुणी पाहिलं ? कारण घायाळ झालेल्या श्वापदाएवढं भयंकर कांहीं नाहीं. मिसेस् सालडाना एकदां येऊन मोटारींत बसली तरीदेखील अगदीं बेळगांवला येईतोंपर्यंत तो साप मोटारच्या मागं धांवत आहे कीं काय तें सारखी पहात होती. तेव्हांपासून शिकारीचं नांव ती बिलकुल काढीत नाहीं. "

त्या प्रसंगाची आठवण होऊन सालडाना आपल्याशींच हंसत होता. शशिधर चौफेर नजर फिरवून कांहीं दिसतं का पहात होता. त्या शांत रानांत कोठें तरी बसून पक्षी विचित्र शब्द करीत होते. मधूनच वानरांचे कळप इकडून तिकडे उड्या मारीत पळत होते.

सूर्यास्ताला अजून अवकाश असूनही डोंगरमाथ्यामागें सूर्य दडल्यामुळें त्या गर्द झाडींत बराच काळोख भासूं लागला होता. सालडाना कांट्याकुट्यांतून मार्ग काढीत सारखा पुढें जात होता. शशिधर व नॅन्सी लहान लहान फांद्या बाजूला करून व बंदुकीनें कांटेरी झुडपें बाजूला लकटून पुढें चाललीं होतीं. सालडानानें वर्णन केलेल्या प्रकारामुळें नॅन्सी कांहींशी घाबरून गेली होती. दोन चार मारलेले कवडे आजच्या करतां शिकार पुरे झाली असें म्हणून ती मागें फिरण्याकरतां शशिधरला सांगत होती.

सालडाना मोठ्या मेहनतीनें करवंदीच्या जाळींतून पुढें गेला होता. त्यानें बंदुकीचा बार झाडल्याचा आवाज ऐकून शशिधरला आपण देखील कांहींतरी शिकार करावी असें वाटून तो सभोंवार पहात होता. इतक्यांत पाठीमागें कोणीतरी जनावर धांवल्याप्रमाणें सुकलेल्या पानांचा सळसळ असा आवाज झाला. शशिधरनें एकदम वळून चटकन् बंदुकीच्या चापावर हात ठेवला. नॅन्सी श्वास कोंडून सभोंवार भीतीनें पहात होती. इतक्यांत शशिधर एकदम ओरडला, "नॅन्सी! नॅन्सी, पळ, पळ! ( Run away! Run away! )" व त्यानें एकदम समोरून येणाऱ्या रानडुकरावर गोळी झाडली.

नॅन्सीनें भयंकर किंकाळी फोडली आणि ती शशिधरकडे धावूं लागली. परंतु त्या मोठ्या रानडुकरानें सोसाट्यानें येऊन नॅन्सीला भयंकर ठोकर

दिली व तिला धाडकन जमिनीवर आदळली आणि तो तसाच वेगानें पुढें गेला. त्याची गती कमी होऊन तो पुन्हां वळणार एवढ्यांत शशिधरनें अचूक दुसरी गोळी झाडली. ती मर्मस्थानीं लागल्यामुळें तें क्रूर श्वापद खालीं पडलें व भीषण रीतीनें किंचाळून त्यानें प्राण सोडला. धाडकन् बंदुक टाकून शशिधरनें नॅन्सीकडे धांव घेतली. सालडानाही बंदुकीचे लागोपाठ दोन बार ऐकून व नॅन्सीची आरोळी ऐकून आपण जखमी केलेला तो भयंकर रानडुकर तिच्यावर धावून गेला असावा हें ओळखून तेथें धांवत आला.

नॅन्सीच्या डाव्या कुशीवर भयंकर जखम होऊन तींतून सारखा रक्तस्राव सुरू झाला होता व ती जमिनीवर निश्चेष्ट पडली होती.

शशिधरनें एकदम रडावयास सुरवात केली. सालडानानें तात्काळ शिपायाला पाठवून रस्त्यावरील कांहीं लोक घेऊन येण्यास सांगितलें व तो मोठ्या धीरानें म्हणाला, " शशिधर, या वेळीं रडतोस काय ! तसं कांहीं झालं नाहीं. अगोदर बँडेज बांधून रक्तस्राव बंद कर. वेळ गमावून कसं चालेल ! "

शशिधर सारखा स्फुंदून रडत होता. नॅन्सीला आपल्या मांडीवर घेऊन थरथरणाऱ्या हातांनीं त्यानें तिच्या ब्लाउझच्या गुंड्या सोडल्या व हातरुमालानें रक्त टिपून त्यानें जखम पाहिली. रानडुकराच्या सुळ्यामुळें तिला खोल जखम झाली होती. कदाचित् एकदोन बरगड्याही मोडल्या असाव्यात हें पाहून शशिधर तिला हृदयाशीं धरून आक्रोश करूं लागला,

" नॅन्सी ! नॅन्सी ! फ्रॅन्सिस्, माझी नॅन्सी मला सोडून जाणार का रे ! "

" शशिधर, काय करतोस हें ? हीं बघ तिची नाडी चांगली चालते आहे. "

शशिधरनें मोठ्या कष्टानें हुंदका दाबण्याचा व्यर्थ प्रयत्न केला व दुःखानें कपाळावर हात मारून तो रडूं लागला. प्रसंगच आला तर तात्पुरता उपचार करण्याकरतां औषध व कांहीं साहित्य सालडाना बरोबर नेहमीं बाळगीत असे. त्यानें बॅगमधून कापूस काढला व तो पाण्यानें

भिजवून जखम पुसली. शशिधर महत्प्रयासानें रडें आवरण्याचा प्रयत्न करीत तिच्या जखमेवर बँडेज गुंडाळीत होता. नॅन्सीचें मस्तक झाडाच्या बुंध्यावर आपटल्यामुळें तिच्या भाल प्रदेशावरही जखम झाली होती. शशिधर तिचा चेहरा दोन्ही हातांनीं धरून तिच्याकडे पाहून तडफडून रडत होता.

"फ्रॅन्सिस्, काय झालं हें ? नॅन्सी, नॅन्सी, मी आतां काय करूं ? नॅन्सी, कशाला शिकारीला येण्याचा हट्ट घेतलास !"

सालडाना धीरानें निमूटपणें तिची नाडी पहात होता.

इतक्यांत शिपाई पुष्कळ लोकांसह तेथें आला. शशिधरच्या मांडीवरून त्यांनीं नॅन्सीला उचलून रस्त्यावर नेलें. सालडानानें चौकींत धांवत जाऊन ब्रँडीची बाटली काढली व थोडीशी नॅन्सीला भरवून त्यानें तिला मोटारमध्यें मागच्या गादीवर घातली व ड्रायव्हरला बेळगांवकडे मोटार जोरानें सोडण्यास सांगितलें.

रात्रीं आठच्या सुमारास बेळगांवांतील सरकारी दवाखान्यांच्या आवारांत मोटार शिरली. सालडानानें मुख्य नर्सला गांठून नॅन्सीला आपरेशन रूममध्यें गाडीवर घालून नेण्यास सांगितलें. डॉक्टरनें तिची नाडी पाहिली तों ती अत्यंत क्षीण झाली होती. त्यानें धनुर्वात प्रतिबंधक व उत्तेजक अशीं दोन इन्जेक्शन्स् दिलीं. यामुळें अल्पावधींत तिच्या चिन्ताजनक स्थितींत किंचित् सुधारणा झाली.

कांहीं वेळानें डॉक्टरनें तिच्या जखमांचें स्वरूप तपासलें व तात्काळ ऑपरेशन आवश्यक असल्याचा सल्ला दिला. सालडाना जवळच उभा होता. त्याला डॉक्टर हलकेच म्हणाले, "मि. सालडाना, जखमा बऱ्याच भीषण स्वरुपाच्या दिसताहेत. फुप्फुसालाही इजा झाली असावी असं दिसतं व कदाचित् हृदयालाही धक्का मिळाला असेल. दुर्दैवी बिचारी पोर !"

शशिधरला त्यांनीं धीर देण्याचा प्रयत्न केला. पण तो वैद्यकीय शास्त्राचा विद्यार्थी असल्यामुळें त्याला एकंदर गोष्टीच्या भीषण स्वरूपाची जाणीव झाली होती.

रात्रीं ही बातमी मनोरमाबाईंस समजतांच त्या धांवत दवाखान्यांत आल्या. शशिधरचा तो रक्तानें माखलेला पेहराव व उदासवाणा चेहरा पाहून त्यांना पराकाष्ठेचें वाईट वाटलें. शशिधरची मुद्रा एखाद्या भ्रमिष्टा-प्रमाणें दिसत होती. आपली आई आपल्याला गोंजारीत असल्याची जाणीव होऊन त्यानें तिच्याकडे शून्य दृष्टीनें पाहिलें.

"बाळ शशी," त्यांनी त्याला हृदयाशीं धरून आवंढा गिळला.

"आई, आई, नॅन्सीला काय झालं ग?" शशिधर आईला घट्ट मिठी मारून एकदम रडूं लागला, "आई, माझं काळीज फुटतं ग!"

मनोरमाबाई पुत्राला हृदयाशीं गोंजारून स्फुंदून रडूं लागल्या.

रावसाहेबांस ही बातमी क्लबांतच समजल्यामुळें ते सरळ हॉस्पिटल-मध्यें आले होते. पण त्यांना आपल्या मुलाला भेटण्याचें मनोधैर्य नव्हतें व एखाद्या वेळीं त्याचा परिणामही इष्ट होणार नाहीं हें जाणून ते डॉक्ट-रच्या खोलींतच बसून राहिले.

ऑपरेशन आटोपल्यानंतर नॅन्सीला गाडीवर घालून पलीकडच्या खोलींत नेतांना पाहून मनोरमाबाईंना हुंदका आला. शशिधर तिच्या निश्चेष्ट देहाकडे आणि निर्विकार चेहऱ्याकडे हताशपणें पहात होता. तिच्या मागोमाग तो जाऊं लागला, तेव्हां डॉक्टरनें कांहीं तरी खाऊन मग येण्यास त्याला आग्रह केला. पण त्याचें म्हणणें न ऐकतां तो नॅन्सीच्या बिछान्या-जवळ बसून राहिला.

बराच वेळ तिच्या चेहऱ्यावर कसलाच फरक दिसत नव्हता. तिची गौर कान्ती रक्तस्रावामुळें अधिक फिक्कट आणि निस्तेज दिसत होती.

"आई," शशिधर गहिंवरून म्हणाला, "दमनला तार करून बोलाव ग! अनामिकेला आणि बेबीला पण ताबडतोब निघायला कळवा. त्या जवळ असल्या म्हणजे नॅन्सीला बरं वाटेल."

"बरं बाळ, आत्तां तार करायला सांगतें हं." असें म्हणून मनोरमाबाई बाहेर गेल्या. पण बिचारा दमन दिवसभर श्रम करून ह्या वेळीं तुरुंगाच्या कोठडींत झोंपी गेला असेल, त्याला तार कोण पोहोंच-विणार! हा विचार मनांत येऊन त्या व्याकुळ झाल्या.

त्या रात्रीं बराच कालपर्यंत नॅन्सीची प्रकृति अतिशय चिन्ताजनक वाटत होती. परंतु मध्यरात्रीनंतर कांहींसा आशाजनक बदल झाल्यामुळें शशिधर मोठ्या उत्सुकतेनें तिच्या शेजारीं बसून ती सावध होण्याची वाट पहात होता.

पहांटेचा प्रहर झाला होता. रात्रपाळीवरील नर्स एक इन्जेक्शन देऊन जवळ बसून नॅन्सीची नाडी पहात होती. दवाखान्यांत सर्वत्र गंभीर शांतता पसरली होती. नॅन्सी आतां लवकरच डोळे उघडून आपल्याकडे पाहील या अपेक्षेनें शशिधर वांकून सारखा तिच्या चेहऱ्याकडे मोठ्या उत्सुकतेनें पहात होता. त्याचा चेहरा अतिशय म्लान झाला होता. घोर चिन्तेमुळें आणि जाग्रणामुळें खोल गेलेले डोळे एक प्रकारें भयसूचक दिसत होते. अव्यवस्थित केस त्याच्या भालप्रदेशावर रुळत होते.

कांहीं वेळानें तिचा हात आपल्या हातांत घेऊन त्यानें 'नॅन्सी' अशी आर्द्र स्वरांत हांक मारली व चटकन् त्याच्या डोळ्यांत पाणी आलें. तिच्या तळहाताचें हलकेच चुंबन घेऊन तो पुन्हां रडूं लागला. समोर उभ्या असलेल्या नर्सलादेखील तें हृदयस्पर्शी चित्र पाहवलें नाहीं व ती निमूटपणें बाहेर गेली.

शशिधरनें नॅन्सीच्या केसावरून हात फिरविला व तिला अतिशय केविलवाण्या स्वरांत हांक मारली. त्या शब्दाबरोबर त्या अवस्थेंत देखील नॅन्सीच्या भुंवया किंचित् वक्र होऊन पुन्हां तिचा चेहरा निर्विकार झाला. शशिधर हृदयाला पीळ पाडून पुन्हां पुन्हां तिला हांका मारूं लागला. नॅन्सीनें डोळे उघडले. शून्य दृष्टीनें समोर पाहून पुन्हां तिनें नेत्र झांकले. शशिधर पुन्हां रडत हांका मारूं लागला.

थोड्याच वेळांत तिनें पुन्हां डोळे उघडले. तिची मुद्रा भावनाशून्य दिसत होती. क्षणभरानें आपण कोठं व कशी आलों याची आठवण करण्याकरितां तिनें सभोंवार पाहिलें. कॉटच्या बाजूला उभ्या असलेल्या नर्सकडे पाहून तिला तो दवाखाना असलेल्याची जाणीव झाली. क्रमाक्रमानें झालेल्या सर्व प्रकारची जाणीव होऊन तिच्या डोळ्यांत पाणी आलें. भयंकर वेदनामुळें ती विव्हळूं लागली.

"नॅन्सी, तुला काय पाहिजे?" शशिधरनें तिच्या तोंडाजवळ तोंड नेऊन दाटलेल्या कंठानें विचारलें.

"शशी," कांहीं वेळ स्तब्ध राहून ती अतिशय अस्पष्ट स्वरांत गुणगुणली, "मी जगेन का?"

"नॅन्सी, घाबरूं नकोस. तूं लवकरच बरी होशील. विशेष दुखापत तुला झालेली नाहीं हं."

"बेटीला आणि अनामिकेला तार करून बोलाव."

"बरं, बरं, केलीच आहे तार त्यांना. दमन पण येईल उद्यां!" शशिधर तिचे डोळे पुसून स्फुंदून म्हणाला. इतक्यांत डॉक्टर तेथें आले. लवकरच बरी होशील असें आश्वासन देऊन नॅन्सीला त्यांनीं औषध दिलें व स्वस्थ झोंपण्यास सांगितलें. शशिधरला घेऊन ते तेथून गेले.

सकाळीं जिकडे तिकडे या प्रकाराची चर्चा सुरू झाली. गांवांत अनेक बातम्या उठल्या होत्या. कोणी रानडुकरावर गोळी झाडतांना ती नॅन्सीला लागली असें म्हणत होते; पण याच्याही पलीकडे कांहीं लोक जात होते. शशिधरला नॅन्सीचा खून करावयाचा होता व म्हणून त्यानें तिच्यावर मुद्दाम गोळी झाडली असावी अगर रानडुकरापासून तिचें रक्षण केलें नसावें असें त्यांनीं निश्चित मत जाहीर केलें होतें. स्वाभाविकपणें सर्व ठिकाणीं कल्पनेलाच विशेष महत्व देण्यांत येत होतें व पोलीस ऑफिसरकडेही याच संशयाची पुडी सोडली होती.

बिचारा पोलीस ऑफिसर गेला सबंध आठवडा शहरांत खून, दरोडा, मारामारी यापैकीं कसलाच प्रकार न झाल्यामुळें भुकेनें व्याकुळ झाला होता. यामुळें अशा प्रसंगीं आलेली संधि तो व्यर्थ दवडील हें शक्य नव्हतें. त्यानें तात्काळ दवाखान्यांत जाऊन डॉक्टरची गांठ घेतली. नॅन्सीची अवस्था चिन्ताजनक असल्याचें ऐकून त्यानें तिचा जबाब घेण्याचें ठरविलें. पण यामुळें तिची प्रकृति अधिक बिघडण्याचा संभव आहे असें म्हणून त्याला परवानगी दिली नाहीं. त्या अधिकाऱ्यानें लगेच सालडानाचें म्हणणें लिहून घेतलें. शशिधरला त्यानें अपघात कसा झाला म्हणून उलट सुलट प्रश्न विचारले. आंपल्यावर अस्पष्टपणें खुनाचा आरोप करणाऱ्या त्या अधि-

काऱ्याचा शशिधरला अतिशय तिरस्कार वाटून तो चिडून उद्गारला, "पगारांत केवळ दहापंधरा रुपये बढती व्हावी म्हणून इन्स्पेक्टरसाहेब, तुम्ही मला फांसावर चढविणार का? पण माझ्या नॅन्सीच्या अंगांत माझे रक्त घालायचं आहे तें झाल्यावर मग तुम्ही माझ्या नरडीचा खुशाल घोंट घ्या."

इन्स्पेक्टरसाहेबांना ते शब्द भयंकर अपमानास्पद वाटले. धंद्यांत रिघतांनाच आपल्या सद्सद्विवेक बुद्धीचा जाहीर लिलांव ज्यांनीं केला त्यांची सद्सद्विवेक–बुद्धि जागृत करूं गेल्यास त्यांची सूड–बुद्धि मात्र जागृत होण्याचा संभव असतो हें जाणण्याइतकी शशिधरची त्या वेळीं मनोवृत्ति नव्हती. त्याचे ते शब्द ऐकून त्या अधिकाऱ्यानें तात्काल शशिधरला कैद करण्याचा बेत केला व तो त्यासाठीं आवश्यक पुरावाही गोळा करूं लागला.

रावसाहेबांच्या कानावर ही बातमी जातांच त्यांच्या मनाला भयंकर धक्का बसला. केवळ आपल्या दुरभिमानामुळेंच आपण ह्या घोर परिणामाला कारणीभूत झालों अशी टोंचणी त्यांच्या हृदयाला जाचूं लागली. सरकारी कायदेपंडिताचें काम पुष्कळ वर्षें केल्यामुळें पोलीसांच्या हातांत गेलेल्या क्षुल्लक प्रकारालादेखील पुष्कळ वेळां केवढें भयंकर स्वरूप येऊं शकतें याची त्यांना चांगलीच जाणीव होती.

एकुलत्या एका मुलाला खरोखरीच जर खुनाच्या आरोपामुळें न्यायासनासमोर उभा केला तर? या कल्पनेनें त्यांच्या हृदयांत विलक्षण कालवाकालव झाली. समाजशिष्टांच्या क्षुल्लक प्रशंसेखातर आपण एकुलत्या पुत्राला घराबाहेर काढला व पत्नीच्या आर्जवाला साफ नकार दिला याबद्दल त्यांना अतिशय पश्चात्ताप वाटला. जर या आजारांतून नॅन्सी बरी झाली तर स्वतः आपण त्यांचा विवाह करणार असा त्यांनीं खिन्न मनःस्थितींत विचार केला. त्यांच्या डोळयांत पाणी आलें. बराच कालपर्यंत ते गतकालच्या गोष्टी आठवून विचार करीत होते व मनोरमाबाई जर दारावर आल्या नसत्या तर विचारांचा ओघ तसाच चालू राहिला असता. आपल्या पतीच्या चेहऱ्यावरील खिन्नता पहातांच त्यांच्या हृदयांत च्चर्र झालें व डोळयांत अश्रू उभे राहिले. आवंढा गिळून त्या कसेंबसें म्हणाल्या "शशीच्या जीवाला कांहीं धोका नाहीं ना?"

" म्हणजे ! " रावसाहेब दचकून म्हणाले.

" आत्तांच रावबाला दवाखान्यांत चहा घेऊन पाठवला होता. तो म्हणाला कीं शशि आणि पोलीस इन्स्पेक्टर कांहीं तरी चिडून बोलत होते आणि आतां इन्स्पेक्टर बाहेर आले आहेत. "

रावसाहेब कांहीं न बोलतां खुर्चीवरून उठले. तिजोरी उघडून त्यांनीं कसले तरी कागद काढले व इन्स्पेक्टरशीं खोलींत कांहीं वेळ चर्चा करून ते परत आले. मनोरमाबाई चिन्तातुर होऊन तेथें बसल्या होत्या.

" कांहीं घाबरूं नकोस. मी सर्व व्यवस्था केली. " असें रावसाहेबांनीं त्यांचें समाधान केलें.

दुपारीं नॅन्सीचा आजार अधिक अधिक चिन्ताजनक होऊं लागला. डॉक्टरनीं शक्य तों सर्व उपाय चालविले होते; पण तिच्या प्रकृतींत आराम न पडतां तिची स्थिती निराशाजनक होऊं लागली. डॉक्टरनें पोलीस अधिकाऱ्याला तिचें स्टेटमेंट घेण्यास सांगितलें. तिनें अपघात कसा झाला याचें वर्णन करून शशिधर व सालडाना यापैकीं कोणाचाच दोष नाहीं असें सांगितलें. तेवढ्यामुळें तिला बराच थकवा आला. दुपारच्या सर्व्हिसला अनामिका व बेटी तांतडीनें तिला भेटण्याकरतां आल्या होत्या.

संध्याकाळच्या सुमारास नॅन्सीनें शशिधरशिवाय सर्वांस बाहेर जाण्यास विनविलें. सर्वजण जातांच तिनें सभोंवार नजर फिरविली व ती इंग्रजींत बोलूं लागली. शशिधरचा हात तिनें आपल्या दोन्ही हातांनीं धरून आपल्या ओंठावर दाबला व तो हात हृदयाशीं धरून ती अतिशय आर्द्र दृष्टीनें त्याच्याकडे पाहूं लागली.

" नॅन्सी, काय पाहिजे तुला ? " शशिधर आपल्या दुसऱ्या हातानें तिचें केंस मागें सारल्याप्रमाणें करीत स्फुंदून म्हणाला.

" शशी, असा रडूं नकोस. तुझ्या आईला आणि वडिलांना मला कांहीं सांगायचें आहे. शशी, देवाच्या मनांतून आपला विवाह व्हावयाचा नव्हता. माझ्यासाठीं तूं दुःख करीत बसणार नाहींस असं मला वचन दे. शशी, तूं लग्न करशील ना ? " तिच्या डोळ्यांतून घळघळ अश्रुधारा वहात होत्या.

"नॅन्सी, नॅन्सी," शशिधरही ढळढळां रडूं लागला.

नॅन्सी वेदनांमुळें कण्हत रडूं लागली "महत्प्रयासानें त्या यातना सहन करून ती विव्हळत म्हणाली, शशी, तुझे वडील विचारी आहेत. त्यांच्याशीं प्रेमानं वाग. शशी, पुन्हां एकदां बोल 'माझं तुझ्यावर गाढ प्रेम आहे' असं पुन्हां एकदां बोल म्हणजे मग मी सुखानं मरेन."

"नॅन्सी," शशिधर स्फुंदून स्फुंदून रडूं लागला, "नॅन्सी, तुझ्यासाठीं मी वाटेल तें करीन."

तिनें त्याचा हात आपल्या गालावर दाबून अतिशय स्निग्धपणें गोंजारला व क्षणभर समाधानानें डोळे मिटले.

"शशी लाडक्या," असें म्हणून पुन्हा तिनें आपले दोन्ही हात पुढें करून त्याचा चेहरा आपल्या हातांत धरला.

ती अत्यंत क्षीण झाली होती. होती नव्हती तेवढी शक्ती एकवटून तिनें त्याला जवळ ओढून त्याचे ओंठ आपल्या अधरावर ठेवले. शशिधरनें पटापट चुंबनें घेऊन तिच्या गालावर आपला गाल दाबला. दोघांच्याही डोळ्यांतून घळघळ अश्रुधारा चालल्या होत्या.

कांहीं वेळ गेल्यानंतर शशिधरनें मान वर केली. नॅन्सी डोळे मिटून निश्चेष्ट पडली होती.

"नॅन्सी! नॅन्सी!" शशिधर हांका मारूं लागला, "नॅन्सी!"

ती गडबड ऐकून डॉक्टर आंत आले. ती बेशुद्ध झालेली पाहून त्यांनीं घाईघाईनें एक इन्जेक्शन् दिलें. तेव्हां थोड्याच वेळांत पुन्हा नॅन्सीनें डोळे उघडले. डॉक्टरनें तिची नाडी पाहून खिन्न चेहरा केला. बाहेर येऊन ते रावसाहेबांस हलकेंच म्हणाले, "She is fast sinking."

सर्व मंडळी कॉटभोंवतीं जमली. रावसाहेबही हलकेंच डोळे पुसून आंत गेले. नॅन्सी क्रमाक्रमानें सर्वांकडे शून्य दृष्टीनें पहात होती. अनामिका व मनोरमाबाई तिच्या एका बाजूला कॉटवर बसल्या होत्या व दुसऱ्या बाजूला शशिधर व बेटी बसलीं होतीं. रावसाहेबांना समोर उभे पाहातांच तिच्या ओंठांची किंचित् हालचाल झाली. ती आपल्याशीं बोलण्याचा प्रयत्न करते

आहे हें जाणून रावसाहेब तिच्याजवळ गेले तेव्हां अतिशय क्षीण आवाजांत ती म्हणाली, "मला क्षमा करा. माझ्या शशीशीं प्रेमानं वागा हं! मी आतां लवकरच जाणार. अनाम, तूं आणि दमन माझ्या शशीबरोबर अशींच प्रेमानं वागाल ना? दमन तुरुंगांत. मी विचारलं म्हणावं. बेटी, आईला पत्र लिहून कळव हं. ती हिंदुस्थानांत येणार होती. पण आतां— मनोरमाबाई तुमची सून होण्यांत मला किती अभिमान वाटत होता–पण, मला बोलवत नाहीं."

"नॅन्सी," मनोरमाबाई आवंढा गिळून कसेंबसें रडें आवरून म्हणाल्या "तूं माझी सून आहेस बरं. खरंच, माझी तूं सून हं."

नॅन्सीनें पुन्हां रावसाहेबांकडे पाहिलें. तिच्याकडे पहाण्याचें देखील मनोधैर्य त्यांच्यांत नव्हतें. त्यांनीं शशिधरचा हात धरून नॅन्सीच्या हातांत दिला. नॅन्सीनें समाधानानें हंसण्याचा प्रयत्न केला. सभोंवार भीषण शांतता होती. गादीवर पडणाऱ्या अश्रूंचा टपटप असा आवाजही स्पष्टपणें जाणवत होता. नॅन्सी अन्तराळीं कांहींतरी चित्र दिसावें त्याप्रमाणें पाहत होती. अखेरची शक्ति एकवटून तिनें शशिधराला घट्ट धरलें व ती भयभीत होऊन एकदम ओरडली "शशी, शशी, Hold me in your arms. I am going."

शशिधरनें चटकन् तिला आपल्या हृदयाशीं घट्ट धरली व तिच्या गालावर आपलें तोंड ठेवून तो रडूं लागला. मनोरमाबाईंनीं एकदम हुंदका दिला. अनामिकेनेंही एकदम मोठ्यानें रडण्यास प्रारंभ केला. नॅन्सी डोळे गरगर फिरवून शशिधराच्या दृढालिंगनांत निश्चेष्ट झाली.

"नॅन्सी, नॅन्सी," शशिधर तिला आपल्या बाहूंत घट्ट धरून वेड्याप्रमाणें हांक मारीत होता.

रावसाहेबांनीं त्याच्या पाठीवरून हात फिरविला. बेटी नॅन्सीच्या देहाकडे पाहून ढळढळां रडत होती.

"आई, आई, नॅन्सी मला टाकून गेली का ग?" शशिधर मोठ्यानें आक्रोश करूं लागला.

थोड्याच वेळांत हॉस्पिटलजवळच असलेल्या चर्चची घंटा वाजूं लागली. दवाखान्याच्या पोर्चमध्यें शवाला नेणारी ॲम्ब्युलन्स गाडी उभी होती. कॉटच्या बाजूला उभी असलेली नर्स खिन्न मुद्रा करून रोग्याच्या इतिहासाचा तक्ता पूर्ण करीत होती. दवाखान्यांत कॉट शिल्लक नसल्यामुळें नुकताच आलेला रोगी पलीकडच्या गार्डीत असह्य वेदनांमुळें विव्हळत होता. रात्रपाळीची वेळ झाल्याची सूचक घंटा झाल्यामुळें आपल्या कामावर जाणाऱ्या नर्सची दवाखान्याच्या व्हरांड्यावर ये जा चालली होती. बराच वेळ झाला तरी प्रेत बाहेर आणीत नाहींत म्हणून मोटार ड्रायव्हरनें दोन तीन वेळां शिंग वाजविलें.

अजूनही नॅन्सीचें मस्तक आपल्या मांडीवर घेऊन शशिधर तिच्या निस्तेज चेहऱ्याकडे पाहून सारखा अश्रू गाळीत होता.

---

# १३

त्या दिवशीं दमन बंदिशाळेंतून मुक्त व्हावयाचा होता. पहांटेच्या सुमारास आपल्याला फांसावर चढविण्याकरतां पहारेकरी उठवित आहेत असें भयंकर स्वप्न पाहून तो दचकून जागा झाला. कोठडीच्या खिडकींतून चंद्राचें स्वच्छ चादणें त्याच्या अंगावर पडलें होतें. चटकन् उठून त्यानें साशंकपणें सभोंवार पाहिलें; पण त्या कोठडींत कुणींच नव्हतें. मात्र एकदोन उंदीर उड्या मारून खिडकींतून पळून जातांना त्यानें पाहिले. तुरुंगांत देखील चोरी करणाऱ्या त्या उंदरांची त्याला कींव आली. जीवितासाठीं धडपडणाऱ्या क्षुद्र उंदराचा विचार करतां करतां त्याला मनुष्याच्या जीविताच्या धडपडीबद्दल वैषम्य वाटलें. केवळ स्वप्नांत आपल्याला फांसावर नेताहेत असें पाहून आपण किती दचकून उठलों या विचारानें त्याला हंसूं आलें व अजूनही आपला जीविताचा लोभ तितकाच दृढ आहे याची स्पष्ट जाणीव त्याला झाली व आपल्या मानसिक दौर्बल्याबद्दल क्षणभर त्याला विषाद वाटला.

आज आपण दोन वर्षांनंतर ह्या भव्य भिंतीच्या बाहेर पडणार या विचारानें तो अतिशय अस्वस्थ झाला. बंदिशाळेंतील आपले सोबती किती दुःखी होतील, आपल्या गळ्याला मिठी मारून ते रडतील आणि आपण त्यांना तसेच सोडून बाहेरच्या वातावरणांत जाणार या कल्पनेनें त्याला वाईट वाटलें. एक वेळ कांहींतरी गुन्हा करून इथेंच पुन्हां निदान वर्ष सहामहिने काढावे असा विचारही क्षणभर त्याच्या मनांत येऊन गेला. ‘ दमन, ’ अशी आईची खिडकीवाटे हांक ऐकल्याचा भास होऊन त्यानें चटकन् फिरून मागें पाहिलें. सर्वत्र शांतता होती. चांदण्यामुळें कोठडीच्या भिंतीवर, येरझाऱ्या घालणाऱ्या पहारेकऱ्याची छाया पडली होती. सभोंवार गर्द झाडींत रानकिडे सारखे किरकिरत होते.

कदाचित् एव्हांपासूनच आपली आई व अनामिका तुरुंगाच्या दारावर उभ्या असतील. बहुतेक शशिधरदेखील नॅन्सीबरोबर आपलें स्वागत करण्याकरतां आला असेल व ताई कशी घाईघाईनें आपल्याला सर्व बातम्या सांगेल इत्यादि मधुर कल्पनांमुळें उत्कंठेनें तो क्षणभर अस्वस्थ झाला. शशिधरच्या विवाहामुळें जर त्याला त्याच्या आप्तेष्टांना अंतरावें लागलें असेल तर कुणीतरी धीर देण्यास जवळ असावा म्हणून तो आपली चातकाप्रमाणें वाट पहात असेल. अनामिकेचा पुन्हा कुठेंतरी प्रेमसंबंध जडला असेल इत्यादि सुंदर कल्पनाचित्रें तो आपल्या मनःचक्षूसमोर पहात होता.

पण एकदम त्याच्या मनांत निराळेच विचार येऊं लागले. न जाणो कदाचित् विपरीत प्रकार आपल्याला ऐकावे लागतील अशी त्याला भीति वाटूं लागली. दोन महिन्यांपूर्वी आलेल्या अनामिकेच्या पत्राची त्याला स्मृति झाली. तिनें लिहिलें होतें, "दादा बाहेरच्या जगांतील असह्य धडपड वर्णन करून तुरुंगाच्या आंतील तुझ्या मनःस्वास्थ्यांत मी व्यर्थ बिघाड कशाला आणूं?"

दमन पुन्हां आपल्या कार्याची रूप-रेखा आखूं लागला. जगांत होणारा अन्याय्य छळ, वैयक्तिक स्वार्थासाठीं अगणित प्राणिमात्राचे होणारे अतर्क्य हाल इत्यादि प्रकारचीं स्वार्थ-मूलक पापें नाहींशीं करण्याकरतां आपण सर्वस्व अर्पण करणार आहों अशा आत्मविश्वासानें तो बिछान्या-वरून उठला.

बंदुक खांद्यावर टाकून पहारेकरी येरझाऱ्या घालीत होता.

"हवालदार, अबी वख्त क्या होगा?"

"कोन! दमनभाई! अबी तो पांच बजे. अभी थोडी देरसे फजरमें आप खुला हो जायेंगे."

"हां जरूर, सब हवालदार भाईकों मेरा सलाम बोलो."

"अच्छा भय्या," हवालदार खिडकीपाशीं उभा राहून म्हणाला, "आपके माफीक सच्चा आदमी ये जेलमें कभी आया नहीं, ना कभी मैंनें देखा."

दमननें दीर्घ निश्वास सोडला. खिडकीच्या गजाला धरून त्यानें बाहेर पाहिलें. पूर्व दिशेला तांबडें फुटत होतें. दूर अन्तरावर कुठें तरी कोंबडा आरवत होता. पलीकडच्या कोठडींतील कैदी मधुर स्वरांत भूपाळी गात होता. पहांटेची शीतल वाऱ्याची झुळूक किती तरी आल्हादजनक वाटत होती.

त्यानें समोरच्या देखाव्याकडे पाहून उत्साहानें दीर्घ श्वास घेतला. तुरुंगांतून बाहेर पडतांच आपल्या ध्येयप्राप्तीसाठीं पुन्हां धडपड करायची असा त्यानें मनाशीं निर्धार केला. पण त्याच्या मनःचक्षूपुढें क्षणमात्र कमलेची मूर्ति उभी राहिली व चटकन् रुबीही आपल्या गळ्याभोंवतीं आपल्या मृदुल बाहूंची मिठी घालीत असल्याचा त्याला भास झाला. दोघीही आयुष्यांतील सोबतिणी म्हणून दमनला त्यांच्याविषयीं केवढ्या अपेक्षा होत्या. त्यांचे विवाह झाले आणि आपण एकटेपणानें आपल्या आयुष्याचा मार्ग आक्रमण करतों आहों.

साऱ्या तुरुंगांतील जीवनांत स्त्री–सहवासाची न्यूनता त्याला कधींच वाटली नव्हती; पण आज अखेरच्या घटकेला त्याच्या मनानें अशा प्रकारें अस्वस्थ व्हावें याचें त्याला सखेद आश्चर्य वाटलें. बंदिशाळेंत राहून आपण स्त्रीवर्गाला विसरून गेलों होतों. रुबी आणि कमला यांच्या अनुदार वर्तणुकीमुळें आपण अगदीं न कळतच स्त्रीजातीबद्दल हृदयांत तिरस्कार वागवित होतों. पण आज ही स्त्री–सहवासाची लालसा मनांत कां उत्पन्न व्हावी याबद्दल त्याला विषाद वाटत होता.

दमनच्या मनांतील विचारमालिका तशीच अखंड चालू राहिली असती, पण पाठीवर कुणीतरी हात ठेवतांच त्यानें मागें पाहिलें. पहांटेच्या प्रहरला आपल्या कोठडींत शिरणारा हा चोर कोण म्हणून त्यानें निरखून त्याच्या तोंडाकडे पाहिलें व आश्चर्यानें तो उद्गारला, “कोण जेलरसाहेब, या वेळीं आपण इकडे कुणीकडे ?”

“आमच्या घरीं दोन वर्षें राहिलेल्या पाहुण्याला निरोप देण्याकरतां मी आलों आहे.”

"जेलरसाहेब," दमन कृतज्ञ बुद्धीनें म्हणाला, "खरोखरच तुमच्या पाहुणचारानं मी बाहेरच्या जगाला पार विसरलों आहे. गुन्हा केल्या-शिवाय पुन्हां आंत येतां येणार नाहीं म्हणून माझा नाइलाज आहे."

"भय्या, अगदीं अनुभवानं बोलायचं तर ह्या तुरुंगाच्या भिंती जगाच्याच सभोंवार घातल्या पाहिजेत. बहुतेक सर्व कैदी साऱ्या समाजानं मान्य केलेल्या पद्धतीनें गुन्हा न करतां आपलं वैशिष्ठ्य दाखवायला गेले म्हणूनच आज चक्की फिरवताहेत, खडी फोडताहेत. दमन, ह्या स्वार्थी जगाच्या सुखासाठीं तुम्ही आपल्या सर्वस्वाची अशी होळी कां करतां?" जेलरनें कळकळीनें प्रश्न केला.

"जेलरसाहेब, तुमचा समज चुकीचा आहे. मी खरोखरच दुःखी नाहीं. मला माझं कार्य करतांना खरोखर किती सात्विक आनंद होतो याची तुम्हाला कल्पना नाहीं. साऱ्या समाजानं ठरविलेल्या सुखशोध-नाच्या मार्गाचा अवलंब मी करीत नाहीं म्हणूनच का मी दुःखी आहे? पण जर मी माझी ध्येयनिष्ठा सोडीन तर मात्र अतिशय दुःखी होईन असं मला वाटतं. कर्तव्यकर्म करीत असतां पुन्हा पुन्हा तुरुंगांत येऊन तुमचा पाहुणचार भोगण्यांत जो खरा आनंद मला लाभेल तो बाहेरच्या जगांत बिलकुल लाभायचा नाहीं. जगानें मला वेडा ठरविला तरी त्याचं मला वाईट वाटणार नाहीं. कारण सारं जग ज्या सुखाकरतां एका मार्गानं धडपडतं आहे त्याच सुखाकरतां मी दुसरा मार्ग स्वीकारला आहे. सुखाची कल्पना केवळ सापेक्षच आहे ना?"

"पण दमन, तुमच्या मार्गानं जागतिक सुधारणा होईल असं तुम्हांला वाटतं का? शिवाय मनुष्यानं स्वसुखाकरतां धडपडतांना मानव-जातीच्या सुखाला हातभार नको का लावायला?"

"तेंच मी सांगतों आहें. मानवसुखाकरतां धडपड करण्यांतच मी माझा खरा आनंद उपभोगित आहे. एकमेकांना लुटण्याचा प्रयत्न करून आपल्या वैयक्तिक सुखाचाच मनमुराद अनुभव घेण्याचा प्रयत्न कर-णाऱ्या स्वभावाशींच आमचा झगडा चालू आहे." दमन क्षणभर स्तब्ध राहिला.

कैद्यांना उठविण्याची घंटा होत होती.

जेलर कांहीं वेळ त्याच्या तेजस्वी मुद्रेकडे पहात होता. त्यानें त्याचा हात आपल्या हातांत घेऊन प्रेमभरानें म्हटलें, " दमनभय्या, आतां कधींही मुंबईहून इकडे आलां तर आमच्या घरीं आल्याशिवाय परत जायचं नाहीं. "

" जेलरसाहेब, " दमन खिन्नपणें हंसून म्हणाला, " मी अतिशय आभारी आहें. बहुतेक लवकरच मी परत इथं येईन म्हणतों. ह्या तरुंगांतील दाट अंधःकारांत माझ्या हृदयांत सारखी तेवत राहिलेली ध्येयज्वाला माझ्या अंगाचा दाह करते आहे. कित्येक वेळां माझ्या हृदयाचा एवढा भडका होतो कीं मला जर एखाद्या सैतानाचं सामर्थ्य असतं तर हें सारं जग एका क्षणांत उध्वस्त करून टाकलं असतं. खरंच हा मानवप्राणी एका स्वार्थी इच्छेमुळें एवढा हीन झाला आहे कीं ज्या तुरुंगांत आपली म्हणून एक कवडीसुद्धां नाहीं तेथें देखील औटघटकेच्या मालकीसाठीं एकमेकांच्या नरडीचा घोट घेण्यास तयार होतो. यामुळें साऱ्या मानवजातीबद्दल अतिशय तिरस्कार वाटतो."

दमननें एवढें बोलून दीर्घ निश्वास सोडला. सात्त्विक संतापानें त्रस्त झालेल्या त्याच्या मुद्रेवर औदार्याची छटा स्पष्ट दिसत होती. आपला सारा आवेश व्यर्थ आहे याची जाणीव झाल्यामुळें त्याचा चेहरा एकदम निर्विकार झाला. जेलरकडे स्निग्धपणें पहात मंद हास्य करून तो पुन्हां म्हणाला,

" माफ करा. पुष्कळ वेळां आवेशाच्या भरांत माझा तोल असा भलतीकडेच जातो आणि मी निष्कारण दुसऱ्याच्या भावना दुखवतों. मनांत भावना उचंबळून आल्या कीं दुसऱ्याकडे त्या बोलून टाकल्या म्हणजे समाधान वाटतं. "

कांहीं वेळ कुणींच बोललें नाहीं. शेवटीं जेलर कळकळीनें म्हणाला, " दमन, पुष्कळ वेळां तुमच्या भाषणाचा पुरा आशयदेखील मला समजत नाहीं. "

दमन उदासपणें जमिनीकडे पहात म्हणाला, " जेलरसाहेब, मला कळतं आहे कीं मी जरी कितीही महत्त्वाकांक्षेनं उंच भराऱ्या मारल्या तरी दोरीनें जखडलेल्या निर्बल पक्षाप्रमाणं मी शेवटीं जमिनीवरच

आदळायचा. माझ्या ध्येय-प्राप्तीची अशक्यता पूर्णपणें मला समजते आहे. तरी पण त्या निष्फल धडपडीपासून लाभणारा स्वर्गीय आनंद मला उपभोगतां येतो. दीपज्योतीवर झडप घालणाऱ्या पतंगाचं एक वेळ अंग होरपळून तो खालीं पडला तरी चेतना येतांच तो पुन्हा झडप घालूं पहातो, त्याप्रमाणेंच माझ्या प्रयत्नांत कितीही जरी अपयशाचे तडाखे मिळाले तरीसुद्धां मी माझ्या ध्येय-निष्ठेसाठीं धडपडतच प्राण घालवीन."

इतक्यांत जेलरनें शिपायाला सांगितलेला चहा आला. दमननें मुखमार्जन करून त्याचा स्वीकार केला.

चहा घेतां घेतां जेलर पुन्हा म्हणाला, "दमनभय्या, खरोखरच आम्हा तुरुंगांतील नोकर वर्गाला मनुष्यस्वभावाचे सुंदर मासले दिसतात व यामुळें पुष्कळ वेळ सार्वत्रिक अज्ञानाबद्दल विस्मय वाटतो. तुमचे राजकीय कैदीसुद्धां कधीं कधीं किती कपटी, दुराचारी आणि दुर्व्यसनी असतात. पण अखिल देश मात्र त्यांच्या चारित्र्याचे गोडवे गात असतो."

"हो कधीं कधीं असं असतं खरं आणि म्हणूनच मोठ्या लोकांना जवळून पाहूं नये असं म्हणतात." दमन उदासीनतेनें म्हणाला, "कांहीं जन्मतःच मोठे असतात. कांहीं आपल्या मेहनतीनें मोठे होतात. पण कांहीं लोकांवर मात्र पुष्कळ वेळां सभोंवारच्या परिस्थितीमुळें मोठेपणा लादला जातो. शिवाय हें युग जाहिरातीचं असल्यामुळें आपला नगारा जोरानं पिटणाऱ्या क्षुल्लक व्यक्तीला कधीं केवढं देवपण येईल हें सांगतां यावयाचं नाहीं. या दृष्टीनं रसाळ वाणी, विपुल पैसा आणि अनुकूल परिस्थिती यांची आवश्यकता असते. तसंच आमच्या देशाची अध्यात्मिक परंपराच अशी आहे कीं कोणाही व्यक्तीनं स्वार्थत्यागाची भूमिका स्वीकारली कीं आमचा समाज सर्वस्वीं अंध होऊन त्याच्या कृत्याची मुक्त कंठानं केवढी प्रशंसा करील! त्याच्या त्या आत्मयज्ञाच्या बुडाशीं कदाचित् एखादा स्वार्थी हेतु असूं शकेल असें त्याला कालत्रयीं वाटणार नाहीं. आणि जगांतील प्रत्येक उपभोग्य वस्तू आपल्या संपत्तीच्या जोरावर मिळूं लागली म्हणजे मनुष्याला सामाजिक विभूतिमत्व प्राप्त व्हावं असं वाटूं लागतं आणि यामुळें वाटेल तो स्वार्थत्याग तो करीत असतो. ह्या पुढारीपणाच्या मार्गी

आणखीही हेतु असूं शकतो. राजकारण हा एक बुद्धिप्रधान खेळ आहे आणि त्याचं व्यसन एकदां लागलं कीं जुगारी मनुष्याप्रमाणं तो आपली संपत्ती, अब्रू, सदसद्विवेक बुद्धि अगदीं सर्वस्व पणाला लावील व त्यांत कितीही जरी ठेंचा खाव्या लागल्या तरी त्याचा नाद त्याला सुटायचा नाहीं. आणि यामुळेंच देशोदेशीं अनेक राष्ट्र–पुढारी प्रचलीत राजकारणांतून निवृत्त होतां होतां त्यांतच अनेक वर्षें राहिलेले दिसून येतात किंवा त्यांत पुन्हा पुन्हा पडत असतात. राजकारण हा देशाच्या विस्तृत पटावर खेळण्याचा बुद्धिबळाचा डाव असल्यामुळें त्याचा मोह बुद्धिवान माणसांना तसाच बलवान वाटत असतो. श्रीकृष्णाला हा बुद्धिबलाचा डाव त्याच्या बालपणांतच कंसाशीं खेळावा लागल्यामुळें त्याचं सर्वच आयुष्य राजकारणाचे डाव टाकण्यांतच गेलेलं दिसून येतं. असं नसतं तर कांहीं कंजुष, नीच मनोवृत्तीच्या माणसांनीं आपल्या भाकऱ्या खाऊन ही राजकारणाची लष्करी नोकरी केली नसती. जेलरसाहेब, पण कांहीं व्यक्ति मात्र अगदीं उपजत उदारबुद्धीनं मानवसुखासाठीं निरपेक्षपणें धडपड करीत असतात; पण त्यांचं कार्य बहुधा अदृश्यच राहणार आणि कदाचित् इतिहासच त्यांच्या कामगिरीचा त्यांच्या पश्चात् आदरानें उल्लेख करील. समाज आज कदाचित् त्यांची अवहेलना करीत असेल! अशा वेळीं निरपेक्ष कार्य हाच त्यांचा सात्विक आनंद असतो. They are always stoned, tortured and crucified."

दमननें आपलें बराच वेळ चाललेलें भाषण थांबवून खिन्नपणें दीर्घ उसासा टाकला. त्याच्याकडे जेलर अत्यादरानें पहात होता. उगवत्या सूर्याचे मृदु किरण आंत पडले होते.

इतक्यांत पुन्हा घंटा झाली. सर्व कैदी आपल्या कोठडींतून बाहेर पडून कामावर रुजू होत होते. दमनकडे दृष्टी जातांच प्रत्येकजण प्रेमानें त्याला नमस्कार करीत होता. दमनही व्याकुळ होऊन त्यांच्याकडे स्निग्धपणें पहात त्यांचा निरोप घेत होता. शेवटच्या दिवशीं दमनची खरी योग्यता समजली या जाणीवेमुळें जेलर सारखा त्याच्याकडे कुतूहलानें पहात होता. शेवटीं नाइलाजानें तो उठून उभा राहिला व प्रेमार्द्र दृष्टीनें त्याच्याकडे पहात म्हणाला, "चला, Discharge Certificate वर सही

करून आपलं सामान ताब्यांत घ्या. तुमचा सहवास घडला हें मी माझं भाग्य समजतों."

दमन निमूटपणें बाहेर पडला. बाजूला एक पठाण खुर्चीं विणीत बसला होता. एकदम धांवत येऊन दमनच्या गळ्याला दृढ मिठी मारून तो रडूं लागला.

"उस्मान, क्यों रोते हो? भाई, तुम भी जलदी छूट जायेंगे." दमन त्याच्या पाठीवर थोपटीत म्हणाला.

"बाबूजी, लेकिन इसके बाद आपकी सुरत कब देखने मिलेंगी? आवंढा गिळून त्यानें पुन्हा विचारलें.

"मैं बंबईमें जरूर तुमकु मिलूंगा. फिकर मत करो."

"अच्छा बाबूजी; खुदा आपका भला करो." पठाणानें रडें आवरून मिठी सोडली.

दमन बंदिशाळेच्या ऑफिसांत आला तों शकुन्तलाबाई व अनामिका आंत बसल्या होत्या. त्यानें धांवत जाऊन आईला दृढ मिठी मारली व एका हातानें अनामिकेला जवळ ओढून तो अश्रुमोचन करूं लागला. शकुन्तलाबाईच्या व अनामिकेच्याही डोळ्यांतून घळघळ आनंदाश्रू वहात होते.

"आई," दमन आवंढा गिळून सद्गदितपणें म्हणाला," मला ह्या तुरुंगांतून बाहेर पडतांना किती वाईट वाटत आहे!"

शकुन्तलाबाई प्रेमानें त्याचा मुका घेऊन रडें आवरीत म्हणाल्या, "दमा, तुझ्या असल्या बोलण्यानं आईच्या ब्रह्मानंदांत असं मीठ कालवूं नकोस. दमा, तुझं बारसं केल्याचा आनंद आज मला होतो आहे."

"आई," दमन गहिंवरून म्हणाला, "साऱ्या जगानं जरी मला झिडकारलं तरी तुझ्या मिठीचा आसरा असेपर्यंत मी कधींच डगमगणार नाहीं."

अनामिका त्याच्या सदऱ्याच्या गुंड्यांशीं चाळा करीत स्वस्थ उभी होती. इतक्यांत कांहींतरी आठवण झाल्याप्रमाणें ती एकदम म्हणाली, "दादा, शशिधरनीं तुलीं बेळगांवला बोलावलं आहे. तुला—"

बोलतां बोलतां ती एकदम थांबली. दमन तिच्याकडे भाषणाच्या अपेक्षेनें पाहूं लागला.

"शशी कुठं आहे? त्याचं कॉलेज सुरू नाहीं का झालं? ताई, त्याचा विवाह झाला का?

अनामिका कांहींच बोलली नाहीं एवढ्यांत जेलरनें discharge certificate पुरें केलें व दमनची सही होतांच हस्तान्दोलन करीत तो प्रेमानें म्हणाला, "दमनभय्या, परत मी तुम्हाला इथं घेणार नाहीं हं! गुड बाय."

"गुड बाय." दमन त्याच्या भाषणाचा रोख ओळखून म्हणाला, "दुसऱ्या खेपेस मी सेंट्रल जेलमध्यें जाईन. जेलरसाहेब, खरोखरच मी तुमचा आभारी आहे. नमस्कार, येतों."

तीं तिघेंही बंदिशाळेच्या बाहेर पडलीं. समोर नवीनच मोटार उभी होती.

"ताई, ही कुणाची मोटार?"

"दादा, कंपनीची ती. मी सिनेमांत काम करतें."

"ताई!" दमन एकदम उभा राहून आश्चर्यानें म्हणाला.

"खरंच दादा, पुढल्या महिन्याला माझं पहिलंच चित्र लागणार आहे. "अनाथ" (Orphans) हें नांव आहे त्याचं. दादा, मी कंपनीच्या डायरेक्टरला अटच घातली आहे कीं सामाजिक चित्रपटाशिवाय मी कोणत्याच चित्रपटांत काम करणार नाहीं आणि चित्रपटही कोणत्या तरी सामाजिक सुधारणेसाठीं तयार केला पाहिजे."

"ताई" दमन हंसत म्हणाला, "पण तुझ्यासारखी रूढीप्रिय मुलगी सिनेमासृष्टींत पाऊल टाकण्याचा विचारदेखील करील असं मला वाटलं नव्हतं."

"दादा, खरंच मी आईचंसुद्धां ऐकलं नाहीं."

"बरं केलंस" दमन प्रेमानें आईकडे पहात म्हणाला, "कुठल्याहि कार्यांत आईचा आशीर्वाद घ्यायचा. सल्ला कधींच विचारूं नकोस."

शकुन्तलाबाई अश्रूंनीं भरलेल्या नेत्रांनीं त्याच्याकडे स्निग्धपणें पहात म्हणाल्या, "दमा, ईश्वर तुझं कल्याण करो."

"आई, जोंपर्यंत मी सदाचरणानें आणि सद्हेतूनें वागतों आहे तोंपर्यंत ईश्वर आहे कीं नाहीं याची चौकशी करण्याची मला कांहींच गरज वाटत नाहीं. कारण तो जर न्यायी असला तर आम्हां सर्वांचं कल्याण करणं त्याला भाग आहे. आई, देवाचा धांवा करून आणि दोन्ही हात जोडून आपल्या दुष्कर्मांबद्दल शासन चुकविण्याच्या आचरट समजुतीनें वागणाऱ्या लोकांनीं आपल्या मानसिक स्वास्थ्यासाठीं ईश्वराच्या अस्तित्वाचा आसरा घेतला आहे. पण खरंच आई, देव असला तर तो एक बडा वरिष्ठ न्यायाधीश असेल, पण दयाळू मात्र खास असणार नाहीं. कारण मानव प्राणी इतका हीन वृत्तीचा आहे कीं हजारों लोकांच्या माना चराचर चिरून मग पुन्हां देवळांत टाळ कुटून परमेश्वराकडे क्षमेची याचना करायला त्याला बिलकुल शरम वाटत नाहीं. आणि तो खरोखरीच जर दयाळू असेल तर या पृथ्वीवर पापाची पैदास किती भयंकर होईल याची कल्पना-सुद्धां करतां येणार नाहीं."

"दादा" अनामिका लडिवाळपणें मध्येंच म्हणाली, "तुरुंगांतून तुझी आतां वेड्याच्या इस्पितळांत रवानगी केली पाहिजे. तत्वज्ञानाशिवाय तुला बोलतांच येत नाहीं का रे ? मला वाटतं, तुरुंगांत तुला व्याख्यानं द्यायला मिळालीं नव्हतीं. पण आई, या खेपेला दादाची प्रकृति किंचित् सुधारलेली दिसते; नाहीं ग ?"

"बरं ताई, पण तूं चित्रपटांत कसलं काम केलं आहेस ? राजाची राणी झाली आहेस, का प्रियकर आणि प्रेम याशिवाय जगांत कांहीं एक न दिसणारी बड्या जहागिरदाराची, उल्लू वृत्तीची कॉलेजकन्या झाली आहेस ?"

"साफ चुकलास," अनामिका त्याला चिडवीत म्हणाली, "माझं काम असं आहे. मी एक गरीब म्हाताऱ्या वृद्ध मजुराची सुंदर मुलगी आहे व एका खाणींत गुलामाप्रमाणं काम करणाऱ्या सौंदर्यशील, उदार तरुणाची प्रियतमा आहे. त्याला रोज दुपारच्या सुटीच्या वेळीं मी

शिदोरी घेऊन जात असतें. त्या खाणीच्या मालकाचा एक कॉलेजमधील नादान, व्यसनी, दुराचारी, मुलगा असतो. त्याची वाईट नजर माझ्यावर असते. एके दिवशीं संधि साधून नायिकेचा विनयभंग करण्याचा तो प्रयत्न करतो. नायिका मदतीसाठीं ओरडते तेव्हां तो नायक येतो आणि त्या भांडवलशाहीच्या खलपुरुषाला यथेच्छ मार देतो. अर्थात् मग त्या नायकाला भांडवलशाहीचे इतर भागीदार ठार मारतात आणि खाणींत खडक पडून मेला म्हणून सांगतात व मग ती नायिका जीव द्यायला जाते."

दमन तिचें भाषण हंसत ऐकत होता. अनामिका आपली थट्टा करते आहे हें न समजल्याप्रमाणें भासवीत तो म्हणला, "खरंच असे चित्रपट झाले पाहिजेत. ताई, कथानक पण तूंच लिहितेस वाटतं. पण ताई, शशी कुठं आहे ? त्याचा विवाह झाला का ?"

अनामिकेचा चेहरा एकदम खिन्न झाला. तिनें शकुन्तलाबाईंच्या चेहऱ्याकडे पाहिलें. तों त्यांच्याही मुद्रेवर कारुण्य दिसलें.

"आई, त्यांचा विवाह नाहीं का झाला ? खरं काय तें सांगा ना !" दमन आग्रहानें म्हणाला.

"दमा, नॅन्सी आपल्या आईला भेटण्याकरतां विलायतेला गेली आणि त्यानंतर शशिधरला तिनें पत्रच पाठविलें नाहीं. कोणी म्हणतात कीं ती तिकडेच मरण पावली."

हें सांगतांना शकुन्तलाबाईंच्या चेहऱ्यावर जरी व्यग्रता दिसली तरी कांहींतरी असत्य भाषण त्या करीत असाव्या हें त्यानें तात्काळ ताडलें.

"आई, खरं का हें ?" तो आर्जवानें म्हणाला.

"दमा," शकुन्तलाबाई दाटलेल्या स्वरांत म्हणाल्या, "नॅन्सी बेळगांवला अपघातानं मरण पावली."

"काय ?" दमन दचकून उद्गारला.

तिचा कुणीतरी घात केला असावा. कदाचित् तिच्यावर विषप्रयोग झाला असेल किंवा तिनें आत्महत्त्या केली असेल, अशा अनेक कल्पना त्याच्या दृष्टीपुढें क्षणार्धांत चमकून गेल्या.

" दादा, " अनामिका गहिंवरून म्हणाली, " नॅन्सी आणि शशिधर बेळगांवाहून आंबोली घाटांत शिकारीला गेलीं होतीं. तेथें रानडुकरानें तिला भोंकसल्यामुळें ती एक दिवसानंतर दवाखान्यांत वारली. त्यांचा विवाह व्हावयाचा होता आणि तेवढ्यांतच हा अपघात झाला. मी गेलें होतें त्या वेळीं. "

दमनची विचारशक्ति बराच वेळपर्यंत सुन्न झाली होती. मोटारच्या बाहेर तो शून्यपणें पहात होता. त्याच्या डोळ्यांतून अश्रूंचे ओघळ खालीं आले. आवंढा गिळून त्यानें अश्रू पुसले.

मोटार भरधांव स्टेशनकडे मार्ग आक्रमित होती. दमन हताशपणें समोर पहात विचार करीत होता.

दैव म्हणून मनुष्याच्या मार्गांत कांहीं तरी शक्ति आहे आणि ती प्रतिकूल असली कीं कधीं कधीं मनुष्यानें कितीही प्रयत्न केले तरी कर्तृत्ववान् प्राण्यालाही हतबुद्ध होऊन आपल्या कृतकार्याचा नाश स्वतःच्या डोळ्यानीं पहावा लागतो आणि आयुष्याच्या रूपरेखा क्षणार्धांत नाहींशा होतात. मनुष्य हा प्राणी एका विवक्षित मर्यादेपर्यंतच धडपडूं शकतो. सभोंवारची सामाजिक, राजकीय, आर्थिक आणि आधिभौतिक परिस्थिती यामुळें त्याला ठराविकच मर्यादा असतात व त्यापलीकडे जाण्याचा त्यानें कितीही प्रयत्न केला तरी तो निष्फल आहे. आणि म्हणूनच एका कालचे जगद्मान्य विद्वान कर्तबगार पुरुष यांची कृति कालान्तरानें क्षुल्लक व निरर्थक वाटते आणि त्याच्या त्रिकालाबाधित वाटणाऱ्या कार्याला भविष्यकालीन इतिहासकार कदाचित् नामनिर्देषापेक्षां फारसें महत्व देत नाहींत.

दमनच्या विचाराचा ओघ किती तरी वेगानें धांवत होता. क्षणार्धांत त्याचें मन शशिधरला चार सांत्वनपर गोष्टी सांगण्यांत गर्क झालें होतें. तो आपल्याला भेटतांच स्फुंदून रडेल. नॅन्सीच्या अपघाताचें वर्णन करून दवाखान्यांत तिचा हृदयद्रावक अन्त कसा झाला हें सांगेल, आणि आपल्याला आतां या जगांत क्षणभरही राहण्याची इच्छा नाहीं, असें तो बोलून दाखवील याची त्याला पूर्ण कल्पना होती.

मोटर स्टेशनवर उभी राहिली तेव्हां तो विचारतंद्रींतून एकदम जागा झाला.

" आई, मी बेळगांवला जातों. "

शकुन्तलाबाई मुग्धपणें त्याच्याकडे पाहूं लागल्या. मातृवात्सल्यामुळें लाडक्या बाळाला तुरुंगांतून सुटतांच पुन्हा आपल्यापासून दूर पाठविण्यास त्यांचें मन तयार होईना. पण 'आज जाऊं नकोस, उद्यां जा' असें म्हणण्याचें धैर्यही त्यांना होईना. त्यांच्या केविलवाण्या मुद्रेंत त्यांच्या हृदयांत चाललेली कालवाकालव प्रतिबिंबित झाली होती. दमनच्या चतुर बुद्धीला मातृहृदयाच्या यातना समजून तो शकुन्तलाबाईकडे दयार्द्र दृष्टीनें पहात म्हणाला,

"आई, शशी माझी चातकाप्रमाणें वाट पहात असेल. या वेळीं मी एक घटकाही त्याच्यापासून निरर्थक दूर घालविली तर मी पापी आणि दुबळा ठरेन. माझ्या स्वार्थी, दुबळ्या मनोवृत्तीबद्दल मला नेहमीं लाज वाटत राहील. "

स्टेशनच्या पलीकडच्या प्लॅटफार्मवर बेळगांवला जाणारी गाडी उभी होती.

"मग जा तर." शकुन्तलाबाई गहिंवरून त्याच्या पाठीवरून हात फिरवित म्हणाल्या.

" आई, मी एकदोन दिवसांत शशीला घेऊन येतो हं. ताई, तूं येतेस का? पण नको, तूं आईबरोबर रहा. बरं तर मी जातों हं." असें म्हणून धांवत जिना चढून तो दुसऱ्या प्लॅटफार्मवर गेला.

शिपायानें घंटा दिली. गाडीची शिटी वाजली. शकुन्तलाबाई व अनामिका अलिकडच्या प्लॅटफार्मवर उभ्या राहून हळूहळू पुढें जाणाऱ्या गाडीकडे पहात होत्या. दमन डब्याच्या दारांत उभा राहून हात रुमाल हालवित त्यांचा निरोप घेत होता. एवढ्यांत समोरच्या रुळावर मुंबईस जाणारी गाडी आली व पलीकडचें दृश्य दिसेनासें झालें.

———

# १४

दमन बेळगांवला रावसाहेबांच्या घरीं गेला तेव्हां दिवाणखान्यांत मनोरमाबाई खुर्चीवर बसून कांहींतरी शिवीत होत्या. त्यांनीं एक दोन वेळां मुंबईस त्याला पाहिला असला तरी तुरुंगांतून नुकताच बाहेर आलेला दमन त्यांना ओळखणें शक्य नव्हतें. दमनच्या चेहऱ्यावरील व्यग्रता आणि प्रवासामुळें मलीन झालेला सारा पेहराव बघून त्या क्षणभर मनांत चरकल्या.

"शशी कुठं आहे?" दारावरूनच त्यानें उतावळेपणानें विचारलें.

"तुम्ही कोण?"

"काकी, मी दमन."

"कोण दमन!" मनोरमाबाई आश्चर्यानें उद्गारल्या. पुढें होऊन त्याच्या चेहऱ्याकडे पहातांना त्यांच्या डोळ्यांत पाणी आलें व कंठ सद्गदित होऊन त्या वात्सल्यानें त्याच्याकडे पाहूं लागल्या.

"काकी, शशी कुठं आहे?" दमननें पुन्हां उत्सुकतेनें प्रश्न केला.

मनोरमाबाईनीं आंवंढा गिळला व घसा साफ करून त्या म्हणाल्या, "दमन, शशीनं तुझाच ध्यास घेतला आहे. डॉक्टर म्हणतात कीं त्याला Melancholia झाला आहे. कुणाशीं बोलत नाहीं, कुठें जात नाहीं. कोणी भेटायला आलं तर दडण्याचा प्रयत्न करतो. धड कांहीं खात नाहीं. मात्र तूं कधीं येणार याची रोज चौकशी करीत असतो. यांनीं पत्र पाठवून तुझ्या सुटकेची चौकशी पण केली होती. माझा बाळ शशी—"

मनोरमाबाई हुंदके देऊन रडूं लागल्या. दमनला त्यांची अतिशय दया आली. शशिधरला भेटण्याकरितां तो अतिशय उत्सुक झाला होता.

"शशी वर का आहे?"

मनोरमाबाईनीं डोळे पुशीत होकार देतांच तो सरळ वर गेला. त्यानें सभोंवार पाहिलें तो शशिधर खिडकींतून समोरच्या मावळत्या सूर्या-कडे पहात बसला होता.

दमन क्षणभर दारावरच स्तब्ध उभा राहिला. तो शशिधरच असें त्याला वाटेना. कारण तो कृश झाल्यामुळें त्याची शरीरयष्टी अधिकच उंच दिसत होती. केंसाचा नेहमीं दिसणारा भांग जाऊन त्याचे केंस अस्ता-व्यस्त व रुक्ष दिसत होते. हवेंत विशेष गारठा नसला तरी त्यानें अंगांत स्वेटर घातला होता. धोतराचा सोगा त्याच्या पायांखालीं रुळत होता.

दमन त्याच्या अगदीं जवळ गेला. तरी देखील शशिधरला त्याची जाणीव झाली नाहीं. दमनच्या तोंडांतून शब्द फुटेना. मोठ्या कष्टानें त्यानें हांक मारली.

"शशी!"

शशिधरनें भ्रमिष्टाप्रमाणें क्षणभर त्याच्याकडे पाहिलें व झटकन् त्याला मिठी मारून तो ओक्साबोक्शीं रडूं लागला. मनोरमाबाई दारांत उभ्या राहून अश्रू गाळीत होत्या.

बराच वेळ दमन कांहींच बोलला नाहीं. दुःखाचा दाब रडून कमी होईल म्हणून तो अगदीं स्तब्ध होता.

इतक्यांत आचाऱ्यानें दमनसाठीं चहा व फराळाचे पदार्थ आणून ठेवले.

"शशी, तुझ्यासारख्याला हें शोभत नाहीं." दमन त्याची पाठ थोपटीत म्हणाला.

मनोरमाबाई आवंढा गिळून मागें फिरल्या.

"शशी, खरंच मला तुझं आश्चर्य वाटतं. किती निरर्थक तूं आपलं आयुष्य घालवतो आहेस? नॅन्सीबद्दल वाटणाऱ्या तुझ्या प्रेमाचा हाच का पुरावा? आतां तूं प्राण ओतलेस म्हणून ती तुला परत मिळेल का? शशी, तुला जीव नको असेल तर आत्मयज्ञ करण्याकरितां किती तरी सात्विक आणि उदार मार्ग आहेत! एखाद्या अडाणी माणसाप्रमाणं शोक करण्याची दुर्बुद्धि तुला कशी झाली? हालअपेष्टा तुला भोगायच्या

असतील तर जगांत गांजलेल्या अनेक दीनदुबळ्यांना मदत करण्यांत आपला देह झिजव. असला त्याज्य मार्ग कां पत्करतोस? सभोंवारच्या जगाकडे दृष्टि फिरव आणि सांग, तुला असंच एकलकोंडेपणानं रडत बसतांना समाधान वाटतं का?"

"दमन," शशिधर व्याकुळ होऊन म्हणाला, "नको, असं बोलूं नको. मला सभोंवारच्या जगाची भीति वाटते. मॅन्सीशिवाय मला बिलकुल जगतां यावयाचं नाहीं. दमन, तिच्यावांचून मी अगदीं तडफडतों आहे."

तो कोचावर डोकें ठेवून रडूं लागला.

प्रणयी जनांच्या करुणाजनक व दुःखपर्यवसायी गोष्टी दमननें वाचल्या होत्या, ऐकल्या होत्या आणि सिनेमांत पाहिल्या होत्या. परंतु त्यांत प्रेमभावनेची अनाठायीं अतिशयोक्ति करून मानवाच्या मनोविकारांचें मानसशास्त्रदृष्ट्या असंभवनीय घातक चित्र रंगविलेलें असतें व वाङ्मयांतूनही प्रेमभावनेचें फाजील महत्व वाढवून अनेक भावनाप्रधान तरुण-तरुणींना प्रेमभंगानंतर आत्मघात करण्याची बुद्धि त्या लेखकांनींच दिली आहे असें तो पुष्कळ वेळां प्रतिपादन करीत असे. परंतु आज शशिधर-सारख्या सुशिक्षिताचा दुःखावेग, त्याची ती केविलवाणी स्थिति आणि जीविताबद्दल नैराश्य पाहून प्रणयी जनाचें खरें स्वरूप आपल्याला समजलेंच नव्हतें असें त्याला वाटूं लागलें.

विचाराचा ओघ थांबवून तो म्हणाला, "शशी, प्रेमवस्तूच्या नाशाबरोबर तुझ्यासारख्या समंजस माणसाला ही जीवननौका आजच्या विरुद्ध दिशेला नेतां येत नाहीं का? अरे, नॅन्सी जर आज एखाद्या अभेद्य तटामागें असती तर तूं जीविताच्या अंतापर्यंत सर्व शक्ति एकवटून तो तट उखडून टाकण्यासाठीं आटोकाट प्रयत्न केला असतास! पण तोच उत्साह आज तुझ्या ठिकाणीं नसावा ना? शशी, मनाला हें उदात्त तत्वज्ञान शिकविण्याचा तूं कां बरं प्रयत्न करीत नाहींस? आज नॅन्सी जिवंत असती तर आपल्या दुबळ्या शशीबद्दल तिला किती वाईट वाटलं असतं?"

दमन पुन्हां विचार करूं लागला. नॅन्सीच्या आकस्मिक मृत्यूमुळें त्याला हा धक्का भयंकर वज्राघातासारखा वाटला असेल. ती रुग्णशय्येवर वर्ष सहा महिने पडली असती आणि रोग अगदीं असाध्य होऊन कालान्तरानें तिचा वियोग झाला असता तर कदाचित् शशिधरला एवढेंच दुःख झालें असतें. पण त्याची आजची मनोवृत्ति मात्र खास दिसली नसती. यापेक्षांही त्याचा विवाह होऊन कांहीं कालावधि लोटल्यानंतर नॅन्सी जर एखाद्या रोगामुळें कालवश झाली असती तर त्याचा आजचा मानसिक दृष्टिकोन खास बदलला असता.

विचाराच्या ओघांत त्याला आंग्ल कवि रॉबर्ट ब्राउनिंगचीं आठवण झाली. खरा प्रेमविवाह म्हणून ज्याच्या संसाराकडे आपण अनेक वर्षें पहात आलें तो कवि ब्राउनिंगसुद्धां पत्नीनिधनानें हताश झाला नाहीं, याचें कारण तिच्याशीं विवाह करतांनाच त्याला तिच्या आजाराची आणि भवितव्याची कल्पना होती. नॅन्सीचा मृत्यु असा अपघातानें झाला नसता तर शशिधरलाही एवढा जबरदस्त मानसिक धक्का बसला नसता असें त्याला वाटलें.

शशिधर विवेकशून्य होऊन समोरच्या आकाशाकडे पहात होता. डोळ्यांतून वहाणाऱ्या अश्रूंचे ओघळ त्याच्या गालावर सुकत होते. दोन्ही हातांचीं बोटें एकेमकांत अडकवून त्यावर आपली हनुवटी आधारून तो अन्तरावरून जाणाऱ्या येणाऱ्या आगगाड्यांकडे पहात होता.

दमननें चहाचा पेला रिकामा करून टेबलावर ठेवीत म्हटलें, "शशी, चल आपण असे फिरायला जाऊं."

"नको, नको !" शशिधर तात्काळ उद्गारला.

"शशी, माझं ऐकणार नाहीं का तूं ? तुला आलंच पाहिजे. काय होतं तें तरी पाहूं."

दमननें त्याचे कपडे आणण्यास गड्यास सांगितलें. मनोरमाबाईंना वात्सल्यानें दमनला हृदयाशीं धरून गोंजारावा असें वाटलें. नॅन्सीच्या निधनापासून एक दिवस देखील घराच्या उंबरठ्याबाहेर पाऊल टाकण्यास

जो शशिधर तयार नव्हता तो आज दमनच्या एका शब्दाबरोबर कोट चढवीत आहे हें पाहून त्यांच्या डोळ्यांतून आनंदाश्रू वाहूं लागले.

"कुठं नेणार तूं मला?" एखाद्या अजाण मुलाप्रमाणें शशिधरनें प्रश्न केला.

"जिकडे वाट मिळेल तिकडे जायचं," दमन स्निग्धपणें पुढें म्हणाला "शशी, त्या सुवासिक फुलाकडे पहा. किती सुंदर रंगाचा समुच्चय हा! डोळ्यांना मोहिनी घालताहेत, सुवासानें जनाला गुंगी आणताहेत. हें सारं कशाकरतां? त्यांना त्या प्रश्नाचं महत्वच वाटत नाहीं. Their joy is in giving—giving, not demanding. (त्यांचा खरा आनंद दानक्रियेंत आहे, मागणींत नाहीं.)"

वाऱ्याच्या मंद झुळकेबरोबर गुलाबाचीं फुलें दिमाखानें डोलत होतीं. सौंदर्याच्या जाणिवेमुळें मान वर करून पहाणारीं देलीयाचीं फुलें-देखील शीतल वाऱ्याच्या स्पर्शामुळें जणूं काय प्रेमभरानेंच बघत होतीं. लतामंडपावर दाट हिरव्यागार पानांमागें फुललेली जाईजुई एखाद्या कोमलांगी तरुणीप्रमाणें क्षणभर विलसून पुन्हां पानामागें लपत होतीं. सभोंवार जिकडे तिकडे मधुर सुगंध दरवळला होता.

शशिधरनें कांहीं न बोलतां पोशाख केला.

"दमन, तूं एकसारखा जवळ असावास असं मला वाटतं."

"मी तुला मुंबईलाच न्यायला आलों आहें."

"मला मुंबईंत राहायचं नाहीं. मला सर्वांच्या भेटीची भीति वाटते."

"शशी, हा तुझ्या एकलकोंडेपणाचा परिणाम आहे. अरे, तुझ्या व्यक्तित्वाचं तुला जेवढं महत्व वाटतं तेवढं तें सभोंवारच्या जगाला बिलकुल वाटत नाहीं. मी असंच वागलं पाहिजे. मला त्याशिवाय वागतां यावयाचं नाहीं असंच अगदीं अजाणपणें तूं आपल्या मनाला शिकविलें आहेस. हा एक मानसिक दुर्बलतेचा नमुना आहे. पुन्हा एक वेळ आत्मविश्वास उत्पन्न कर; मला कांहीं होत नाहीं असं मनाला सांग; आणि नॅन्सीची पवित्र स्मृति हृदयाशीं बाळगून जीविताचा झगडा लढण्यास तयार हो.

म्हणजे तुला ह्या तुझ्या आत्तांच्या जीवनाबद्दल खेद आणि पश्चात्ताप वाटेल. एवढंच नव्हे—"

बोलतां बोलतां दमन एकदम थांबला. प्रेमभंगानंतर पुन्हांही तेथें प्रेमभावनेचा बगीचा थाटूं शकेल ही कल्पना त्याच्या मनांत आली होती.

सूर्यास्त झाल्यामुळें पश्चिम आकाशांतील तेजस्विता कमी कमी होत होती. हवेंत गारठाही बराच वाढला होता.

दोघेही माडीवरून खालीं उतरले. मनोरमाबाईनीं सांगितल्याप्रमाणें मोटार येऊन बंगल्यासमोर उभी राहिली.

"काकी," दमन म्हणाला, "मोटार कशाला? आम्ही पायींच असे फिरून येतों. तसंच आज रात्रीच्या गाडीनं मी आणि शशी मुंबईला जाणार आहों."

मनोरमाबाई आश्चर्यानें दमनकडे पहात स्तब्ध राहिल्या. शशिधर अवाक्षरही न बोलतां उभा होता. दमनला त्यांच्या आश्चर्याचें कारण समजलें तरी तो सहाजिकपणें म्हणाला, "त्याचे भरपूर कपडे आणि सामान भरायला सांगा. त्याला बरं वाटलं तर कदाचित् पुष्कळ दिवस राहील तो तिकडे. त्याला ताबडतोब घेऊन यायला आईनं मला सांगितलं आहे."

दमन एवढ्या निश्चयी स्वरांत बोलत होता कीं शशिधरला नकार देण्याचेंही धैर्य होईना. जणूं काय शशिधरच्या दुःखी मनोवृत्तीला महत्व देण्याचें कारण नाहीं अशा विचारानें तो त्याच्या खांद्यावर थोपटून पुढें म्हणाला, "शशी, ताईनं सिनेमासृष्टींत प्रवेश केला हें तुला माहीत आहे का? ह्या पहिल्या तारखेला तिचं पहिलंच चित्र लागणार आहे. तुला तो चित्रपट पाहाण्याकरतां घेऊन येण्यासाठीं मला पुन्हां पुन्हां तिनं बजावलं आहे."

शशिधर कांहींच बोलला नाहीं. दमनचें म्हणणें योग्य असलें तरी 'तूं तें मान्य करूं नकोस,' असेंच तो मनाला सांगत होता. पण ह्या त्याच्या मनोवृत्तीची कल्पना झाल्यामुळेंच दमन चालतां चालतां म्हणाला,

" शशी, मनुष्याला अनेक प्रकारच्या भावना आणि संवेदना जाणवत असतात. पण आपण जन्माला आलों ते रडत रडत मरण्याकरतां खास नाहीं. कधीं तरी सर्व बंधनें विसरून कांहीं काल खरा विसावा आणि आनंद भोगण्याचा प्रत्येक प्राण्याला हक्कच आहे असं मला वाटतं. शशी, प्रेमाच्या फोल कल्पनांनीं तूं आपल्या आयुष्याचा असा अपव्यय करूं नकोस. तो पहा चंद्र उगवतो आहे. ह्या सुंदर देखाव्यानं जीवितांत तुला कांहीं तरी तथ्य, आनंद आहे असं वाटत नाहीं का? अरे, उद्यां सकाळीं सूर्योदय होईल, फुलं फुलून तारुण्याच्या उन्मादानं तुझ्याकडे पहातील. सुगंधित शीतल वारा तुझ्या अंगाला मृदु स्पर्श करील. पक्षी आनंदानें ह्या झाडावरून त्या झाडावर उड्या मारीत गायन करतील. उत्साहाचा एकच श्वास साऱ्या विश्वांतून बाहेर पडत असेल आणि तूं मात्र दुःखानं निश्वास टाकून इतर जीवांना दुःखी करणार? शशी, हेंच का तुझं जीवित-तत्त्वज्ञान?"

दमनच्या प्रत्येक शब्दांत हृदयाला वाटणारी कळकळ स्पष्ट दिसत होती. आपल्या वागणुकीचा तो मनस्वी निषेध करतो आहे हें शशिधरला समजत होतें. तरी त्याच्या बोलण्याचा इन्कार करण्याचें मनोधैर्य त्याच्यांत बिलकुल उरलें नव्हतें.

बोलतां बोलतां दोघेही बरेच दूरवर पोहोंचले.

" मागं फिरू या ना?" दमननें म्हटलें, "आपल्याला रात्रीं निघायचं आहे."

दोघेही मागें फिरले.

रावसाहेब घरी अगोदरच आले होते. दमनबरोबर शशीधर फिरायला गेला आहे हें ऐकून त्यांना नवलच वाटलें.

साम्यवादावर यत्किंचित्‌ही विचार न करतां त्याच्या कृतीला नीतिभ्रष्ट, अत्याचारी आणि विघातक ठरविणाऱ्या अनेक समाजशिष्टांचे रावसाहेब हे एक प्रतिनिधी होते. यामुळें दमन म्हणजे एक उल्लू, लफंगा पोरगा असेल अशी त्यांची कल्पना होती. परंतु एवढ्या अल्प वेळांत त्यानें शशिधरवर एवढें विलक्षण वजन बसविलें तेव्हां तो कांहीं तरी विचित्र

प्राणी असावा असें त्यांना वाटूं लागलें होतें. साम्यवाद म्हणजे खरोखर काय याचा पुस्तकें वाचून अभ्यास करावा असा त्यांनीं मनाशीं विचार केला.

कांहीं वेळानें दमन येतांच त्यांनीं त्याला आपल्या खोलींत बोलाविलें.

" बैस असा. " ते स्निग्धपणें त्याच्याकडे पहात म्हणाले, " दमन, माझ्या कांहीं कल्पना चुकीच्या होत्या. " क्षणभर गोंधळून रावसाहेब खिन्नपणें पुढें म्हणाले, " मला वाटतं जुन्या पिढीला नव्या पिढीच्या भावना आणि स्वप्नं यांचं महत्व वाटतच नाहीं. तरुण पिढीनं जुनी पिढी नाहींशी होईपर्यंत तिकडे दुर्लक्षच केलं पाहिजे. शशी—नॅन्सी यांच्यासारख्या प्रेम-संबंधाचं आम्हांला एवढं महत्व आणि सत्यत्व पटतच नाहीं आणि त्यामुळें असे दुर्दैवी प्रसंग ओढवतात. "

बोलतांना रावसाहेबांच्या आवाजांत विलक्षण मार्दव आलें होतें. आपली दुःसह स्थिती दडविण्याकरतां टेबलावरील सिगारेटचा डबा उचलून तो दमनपुढें करीत ते म्हणाले, " Yes, take it. "

" Sorry. मी ओढीत नाहीं. " असें म्हणून दमन त्यांच्याकडे भाषणाच्या अपेक्षेनें पाहूं लागला.

रावसाहेबांनीं सिगारेट पेटविली. कांहीं वेळ स्तब्ध राहून ते म्हणाले, " नॅन्सी खरोखरच सुस्वभावी पोरगी होती असं वाटतं आम्हांला. केवळ सामाजिक बंधनांना झुगारण्याचं मनोधैर्य नव्हतं यामुळें मी शशीला घराबाहेर घालवला. बुद्धिवादानं मनाला कांहीं तत्वं पटलीं तरीं ती आचरण्याचं मनोधैर्य बिलकुल नसतं आणि म्हणून कुठंही तें तत्त्व अमलांत आणतांना पळवाट आढळली कीं आम्ही तिला चटकन् बिलगतों. Mind is a conservative diehard. (मन हें असं हट्टी सनातनी असतं !) आम्हाला आमची दुबळी बाजू समजत असल्यामुळें नवीन पिढीचं म्हणणं ऐकून घेण्यासही आम्ही नाकबूल असतों. कांहीं इलाज नाहीं. "

रावसाहेबांनीं दीर्घ निश्वास टाकला. सिगारेट जवळ जवळ न ओढतांच कांचेच्या रक्षापात्रांत कोंबून ते आपली चमत्कारिक स्थिती लपविण्याकरतां पुढें म्हणाले, " बरं चला, तुम्ही जेवायला बसा. उशीर केलात तर गाडी मिळणार नाहीं. "

दमन कांहीं न बोलतां उठला. रावसाहेबांबद्दल त्याला एक प्रकारें सहानुभूति वाटली. शिक्षणानें देखील मनुष्याला आपलीं मतें आणि कल्पना टाकवत नाहींत याबद्दल त्याला सखेद आश्चर्य वाटलें. साम्यवाद सर्वस्वीं मनाला पटला तरी त्याचा पुरस्कार करण्याची मानसिक तयारी बुद्धिवान् लोकही करूं शकत नाहींत हें पाहून तो कांहींसा हताश झाला.

रावसाहेबांबरोबर तो खिन्नपणें जिना उतरत होता. मनांत विलक्षण विचारांची कालवाकालव होत होती. आपल्या ह्या तळमळीची ह्या आंधळ्या दुबळ्या जगाला कुठं जाणीव आहे? जमिनीवर आदळतांच गळाला अडकलेल्या माशाला होणारी जखमेची व्यथा आणि पाण्यासाठीं अखेरची त्याची दारुण तळमळ दमनच्या दृष्टीसमोर उभी राहिली. भांडवलशाहीदेखील एकाद्या माशाप्रमाणेंच कधींतरी सहज आपला बळी घेईल आणि निराधार प्राण्याप्रमाणं तडफडून आपण प्राण सोडूं, ह्या कल्पनेनें त्याची छाती धडधडूं लागली.

"दमन," रावसाहेब मध्येंच म्हणाले, "उदार दृष्टीच्या कक्षेंतून जगाकडे पहातांना जिकडे तिकडे निराशा दिसली तरी अद्वितीय माणसं आपल्या इच्छाशक्तीच्या जोरावर जगाकडे अपेक्षेनं आणि आकांक्षेनं पहात असतात आणि त्यांतच त्यांचा आनंद असतो."

रावसाहेबांस आपल्या मनोविकारांची जाणीव झाली असावी या विचारानं दमन एकदम चपापला व कांहीं वेळ त्यांच्याकडे भेदक दृष्टीनें पाहून तो म्हणाला,

"अण्णासाहेब, तुम्हाला साम्यवादाविषयीं तिरस्कार असला तरी मला त्याबद्दल बिलकुल वैषम्य वाटत नाहीं. भांडवलशाहीच्या दृश्य कार्याकडे पहातांना साधारण समाजाला कृतज्ञता वाटणं अगदीं सहाजिक आहे. आपापसांतील भाऊबंदकी थांबविल्याशिवाय आम्हाला भांडवलशाही नष्ट करून जगाचं नंदनवन करणं अगदीं अशक्य आहे. आणि ही भाऊबंदकी सहज थांबेल असं मला वाटत नाहीं. साम्यवाद हा अशक्य ध्येयवाद म्हटला तर एक वेळ त्याबद्दल एवढा खेद होत नाहीं. परंतु त्याच्याकडे अत्यंत तुच्छतेनं आणि तिरस्कारानं पहाणाऱ्या सर्वसाधारण समाजाची

क्लीब करावीशी वाटते. आणि हताशपणें जगांतील अतर्क्य छळ पहातांना हृदयाला दारुण यातना होतात. Oh God, art Thou not ashamed of thy creation? Why Thou dost not smite it to pieces! (ईश्वरा, तुझ्या ह्या कृतीबद्दल तुला खेद वाटत नाहीं का? मग तूं ती एकदम उध्वस्त कां करीत नाहींस!)"

क्षणभर भान विसरून गच्च मुठी आवळून दमन उभा राहिला. त्याचे टपोरे, विशाल डोळे अधिकच विस्तृत होऊन तेजस्वी दिसूं लागले. भालप्रदेशावर रक्तवाहिनी स्पष्टपणें उमटली होती. भुंवया क्रोधानें वक्र होऊन कपाळावर आंठ्या पडल्या होत्या.

कांहीं वेळ थांबून दमननें दीर्घ निश्वास टाकला. रावसाहेब त्याच्याकडे स्निग्धपणें पहात होते. दमनचा आवेग अजून कमी झाला नव्हता. तो उद्वेगानें पुढें म्हटला, "आणि अण्णासाहेब, भांडवलदाराचा व्यक्तिशः तिरस्कार खरा साम्यवादी बिलकुल करणार नाहीं. कारण पुष्कळ वेळां आपण एवढा क्रूर छळ करतों आहों याची कल्पना त्यांना यत्किंचित्‌ही नसते. They commit most horrible sins so innocently! (आपल्या पापाबद्दल त्यांना एवढं गाढ अज्ञान असतं!) भांडवलदार हा भांडवलशाहीच्या रगाड्याला लावलेल्या बैलाप्रमाणं अगदीं विचार शून्यतेनं आपला मार्ग काढीत असतो आणि केवळ धन संपादन करणं एवढाच त्याचा आनंद असतो. पण कित्येक प्रसंगीं तो एखाद्या गरीब मजुरापेक्षांही दुःखी असतो. अण्णासाहेब, साम्यवादाच्या वृक्षाचीं पाळंमुळं जर ह्या भूमीवर खालवर पसरलीं तर त्याची छाया मजुराबरोबर भांडवलदारालाही तेंवढीच सुखावह होईल, असा मला विश्वास वाटतो. जगांत आर्थिक समता प्रस्थापित झाली तर स्वार्थबुद्धि, छळ, आर्थिक अपव्यय, अनेक प्रकारचे गुन्हे, गाढ अज्ञान, मानसिक अधोगति, दारिद्र्य, सारे सारे मानवसंस्कृतीचे कट्टे दुष्मन पूर्णपणें नाहींसे होतील. पण ह्या गोष्टी कुणाला मान्य होणार? आणि ह्या गाढ अज्ञानाची परमावधि जर कुठं असेल तर ती म्हणजे आम्ही आमच्या कट्ट्या शत्रूला—भांडवलशाहीला—आमचीं मातापितरं समजून आमच्या सुखदुःखाची सर्व सत्ता त्यांच्याकडे सोंपवीत आहों. अण्णासाहेब, खरोखरच ईश्वरानंच जर जगांत ही असह्य विषमता

निर्माण केली असेल तर त्या ईश्वराबद्दल कृतज्ञता तरी कां बाळगावी? शिवाय यामुळें त्याच्या असामान्यतेवर आपण केवढा आरोप करतो आहों! ज्या ईश्वराला एवढ्या विश्वाची रचना करतां आली, त्याला हा विषमतेचा अन्याय आवश्यक वाटला हें मत प्रतिपादन करणं म्हणजे मनुष्याच्या क्षुद्रबुद्धीचें तें उदाहरण नाहीं का होत? आणि जर आम्ही सर्व एकाच परमेश्वराचीं लेकरं आहोंत तर आपापसांत विषमता उत्पन्न करून वितुष्ट वाढविणाऱ्या बापाबद्दल आदर बाळगण्याचं तरी काय कारण आहे?"

दमनच्या चेहऱ्यावर दारुण औदासिन्य दिसत होतें. रावसाहेब त्याच्याकडे कौतुकानें पहात विचार करीत होते. तरुण पिढी एवढी भावनाप्रधान असेल अशी त्यांना यत्किंचित्‌ही कल्पना नव्हती. दमनच्या पाठीवर थोपटून प्रेमळपणें ते म्हणाले,

"दमन, उदार ध्येयासाठीं धडपडतांना आपल्या आयुष्याचा नाश करून घेऊं नकोस. आपल्या प्रकृतीची काळजी घे. उदात्त ध्येयासाठीं प्रत्येकानं आपल्या आयुष्याचा खेळखंडोबा केलाच पाहिजे असं वाटतं का तुला? सुख आणि ध्येय यांचा नेहमीं वैरभावच असला पाहिजे का?"

दमननें गंभीरपणें स्मित केलें व तो शांतपणें म्हणाला, "अण्णासाहेब, आवेगाच्या भरांत मी जरी उदास झालों तरी जगाकडे अपेक्षेनं आणि आनंदानं पहाण्याचा मी सारखा प्रयत्न करीत असतों. पण—"

इतक्यांत मनोरमाबाई तेथें आल्या व प्रेमळपणें म्हणाल्या,

"दमा, गाडीला अवधि आहे. जेवायला चलतां ना? दमा, तुझे केवढे उपकार आहेत माझ्यावर! तूंच शशीचा पाठीराखा आहेस."

मनोरमाबाईंचा कंठ दाटून आला व डोळ्यांतून घळघळ अश्रू वाहूं लागले.

"काकी, तुम्ही शशीची बिलकुल काळजी करूं नका. शशी, अनाताई आणि मी भावंडं आहोंत. अण्णासाहेब, मी त्याला पुन्हां कॉलेजांत जाण्यास भाग पडतों."

मनोरमाबाईनीं वात्सल्यानें दमनला जवळ घेऊन गोंजारला.

"दमन, तुलाही कधीं पैशाची गरज लागली तर बिलकुल संकोच न बाळगतां मला कळव." रावसाहेब म्हणाले.

दमन कांहींच बोलला नाहीं. मनोरमाबाईबरोबर तो सैंपाकघरांत जेवण्याकरितां गेला.

———

# १५

शशिधर आज मुंबईस आल्यास सुमारें महिना होऊन गेला होता. सर्वांच्या सान्निध्यांत तो लवकरच आपल्या पूर्ववृत्तीवर येईल असें दिसत होतें व त्याची प्रकृतीदेखील बरीच सुधारली होती. नेहमीं त्याच्या-बरोबर फिरावयास जाऊन अनेक विषयांवरील संभाषणानें अनामिका त्याचें मन गुंतवून ठेवीत असे.

शकुन्तलाबाईंना मात्र निराळींच सुखस्वप्नें पडत होतीं आणि उत्कंठेनें त्या काळाची त्या वाट पहात होत्या. शशिधर मुंबईस आल्या-पासून अनामिका त्याची एखाद्या परिचारिकेप्रमाणें सेवा करते आहे. कदाचित् त्यांच्या मनांत परस्परांबद्दल प्रेमभावना उत्पन्न होईल या कल्पनेमुळें त्या अतिशय उत्सुक झाल्या होत्या. इतके दिवस अनामिके-जवळ आपण नेहमीं तिच्या विवाहाबद्दल गोष्टी काढाव्या आणि तिनें स्पष्ट नकार द्यावा हा प्रकार सारखा चालल्यामुळें त्या अगदीं हताश झाल्या होत्या. परंतु एवढ्या आपत्ती सोसल्यावर दैव आतां अनुकूल होतें आहे या आशेमुळें त्या आनंदित होत होत्या. दमननेंही एक लहानसें औषधाचें दुकान काढून तें आपल्या जीवनाचें साधन करण्याचें ठरविलें होतें. यामुळें त्याचा साम्यवादाबद्दलचा उत्साह साहजिक कमी होईल अशी त्यांना अपेक्षा वाटत होती.

याच वेळीं त्यांना शाळेच्या मुख्याध्यापिकेचीं अधिकारसूत्रें मिळालीं होतीं. अखिल–भारत–महिला–मंडळाच्या संमेलनाच्या त्या स्वागताध्यक्ष झाल्या होत्या व त्यांच्या भाषणामुळें त्यांची योग्यता बरीच मोठी आहे याचा प्रत्यय येऊन नियतकालिकें त्यांचा गौरव करीत होतीं,

अनामिकेचाही चित्रपटसृष्टींत गौरव होत होता; व हिंदुस्थानचे राष्ट्रीय पुढारी आणि वृत्तपत्रें देशाचा व हिंदी संस्कृतीचा दृष्टिकोन

पाश्चिमात्य राष्ट्रांपुढें सुंदर रीतीनें दाखविल्याबद्दल तिचें अभिनंदन मुक्त-कंठानें करीत होतीं. तिचे सामाजिक चित्रपट अत्यंत हृदयस्पर्शी व स्फूर्ति-दायक होते व जात्यन्ध, धर्मवेडा, रूढीप्रिय सनातनीदेखील तो चित्रपट पाहिल्यावर कांहीं काळ तरी शरमत होता. जगांत चाललेल्या अनन्वित छळाचें दारुण चित्र दाखवितांना ती आपल्या भूमिकेंत इतकी तन्मय होत असे कीं तो चित्रपट पहातांना कथानकांतील नायिकेबद्दल वाटणाऱ्या सहानुभूतीनें ती सद्गदित होऊन "मीच हा अभिनय केला का?" असा सवाल मनाला करीत असे. यामुळें जगांतील प्रसिद्ध नटींमध्यें तिची गणना होईल असा सर्वांना विश्वास वाटत होता.

परंतु आयुष्यांत अनेक प्रकारचे अनपेक्षित प्रसंग पाहिल्यामुळें शकुन्तलाबाई मात्र भविष्यकालीन यशाबद्दल साशंक होत्या. त्यांच्या त्या स्वभावामुळें एक दिवस दमन म्हणाला, "आई, कुठल्याही प्रकारच्या वाईट परिणामांचं तूं कल्पिलेलं चित्र मला पुसून टाकण्यास किती श्रम पडतात याची तुला बिलकुल कल्पना व्हावयाची नाहीं. प्रत्येक कृत्याच्या परिणामाचा असा विचार करीत गेल्यास मनुष्याच्या हातून कोणतंच कार्य होणं शक्य नाहीं. आई, जीवितांतले बरेचसे प्रश्न सदसद्विवेक-बुद्धीवर विश्वास ठेवून आत्मविश्वासानं सोडविले पाहिजेत. कारण कितीही विचार केला तरी कांहीं गोष्टींचा निर्णय लागणं मानवबुद्धीच्या आटोक्याबाहेरचं असतं आणि एवढा विचार करण्याचाही अवधी माणसाला लागतोच असं नाहीं."

"बाळ दमा," शकुन्तलाबाई शांतपणें म्हणाल्या, "तुझ्या उदार आचरणाबद्दल मला किती किती अभिमान वाटतो! पण आपलं दैव नेहमींच आपल्या मार्गांत आजपर्यंत आडवं आल्यामुळें अगदीं निश्चित यशाबद्दल देखील मला शाश्वति वाटत नाहीं. अपघात हे तर माझ्या जीवनांत Mile-Stone (अन्तरदर्शक दगडा) प्रमाणें ठिकठिकाणीं तुला दिसतील. दमन, तुझी ध्येयनिष्ठा आणि हृदयाची तळमळ पाहून मला माझ्या बाळाबद्दल केवढी धन्यता वाटते! बाळ, तुझ्यासारखं रत्न पोटीं जन्माला आलं ह्या एकाच गोष्टीमुळं जन्माचं सार्थक झालं माझ्या असं वाटतं–"

बोलतां बोलतां त्यांचा गळा दाटून आला. दमनच्या पाठीवरून हात फिरवून त्या मूक रूदन करूं लागल्या. दमन खिन्न मुद्रा करून खालीं पहात उभा होता. कांहीं वेळानें आवंढा गिळून त्या म्हणाल्या, "तूं ध्येयासाठीं अगदीं वेडा आणि आंधळा होतोस. आणि जीविताची यत्किंचित्‌ही पर्वा न करतां आत्मयज्ञ करायला तयार असतोस. महापुरानें वाहणाऱ्या नदीला बांध घालण्याचा प्रयत्न एखाद्या व्यक्तीनं एकटेपणानं केला तर त्याच्या नाशापलीकडे त्यांतून निष्पन्न तें काय होणार? ध्येयासाठीं तडफडून प्राण घालविणं हेंच का विधायक कार्य? दमा वेड्या, अलोट स्वार्थत्यागानं कोणतंही विधायक कार्य साध्य होत असेल तर तो अवश्य करावा. पण आत्मत्याग करण्याचं व्यसन लागलं तर मनुष्य भावना-प्रधान होऊन निरर्थक आपला नाश कधीं करील याचा नेम नाहीं."

दमन कांहीं न बोलतां विचार करीत होता. इतक्यांत अनामिका व शशिधर तेथें आले.

"दादा, हें पाहिलंस रुबीचा नवरा मोटारच्या अपघातानं मरण पावला." अनामिका हातांतल्या वर्तमानपत्रांतील मजकूर दाखवित म्हणाली.

दमननें झटकन् तिच्या हातांतून तें वृत्तपत्र घेतलें व तो खिन्नपणें अपघाताचें वर्णन वाचूं लागला.

"आपल्या पत्नीसह सायंकालची सहल करण्यास गेला असतां मोटार अतिशय जोरानें झाडावर आदळली. त्या धक्क्यामुळें तात्काळ तो मृत्यु-वश झाला व रुबी दूरवर फेंकली गेली. तिला थोडीशी दुखापत होऊन ती बेशुद्ध झाली. रुबीचा नवरा खाणीचा व गिरणीचा लक्षाधीश मालक होता." अशा आशयाचा मजकुर वाचून दमन दीर्घ निश्वास टाकून म्हणाला, "अरेरे! किती वेडगळपणानें हे मृत्युमुखीं पडतात. ताई, रुबीला तार केली पाहिजे."

अनामिका त्याच्याकडे भेदक दृष्टीनें पहात होती. रुबीविषयीं अजूनही त्याच्या हृदयांत मृदु-स्थल असावें असें तिला वाटलें. परंतु आपल्या भावनांचें आविष्करण आपण करीत आहों याची कल्पना त्याला नव्हती.

तो म्हणाला, "रुबी किती बुद्धिवान् व चतुर आहे! तिच्या भावनांशीं व आकांक्षांशीं समरस होण्याएवढा बुद्धिवान् पति तिला पाहिजे होता. ती सुखी नव्हती. पण समंजसपणानं तिनं आयुष्यांत आनंद मिळविण्याचा प्रयत्न केला होता. तिच्यासारख्या स्त्रिया पैशानं सुखी होणंच कठीण. जर ती भांडवलदाराची कन्या नसती तर आज अखिल हिंदुस्थानांतील प्रमुख स्त्रियांमध्यें तिची गणना सहज झाली असती."

बोलतां बोलतां तो एकदम थांबला. आपण कुठें तरी आणि कांहीं तरीच बोललों असें वाटून त्यानें अनामिकेकडे तीक्ष्णपणें पाहिलें. तिच्या नजरेंतील जिज्ञासा त्याच्या लक्षांत आली व क्षणभर गोंधळून तो पुन्हा म्हणाला, "रुबीला तार पाठविलीच पाहिजे."

त्याच्या दृष्टीसमोरून रुबीच्या सहवासांतील गतकालची स्मृतिचित्रें जात होतीं. कॉलेजमधील तिचा अल्लड उत्साह आणि दृढ प्रेम त्याला आठवलें. गाडींतील प्रवासांत वैवाहिक बंधनाची आणि नीतीची यत्किंचित्‌ही पर्वा न करतां प्रेमभावनेचा आस्वाद घेण्याची तिची उत्कट इच्छा ह्या गोष्टीही त्याच्या दृष्टीसमोर उभ्या राहिल्या. कदाचित् पती-शिवाय आपल्याप्रमाणें तिचे आणखीही प्रियकर असतील हा विचार क्षण-भर त्याच्या मनांत येऊन गेला. आपल्याला अशी बुद्धिवान् पत्नी मिळाली असती तर आपण दोघेंही साम्यवादाच्या उदात्त ध्येयासाठीं किती निकरानें लढलों असतों या विचारानें तो कांहींसा उदास झाला.

विचाराच्या ओघांत त्याला कमलेची आठवण झाली. कमला आणि रुबी दोघींमध्यें जमिन–अस्मानाचें अन्तर! कमलेशीं केलेल्या प्रणयाची स्मृति होऊन त्याला वैषम्य वाटलें. तिचा पति श्रीमंत ऑफिसर आहे. तिला दोन मुलें आहेत. त्यांच्याबरोबर मोटारमधून सहल करतांना तिच्या चेहऱ्यावर इच्छा-पूर्ति व बाहेरच्या जगाविषयीं तुच्छता स्पष्ट दिसत असते. खरेंच कित्येक तरुणांचा आपल्या प्रणयाबद्दल दृढ विश्वास हा असाच फोल असूं शकेल हा विचारदेखील त्याचे मनांत येऊन गेला.

हातांतल्या वृत्तपत्रांतील मजकूर तो पुन्हा वाचूं लागला. चटकन् त्याचें लक्ष मोठ्या अक्षरांत छापलेल्या अग्रभागावर गेलें.

" काय, मुंबईतील गिरण्यांमध्यें सार्वत्रिक संपाची तयारी ! " दमन आश्चर्यानें उद्गारला, " कामगार संघानं शेवटीं हा बेत केला ! पण या वेळीं संप बिलकुल यशस्वी होणार नाहीं. युद्धाची पूर्व-तयारी केल्याशिवाय संप पुकारण्यांत काय हंशील आहे ? अरेरे, चार आठ गुंडांनीं मजुरांच्या सभा भरवाव्या, कंठशोष करून अडाणी मजुरांना यशाचं आमिष दाखवावं आणि त्यांनीं नोकऱ्या सोडून, पोरांबाळांचे हाल करून गिरण्याबाहेर पडावं आणि शेवटीं पोटाची आग विझवण्याकरतां पुन्हा भांडवलशाहीला शरण जावं, यापलीकडे या संपांतून निष्पन्न तें काय होणार ? आणि मजूर पक्षाचं वर्तमान-पत्र प्रसिद्ध करणाऱ्या भांडवलशाहीच्या भागीदारानीं ह्या भाई गुंडांना यथेच्छ प्रसिद्धी द्यावी, त्यांना पुण्यात्मे करावे व अडाणी समाजानं केवळ बंदिशाळेंत गेल्याबद्दल यांचा जयजयकार करावा एवढंच ह्या संपाचं कार्य आहे. "

दमन उद्वेगानें बोलत होता. अनामिकेला तो संपांत सामील होणार नाहीं म्हणून समाधान वाटत होतें. पण शकुन्तलाबाई मात्र त्याच्याकडे भयभीत मुद्रेनें पहात होत्या. इतक्यांत दमन गच्च मुठी आवळून पुन्हा म्हणाला, " कित्येक वेळां हे मजुरांचे पुढारी केवळ वैयक्तिक स्वार्थासाठीं, मानासाठीं वाटेल तशा मजुरांच्या हालअपेष्टा करण्यास उद्युक्त होतात. आई, हा संपाचा बेत ह्या वेळीं मागें घेणं अगदीं आवश्यक आहे. आणि यासाठीं मी धडपडणार. या वेळीं संपाला प्रतिकूल अशीच परिस्थिती आहे. जिकडे तिकडे बराच माल पडून आहे. अतिवृष्टि व महापुरानें या प्रान्तात शेतीभातीही यंदा कांहीं झाली नाहीं आणि या वेळीं संप पुकारल्यास मजुरांच्या भयंकर हाल अपेष्टा होतील व भांडवलशाहीचा फायदाच होईल. चारदोन भाई पुढाऱ्यांच्या मागण्या सरकारनें नामंजूर केल्या किंवा हिंसात्मक भाषण केल्याबद्दल एखाद्या मजुर पुढाऱ्याला सरकारनं तुरुंगांत डांबलं एवढ्यासाठीं इतक्या तातडीनं मजुरांच्या हिताहिताचा यत्किंचित्‌ही विचार न करतां संप पुकारण्याचा बेत करावा हें किती स्वार्थमूलक आहे !"

दमननें झटकन् वृत्त-पत्राचें पान बदलून स्थानिक कार्यक्रम पहाण्यास सुरवात केली. " आई, क्षमा कर " तो गहिंवरून म्हणाला,

"आज आझाद मैदानावर मजुरांची सभा आहे. त्या सभेंत मी निर्वाणीचा प्रयत्न करून पहाणार. खरंच, We are driven mad by these orators. आई—"

दमननें वर पाहिलें तों शकुन्तलाबाईंच्या नेत्रांतून घळघळ अश्रु-धारा वाहूं वहात होत्या. अनामिकादेखील अधर घट्ट धरून रडें आवर-ण्याचा प्रयत्न करीत होती. दमनचा कंठ दाटून आला. कांहीं वेळ कुणी कांहीं बोललें नाहीं. शेवटीं शशिधर त्रस्त स्वरांत म्हणाला, "दमन, आजच्या सभेला तूं जाणं किती धोक्याचं आहे ? युद्धाचं वारं सर्वांच्या-अंगांत संचारलेलं असणार. तिथं विचार-शून्यता आणि विकारवशता या शिवाय काय दिसणार आहे ? तुला ते दुष्मन समजतील. तुझा उदार हेतु समजून न घेतां तुला एखाद्या पिसाळलेल्या कुत्र्याप्रमाणें कोंडून मारतील. दमन, मजुरांसाठीं तुला पुष्कळ कार्य करायचं असेल तर हें वेडगळ साहस करूं नकोस."

दमननें झटकन् डोळे पुसून गंभीरपणें सभोंवार पाहिलें. एखादी घोर प्रतिज्ञा करतांना दिसणारी उग्रता त्याच्या मुद्रेवर स्पष्ट दिसत होती. दीर्घ उसासा टाकून तो निश्चयी स्वरांत म्हणाला, "मला या वेळीं कसलंच भय वाटत नाहीं. तरी पण आई, माझा दृढ विश्वास आहे कीं माझे मजूरभाई माझ्या अंगाला स्पर्श करायचे नाहींत. त्यांच्यासाठीं मी माझ्या जीवाचं रान करण्यास तयार आहें याची त्यांना खात्री आहे. आई, ते माझं खात्रीनं ऐकून घेतील आणि कदाचित् हजारों गरीब कुटुंबांवर येणारं दारुण संकट टाळल्याचं श्रेय मला मिळेल. आई, यासाठीं जरी कदाचित् माझे प्राण खर्ची गेले तर काय वाईट झालं ? गुन्हेगार म्हणून त्या वेळीं फांसावर लटकलों असतों तर तूं आपल्या लाडक्या दमनसाठीं काय करणार होतीस ?"

दमननें आईला गच्च मिठी मारली. शकुन्तलाबाई त्याचें तोंड कुरवाळून रडूं लागल्या.

"आई, आई," कांहीं वेळानें दमन निश्चयी स्वरांत म्हणाला, "आई, मी विजयी होणार हा माझा आत्मविश्वास आहे. आज मी दडून

बसून, त्या स्वार्थी पुढाऱ्यांच्या नादीं लागून मजुरांना असा स्वहस्तानीं आत्मघात करूं देऊं ? तें माझं कृत्य किती भ्याडपणाचं होईल ? ह्या एकाच गोष्टीची टोंचणी मनाला लागून मी तडफडून मरेन. "

शकुन्तलाबाईंनीं त्याच्या तोंडावर हात दाबला. कांहीं वेळ पुन्हां पुन्हां बोलण्याचा प्रयत्न केल्यावर त्या कसें बसें म्हणाल्या, "बाळ दमा, तुझ्या आईला मरण कां येत नाहीं ? त्या चवताळलेल्या जनसमुदायांत तूं जाणार ! दमा, मी काय सांगूं आणि कसं सांगूं ? जिवंतपणींच यमयातना भोगण्यासाठीं माझा हा जन्म आहे. भांडवलशाहीच्या हट्टाला आणि भुकेनं व्याकुळ झालेल्या क्रुद्ध मजुरांच्या हिंसेसाठीं मी माझा लाडका बाळ बळी देऊं ? दमा, मीसुद्धां तुझ्याबरोबर सभेला येतें. माझ्या बाळाच्या अंगाला स्पर्श होण्यापूर्वींच मी माझे प्राण देईन." शकुन्तलाबाईंनीं एकदम हुंदका दिला.

दमन एकदम चमकला. तो कांहीं तरी बोलणार होता तोंच तेथें गडी येऊन म्हणाला, "बाबूजींना भाई सदानंद आणि चार पांच लोक भेटायला आले आहेत."

"बसा म्हणावं त्यांना, येताहेत. " असें म्हणून शकुन्तलाबाईंनीं अश्रु पुसले व त्या म्हणाल्या, "कसले भाई सदानंद ! मजुरांचा फंड खाऊन पुष्ट झालेले हे नीच बैल, केवळ आपल्याला उद्योग मिळावा एवढ्याचसाठीं संप पुकारताहेत. They know that they must live on strikes and disturbances. केवळ भाई या भांडवलावर जगणारे हे निरुद्योगी लोक ! यांचा नाश केल्याशिवाय मजुरांची स्थिती सुधरायाची नाहीं. अस्वस्थता उत्पन्न करणं हाच यांचा स्वभावधर्म ! दमा, कांहीं लोकांत तंटेबखेडे उत्पन्न करणं, परस्परांत वितुष्ट आणणं, ह्याचं जन्मतःच बीज असतं आणि अशा गुन्हेगारांना ह्या साम्यवादाच्या तत्वाखालीं सभ्यपणें आपली ही उपजत दुष्ट वासना सफल करण्याचं विस्तृत क्षेत्र मिळालं आहे. दमा, आपल्या जीवनाकरतां श्रम करून धन न मिळविणाऱ्या एकाही साम्यवाद्यावर विश्वास ठेवणं धोक्याचं आहे. पुष्कळ वेळां वैवाहिक बंधनाशिवाय कामवासना तृप्त करण्यासाठीं, आपल्या

गैरशिस्त वर्तनावर पांघरूण घालण्यासाठीं आणि उद्योग न करतां जीवनक्रम चालविण्यासाठीं ह्या लफंग्या लोकांनीं तुझ्या उदात्त साम्यवादाची अशी विटंबना चालविली आहे. भाई होण्यास आमच्या देशांत बुद्धि लागत नाहीं अगर शिक्षण लागत नाहीं. निरक्षर मजुरांना चिथविण्याएवढं वक्तृत्व असलं आणि कौटुंबिक कसली जबाबदारी नसली म्हणजे वाटेल तशीं राजद्रोही भाषणं करावीं आणि तुरुंगांत पडावं हाच यांचा साम्यवाद."

एवढें बोलून शकुन्तलाबाई पदरानें तोंड पुसून दिवाणखान्यांत गेल्या. अनामिकाही आईच्या मागोमाग बाहेर गेली. खिन्न मुद्रा करून विचार करीत दमन स्तब्ध उभा होता. शशिधर जवळच्या खुर्चीवर बसून वर्तमान-पत्र चाळीत मधूनमधून त्याच्या चेहऱ्याकडे निरखून पहात होता. बराच वेळ कुणींच कांहीं बोलेना तेव्हां तो खिन्नपणें म्हणाला, "दमन, जगांत सामाजिक सुधारणेसाठीं केवढं विस्तृत क्षेत्र आहे! राजकीय सुधारणेसाठीं आणि हक्कासाठीं झगडण्याकरतां तुला आयुष्याचा संपूर्ण काल खर्ची घालतां येईल एवढं कार्यक्षेत्र असतांना तुला ह्या साम्यवादाचं वेड दुर्दैवानं कसं लागलं? अरे, हिंदुस्थानांतील कितीशा लोकांना तुमच्या साम्यवादाचं महत्व वाटतं आहे? हा तुझा उत्साह सामाजिक कार्याकडे लावलास तर हिंदुस्थानच्या इतिहासांत तुझं नांव राहील. दमन, अजून तरी हा नाद सोड."

दमननें दीर्घ निश्वास टाकला व खुर्चीवर बसून अत्यंत कष्टी स्वरांत तो म्हणाला, "शशी, मला माझ्या ध्येयाबद्दल दुःख कष्ट होत नाहींत. पण तुमच्यासारख्यांनीं माझ्या ध्येयाबद्दल अनास्था दाखवावी याचं मला दुःख वाटतं. ध्येयाची साध्यता किंवा असाध्यता याचा ध्येयवादी विचारच करणार नाहीं. शिवाय साम्यवादावांचून जगाला दुसरा मार्ग नाहीं असा माझा दृढ विश्वास आहे. मग तो क्रान्तीनं प्रस्थापित होवो अगर उत्क्रान्तीनं होवो. शशी, भांडवलशाहीच्या सूत्रधारांनीं जगांतील धार्मिक, सामाजिक आणि राजकीय प्रत्येक संस्था इतकी भ्रष्ट केली आहे कीं त्याचे परिणाम जगाला अनिष्ट असेच होणार आहेत. अरे, भांडवलशाहीच्या जुलमाचं भेसूर चित्र साधारण समाजाला दिसत नाहीं. परंतु त्याच्या उदार देणगीची

मदत मात्र आम्हांला स्पष्ट दिसते. एका भांडवलदारानं कसल्याही सार्वजनिक संस्थेला मोठी देणगी दिली कीं त्याच्या साऱ्या व्यभिचारी, दुराचारी पापी कृत्यांवरदेखील सद्‌गुणांचा मुलामा चढतो. पण देशांत साम्यवाद प्रस्थापित झाल्यावर ह्या स्वार्थी भांडवदारांच्या उदार देणगीची देशाला कधींच आवश्यकता वाटणार नाहीं. कुणाच्याही मनांत ही गोष्ट येत नाहीं. शिवाय त्यांच्या देणगीमुळें त्याच्या अलोट वैभवाला, ऐश्वर्याला आणि चैनीला थोडाच व्यत्यय येत असतो ! गरीब मजुरांना अर्धपोटीं मजुरी देऊन मिळविलेल्या धनांतूनच त्यांच्या दान-क्रियेचं धन येत असतं ना ! शशी, समाजांत भुकेकंगाल, निरक्षर, रोगग्रस्त असा वर्ग यांना आवश्यक आहे. कारण भांडवलशाहीला आपल्या दारुण क्रूर जुलमावर पांघरूण घालण्याकरतां व जगाला आपलं औदार्य दाखविण्याकरतां हा दीनदुबळा अनाथ-वर्ग अगदीं आवश्यक आहे. आणि तो राखण्यास ही भांडवलशाही हेतु पुरस्कर किंवा अजाणतेनं कारणीभूत होत आहे. भांडवलदारांच्या भव्य हवेल्या आणि सुंदर बंगले पाहून आमच्या हृदयाचा क्रोधानं भडका होण्याऐवजीं आम्ही त्याच्याकडे कुतूहलानं किंवा अत्यादरानें भानरहित होऊन पहातों त्या वेळीं मनाला किती निराशा जाणवते म्हणून सांगू ! ”

“पण दमन,” शशिधर त्याला विरोध करण्याठीं म्हणाला, “भांडवलदारांनीं चैन केली तर त्यांच्या श्रमाचं तें फल आहे. बुद्धिच्या सामर्थ्यानं त्यांनीं पैसा मिळविला तर त्यांत कुठं काय चुकलं ? ”

दमन अतिशय खिन्नपणें जमिनीकडे पहात विचार करीत होता. शशिधरच्या त्या प्रश्नानें तो जखमेवर घाव घातल्याप्रमाणें चवताळून गेला रागाच्या भरांत त्यानें शशिधरकडे देखील क्रुद्ध नजरेनें पाहिलें. दातांवर दांत क्षणभर दाबल्यामुळें त्याच्या कानशिलावरील स्नायु स्पष्ट उमटले. उजव्या हातानें खुर्चीच्या हाताला पकडून तो आवेशानें उत्तरला, “शशी, भांडवलशाहीच्या जुलमाचं हेंच जर न्याय-निष्ठ समर्थन असेल तर त्याला एकच उत्तर देतां येईल. बुद्धिसामर्थ्यानें केलेली कृति जर उचित असेल तर शारिरीक सामर्थ्यानें केलेली कृतीसुद्धां योग्यच ठरेल. आणि

थोडक्यांत सांगायचं तर मजूर आणि भांडवलशाही यांच्यामध्यें भयंकर लढाई होऊन त्या दोहोंमधील लढ्याचा निकाल रक्तपातानं लागणं आवश्यक आहे व याची जाणीव जर भांडवलशाहीस नसेल तर अखेर त्याचा परिणाम तोच होणार आहे; तो कुणालाही टाळतां येणार नाहीं. शिवाय जागतिक संस्कृति आणि सुधारणा ह्यांत भर घालणं हें जर मानवाचं आणि राष्ट्राचं कर्तव्य आहे तर मग धन मिळविणं हें एकच कार्य श्रेष्ठतम असं आम्ही कां मानावं? आणि केवळ जन्मामुळं, योगायोगानं किंवा सामाजिक अधोगतीस कारणीभूत होणाऱ्या मार्गानंदेखील मनुष्य पुष्कळच वेळां बडा भांडवलदार होतो त्या वेळीं तरी त्याचं समर्थन कसं करतां येईल? याचसाठीं धार्मिक कल्पनांनीं पुनर्जन्माचा आसरा ध्यावयास आम्हांला भांडवलदारानीं सांगावं आणि तें आम्ही अंधपणें स्वीकारावं ही किती शरमेची गोष्ट आहे! नीति-तत्वं देखील ह्या भांडवलशाहीनं अगदीं कूपमंडुकवृत्तीनं आपल्या स्वार्थासाठीं निर्माण केलीं आहेत असंच मी म्हणतों. परस्त्रीशीं व्यभिचार करणं भयंकर पाप आहे ही धार्मिक कल्पना निर्माण करतांना ह्यांनीं स्त्रीच्या संमतीशिवाय आर्थिक सामर्थ्याच्या जोरावर तिच्याशीं विवाह करून तिच्यावर वारंवार बलात्कार करणं हें मात्र महत्पाप ठरविलं नाहीं. दुसऱ्याचं धन घेणं हा गुन्हा ठरवितांना भुकेनं व्याकुळ झालेल्या, थंडीनं कुडकुडणाऱ्या अनाथाला मदत करण्याचा कायदा भांडवलदारांनीं केला नाहीं. स्त्रियांच्या छळामागं देखील ही छोटीशी कौटुंबिक भांडवलशाहीच कारणीभूत आहे असं मला वाटतं. भांडवलशाहीच्या औदार्यानं उभारलेली सार्वजनिक धर्मशाळा आम्हाला अभिमानास्पद वाटते; पण त्याच्या कितीतरी पट मोठा चार माणसांसाठीं बांधलेला राजवाडा आम्हाला तिरस्करणीय वाटत नाहीं. नरकवासांतील मजुरांच्या यातना आणि भांडवलशाहीचा नंदनवनांतील उन्माद ह्या दोन गोष्टी पाहिल्या कीं भांडवलशाहीच्या चांगल्या बाजूकडे क्षुल्लक म्हणून सर्वस्वीं दुर्लक्ष करावं असं वाटतं."

दमन अगदीं सात्विक तळमळीनं बोलत होता. त्याच्या कळकळीचा आवेग शशिधरला समजत नव्हता असं नाहीं. परंतु आजपर्यंत साम्य-

बादाबद्दल एवढा सूक्ष्म विचार कधींच न केल्यामुळें त्या वेळीं दमनचें म्हणणें त्याला योग्य दिसलें, तरी त्या विधानाच्या सत्यतेबद्दल तो साशंक होता. कदाचित् आपण ही भांडवलशाहीची वाईट बाजू पहातों आहों असा त्याला संशय येऊन तो मुद्दामच म्हणाला, "दमन, भांडवलशाही जरी कदाचित् नष्ट झाली तरी ती कोणत्या तरी रूपानं पुन्हा प्रस्थापित होईल असं मला वाटतं. कारण स्वार्थ हा जर मनुष्याचा स्वभावधर्म असेल तर बुद्धिवान् माणसं कोणत्याही काळीं कोणत्या ना कोणत्या प्रकारानं तरी कमी बुद्धिवान् माणसांना नागविल्याशिवाय रहावयाची नाहींत; शिवाय साम्यवाद हा बुद्धिवाद आहे आणि तो गेल्या शतकांत जर प्रस्थापित करण्याचा कुणी प्रयत्न केला असता तर तो यशस्वी झाला नसता. त्या काळांत भांडवलशाहीचं कार्य अधिक उपयुक्त ठरलं असतं. म्हणूनच साम्यवाद प्रस्थापित होण्यास समाजाची बौद्धिक तयारी झाली पाहिजे आणि वैयक्तिक हितापेक्षां सामाजिक कार्याचं महत्त्व अधिक आहे हें प्रत्येक माणसाला समजण्याएवढा मानसिक बदलही झाला पाहिजे."

शशिधरच्या भाषणामुळें दमन कांहीं वेळ विचारमग्न झाला. पण तो पुन्हां म्हणाला, "शशी, स्वार्थी वृत्ति हा मनुष्याचा स्वभावधर्म असेल असं खात्रीनं म्हणतां येत नाहीं. कारण स्वार्थबुद्धि म्हणतात ती अन्नाच्या आणि इतर आवश्यक गरजांच्या अशाश्वतीमुळंच निर्माण झाली आहे. हा आर्थिक अनिश्चितपणा दूर केल्यानंतर हा मनोविकार तसाच राहील असं मला वाटत नाहीं. शिवाय मनुष्यानं एकमेकांच्या स्वार्थी हेतूस निर्बन्ध घालण्यासाठींच तडजोड करून राजसत्तेला कायदे करण्यास संमति दिली आहे. शशी, साम्यवाद हा बुद्धिवाद आहे हें खरं आहे आणि बुद्धिवाद हा शारिरीक सामर्थ्यावर उभारण्याचा प्रयत्न फोल आहे हें देखील मला समजतं. परंतु भांडवलशाहीच्या सुलतानशाहीचं प्रदर्शन करूनच आपल्याला हा बुद्धिवाद शक्य तों लवकर यशस्वी करण्यासाठीं समाजाची मनोभूमिका तयार करणं आवश्यक आहे. श्रमजीवि लोकांना आपल्या मानसिक आणि शारिरीक अधोगतीची व गुलामगिरीची जाणीव करून दिली पाहिजे. आणि भांडवलशाहीला आपल्या स्वार्थी, दुष्ट कृत्यांची जाणीव झाली पाहिजे म्हणजेच ते आगामी प्रलय थांबवू शकतील असं मला वाटतं. पण

भांडवलशाहीच्या भागीदारास ह्या गोष्टीचं महत्त्व आज यत्किंचित्‌ही वाटत नाहीं. पण साम्यवाद हा भांडवलशाहीचाच पुत्र आहे व तो बापाच्या जुलुमाला कंटाळून कुटुंबांतील व्यवहारांत हक्क मागतो आहे. वडिलोपार्जित संस्कृतीच्या इस्टेटींत आपला हक्क सांगतो आहे. जर बापानं हट्टानं त्याच्याकडे सर्वस्वीं दुर्लक्ष केलं तर चवताळलेला हा पुत्र कधींतरी आपल्या पूज्य पित्याचा सर्वस्वी नाश स्वहस्तानं केल्याशिवाय राहावयाचा नाहीं. भांडवलशाही आज आपल्या ऐश्वर्याच्या गुंगींत आहे. पण चिथावलेला जनसमूह हा पशुवृत्ति धारण करीत असतो आणि त्या वेळीं तो कितीही पवित्र मानलेल्या संस्थेचा, व्यक्तीचा नाश एखाद्या हिंस्र पशूप्रमाणं क्रूरपणं करील याचा नेम नाहीं. त्या वेळीं स्वतःच्या राजाला, सौंदर्यसंपन्न निष्पाप राणीला आणि राजघराण्यांतील बालकांना लोकांनीं स्वहस्तांनीं मोठ्या थाटानं मारल्याचीं उदाहरणं फ्रान्सच्या, इंग्लंडच्या आणि रशियाच्या इतिहासांत दिसत असतांना भांडवलदारांनीं अजूनही निजून रहावं ना? शिवाय भांडवलदाराचे सर्वच पुत्र कांहीं भांडवलदार होतात असं नाहीं तर पुष्कळ वेळां पुत्रांपैकीं एखाद्यालाच ती संधि मिळत असते हा विचारही त्यांच्या मनाला शिवत नाहीं. शशी, मी जगाकडं आशेनं आणि अपेक्षेनं कितीही पाहण्याचा प्रयत्न केला तरी शेवटीं तहानेनं व्याकुळ होऊन तडफडून आपण प्राण सोडणार का? हा भयंकर विचार माझ्या मनाला घेरून टाकतो. Oh man, get up and be wise before it is too late. औट घटकेच्या राज्यांत कशाला एवढी क्षुद्र स्वार्थबुद्धि?"

दमनचा कंठ दाटून आला. त्याच्या डोळ्यांतून घळघळ अश्रूधारा वाहूं लागल्या. जगांतील दुःखाबद्दल त्याला एवढा आपलेपणा वाटावा याचें शशिधरला आश्चर्य वाटलें. कांहीं वेळानें दमन घोगऱ्या स्वरांत पुन्हां म्हणाला, "शेलेप्रमाणं मलाहि I should weep my soul असं वाटतं. मनुष्याला एखाद्या ध्येयाचा नाद लागला कीं त्यांतच त्याला आनंद वाटतो. त्याच्यासाठीं धडपडतांना येणाऱ्या अडचणी त्याला सुसंधि वाटतात. मी हाल अपेष्टा सोसतों आहें, स्वार्थत्याग करतों आहें असं मला वाटतच नाहीं. ध्येय हाच माझा अन्तीम धर्म होतो आणि

त्यांतच कांहीं असे क्षण येतात कीं, हाच कदाचित् ब्रह्मानंद असेल असं मनाला वाटूं लागतं."

शशिधरच्या मनांत निराळेच विचार चालले होते. वैद्यकीय धंद्यांमुळें दमनच्या मानसिक वृत्तीकडे तो अतिशय साशंकदृष्टीनें पहात होता. कदाचित् त्याच्या मनोवृत्तीला संन्यासी वळण लागेल ही भीति त्याला वाटत होती. परंतु तो साम्यवादाला आतां विसरेल हें त्याला बिलकुल शक्य दिसत नव्हतें. रुबी आणि कमला यांनीं त्याचा प्रणयभंग केल्यामुळें जीविताबद्दल वाटणारी लालसा लुप्त झाली असावी. शिवाय त्याला बौद्धिकसहवास देईल अशी स्त्री त्याच्या अलीकडच्या बेफिकीर वर्तनामुळें त्याच्या सहवासांत येईल हें देखील असंभवनीय होतें. एकाद्या तरुणीनं त्याच्याशीं स्नेह करावयाचा यत्न केल्यास तो तिला प्रोत्साहन न देतां उलट तिच्या भावनांची जाणीव आपल्याला नाहीं असा बहाणा करीत असे व यामुळें अनेक तरुणी त्याच्याकडे प्रेमभावनेपेक्षां आदरानें पाहूं लागल्या होत्या.

दमनचीं सार्वजनिक भाषणें अत्यंत स्फूर्तिदायक व तेजस्वी असत व त्याच्या जहाल तत्त्वांचा गौरव करावा असें कितीही वाटलें तरी साधारण समाजाला त्याचा मतितार्थही समजत नसे; यामुळें आपणाला एकप्रकारच्या उदात्त आणि बुद्धिप्रधान वातावरणाचा अनुभव मिळाला एवढेंच मानून साधारण जनसमूह त्याच्या तत्त्वाबद्दल फारसा विचार करीत नसे. त्याचे मासिकांतून येणारे लेखदेखील विशिष्ट वाचकवर्गच तेवढा वाचीत असे; कारण तें वाङ्मय प्रचारकार्यास्तव लिहिलें आहे असा साधारण वाचकाचा पूर्वग्रह झालेला असे.

पण दमनला मात्र त्याबद्दल कोणत्याही प्रकारें खेद वाटत नव्हता. त्याच्या ठिकाणीं उत्पन्न होणारी निरिच्छवृत्ति दिवसेंदिवस बळावत होती. शशिधर त्याच्या ह्या मनोवृत्तीचें मानसशास्त्रदृष्ट्या विश्लेषण करीत होता.

दमनला त्याच्या आईनें उदात्त शिक्षण दिलें होतें. त्याच्या प्रत्येक जिज्ञासेचें समाधान करतांना तिनें आपल्या सांपत्तिक स्थितीचा विचार केला नव्हता, दुःखितांची स्थिति दाखवून तिनें त्यांच्याकडे सहानुभूतीनें

पहाण्याचें बाळकडू त्याला पाजलें होतें. यामुळें त्याच्या कुशाग्रबुद्धीला आईच्या मानसिक यातनांची जाणीव झाली होती. समाजाच्या पक्षपाती-वृत्तीमुळें प्रत्येक सामाजिक संस्थेकडे तो तुच्छतेनें आणि साशंकपणें पहात होता. बंदिवासांत असतांना तो एकटेपणानें देशांतील प्रत्येक राजकीय, धार्मिक आणि सामाजिक संस्थेचें निःपक्षपातीपणानें पृथःकरण करूं शकला आणि त्यामुळेंच त्याची त्यागी वृत्ति दृढ झाली होती.

"दमन" शशिधर गंभीरपणें म्हणाला, "तारुण्याच्या ऐन अमदानींत तूं आपल्या बौद्धिकसामर्थ्यानं जगाचा बराच अनुभव घेतला आहेस. तुझ्या आयुष्यांत असे कांहीं योगायोग आले कीं अखेरच्या आयुष्याच्या कालांत उद्भवणाऱ्या परिस्थितीची कल्पना तुला ह्या बालवयांतच आली. आणि उदार शिक्षणामुळं मन आत्मनिरीक्षण करूं लागलं आहे. पण दमन, ध्येयवाद्याचा गौरव त्याच्या मृत्यूपूर्वी क्वचित्च होतो हें लक्षांत ठेव. त्याला आयुष्यांत अनेक आपत्ती, छळ आणि निर्भत्सना सहन करावी लागते. ज्या मानवाच्या सुखासाठीं तो आपल्या सर्वस्वाला मूठमाती देतो त्या पुण्यात्म्याला पुष्कळ वेळां अडाणी मानवाच्या हातांनीं दारुण मृत्यु येतो. अरे, तुला तुझ्या कार्यात आनंद होत असेल तर त्यापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न करणं खेदाची गोष्ट आहे. पण हें बघ, तुझ्या आईला यापुढं तरी तिच्या राहिलेल्या आयुष्यांत कांहीं भयंकर प्रसंग पहाण्याची पाळी आणूं नकोस. एका विवक्षित मर्यादेंत राहून कांहीं काळ तरी कार्य कर. अलोट स्वार्थत्याग करावयाची ही सुसंधि तुला वाटत असली तरी मानव-संस्कृतीसाठीं याहून उदात्त स्वार्थत्याग करण्याची सुवर्णसंधि पुढं अनेक वेळां तुला लाभेल. दमन, केवळ हट्टानं आणि भावनावश होऊन धोक्यांत घालण्याइतकं हें जीवित खास बिनमोल नाहीं. तुझ्यासारख्या बुद्धिवान्, कार्यवाहक माणसांनीं बंदुकीच्या गोळीला अगर इतर अपघाताला बळी पडणं योग्य नाहीं. जागतिक संस्कृतिसाठीं व कार्यासाठीं त्यांच्या बुद्धिसामर्थ्याचा उपयोग किती तरी होणं आवश्यक आहे. अरे, रणक्षेत्रावर जाऊन प्रतिभासंपन्न कलावंतांनीं, चित्रकारांनीं आणि संशोधकांनीं जर आकस्मित मृत्यूला आपल्या जीवाचा बळी दिला तर त्याबद्दल

त्यांचा तिरस्कारच करणं योग्य होईल. कारण त्यांनीं रणक्षेत्रावर मरण्यापेक्षां अन्य मार्गानंच देशाची सेवा जास्त केली असती."

शशिधर आपल्याला आपल्या निश्चयापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न करीत आहे हें जाणून दमन खिन्नपणें हंसत म्हणाला, "शशी, तुम्ही निष्कारण एवढे घाबरतां आहांत. आजच्या व्याख्यानाला गेलों तर तिथं माझे प्राण घेण्याचा कुणीतरी प्रयत्न करील असं तुम्हाला वाटतं का? अरे, प्राण घेणाऱ्याला आणि प्राण देणाऱ्याला दोघांनांही आपल्या जीविताचा लोभ असतो. चल, आई त्या भाई सदानंदाशीं काय बोलते आहे कुणास माहीत. आवेशाच्या भरांत ती कदाचित् त्यांचा अपमान करील."

एवढें बोलून तो दिवाणखान्यांत गेला. पण तेथें शकुन्तलाबाई व अनामिका याशिवाय कुणीच नव्हतें. त्याला पहातांच अनामिका एकदम म्हणाली, "दादा, संप पुकारला जाणार नाहीं. मात्र तूं आजच्या सभेला न जाण्याचं वचन दे."

"म्हणजे!" दमन आश्चर्यानें उद्गारला, "मग वर्तमानपत्रांतील मजकूर खरा नाहीं काय?"

"नाहीं दमा," शकुन्तलाबाई प्रेमळपणें म्हणाल्या, "ती सर्व वर्तमानपत्रांची कारवाई आहे असं भाई सदानंद म्हणाले. आजच्या सभेचा संप पुकारण्याचा मानस नाहीं याबद्दल भाई सदानंदानीं आश्वासन दिलं आहे."

"पण ते म्हणाले," अनामिका मध्येंच म्हणाली, "आम्हाला संप यशस्वी झालाच पाहिजे असं नाहीं. संपामुळं होणाऱ्या हालअपेष्टामुळं हा निर्बल मजूरवर्ग शेवटीं निराशेनं तरी भांडवलशाहीवर उलटेल असं आम्हाला खात्रीनं वाटतं. जगांत उत्पन्न होणाऱ्या रोगराईनं, दुष्काळानं आणि भांडवलशाहीच्या छळामुळं हा मजूरवर्ग अखेरीस मृत्यूची यत्किंतही पर्वा न करतां क्रान्ति करील तर ती आम्हाला पाहिजे आहे. पण दादा, त्यांना आईनं सारखं उत्तर दिलं. आपल्याला ह्या हालअपेष्टांची किंचितूही झळ लागूं न देणाऱ्या आणि सुखानं आयुष्य काढणाऱ्या मजूर-

पुढाऱ्यानं हें संपाचं तत्त्वज्ञान सांगावं हें किती लांछनास्पद आहे! तें एखाद्या दारुण आपत्ति सहन करणाऱ्या मजुरानं सांगितलं असतं तर योग्य झालं असतं. अनेक निरपराधी मुलांबाळांना अन्नान्न करून तफडून मारून त्यामुळं तुम्ही क्रांती घडवून आणाल असं का तुम्हाला वाटतं? पण त्यांचा तो लढा बौद्धिक नसतो. आणि तो यशस्वी होण्यास जागतिक निदान ह्या देशाची प्रचलित परिस्थिति तरी अनुकूल नाहीं हें तुमच्या लक्षांत येत नाहीं. यापेक्षां मजुरांना सुशिक्षित करा, त्यांच्यामधील वेडगळ समजुती नष्ट करा, त्यानां संतति-नियमनाचं महत्त्व पटवून द्या म्हणजे हा मजूर-वर्ग आपल्या हक्कांची जाणीव होऊन भांडवलशाहीला सहजच शरण आणूं शकेल. दादा, भाई सदानंदांनीं आपणहीं आज संपाच्या विरुद्धच आहें म्हणून सांगितलं. पण तूं सभेस गेलास तर इतर कांहीं भाई पुढारी सभेंत दंगल उत्पन्न करतील असं ते म्हणतात."

"आई" दमन शांतपणें म्हणाला, "सभेस जाऊन व्याख्यान-बाजीची मर्दुमकी गाजविण्याचा माझा बिलकुल इरादा नाहीं. बरं ताई, मग रुबीला तार पाठवायला मला गेलं पाहिजे."

"दादा, आपणाला सिनेमाला पण जावयाचं आहे. आज माझा 'होमकुंड' हा चित्रपट लागायचा आहे. खरंच समाज सुधारणेसाठीं सिनेमासृष्टीचा केवढा उपयोग करून घेतां येईल हें आजचं चित्र पाहून तुला समजेल."

"पण तुझ्याबरोबर चित्र पाहण्याचंच मी ठरवलं आहें. त्या सिनेमा-गृहांत सर्व प्रेक्षक तुला एखाद्या देवतेप्रमाणं समजून पहाण्यास उत्सुक झालेले असतात, यामुळं तिथं आमचं सारं स्वातंत्र्य गमावलं जातं."

"दादा, समाज किती ढोंगी आहे रे! नटीच्या धंद्याकडं तुच्छ-तेनं पहाणारा हा समाज आज माझ्या मासिकाच्या मुखपृष्ठावर फोटो देऊन, माझ्या मुलाखती घेऊन माझा केवढा गौरव करतो आहे! निरक्षर समाजाला शिक्षण द्यायला चित्रपट हा किती आवश्यक आणि सुलभमार्ग आहे! पण तुझ्या भांडवलशाहीनं मनुष्याच्या दुबळ्या मनोवृत्तीचा आणि धार्मिक अंधश्रद्धेचा फायदा घेऊन ह्या कलेचा अगदीं वेश्येप्रमाणं केवळ

पैसा मिळविण्याकरतांच उपयोग चालविला आहे. एक वेळ प्रचारकार्य करतांना तें पचनीं पडण्यासाठीं किंवा प्रेक्षकाच्या मनावर बिंबविण्यासाठीं भावनांचं किंवा विकारांचं आविष्करण केलं तर त्याचं समर्थन करतां येईल. पण बीभत्स शृंगारानं भरलेले, प्रेमभावनेचे हानिकारक आणि मानसशास्त्र-दृष्ट्या असंभवनीय स्वरूप दाखविणारे अद्‌भुतरम्य चित्रपट दाखविण्याची कायद्यानें बंदी होईपर्यंत आजची भांडवलशाही असेच किळसवाणे चित्रपट तयार करणार आणि आम्हांला धंदा या दृष्टीनं मार्केटकडं पाहिलं पाहिजे म्हणून समर्थनही करणार. पण हें चित्र पुरं झाल्यावर मी कंपनी सोड-णार आहें."

"ताई, ज्या कंपनीच्या नोकरीमुळं तुला एवढा लौकिक मिळाला ती कंपनी तूं सोडणार!" दमन आश्चर्यानें म्हणाला.

"दादा, अजूनपर्यंत खऱ्या गोष्टी मी तुमच्यापासून लपविल्या होत्या." अनामिका पुढें सांगूं लागली, "झाले त्या प्रकाराला आठदहा दिवस. रात्रीचं शूटिंग चालू व्हावयाचं होतं. मी माझ्या खोलींत आरशा-समोर बसून रंगत होतें. इतक्यांत दारावर कुणीतरी थाप मारू लागलं. मी चटकन् शरीराभोंवतीं वस्त्र गुंडाळून उभी राहिलें व कोण आहे? म्हणून प्रश्न केला."

त्या प्रसंगाची आठवण होऊन अनामिकेचें शरीर रोमांचित झालें. तिच्या चेहऱ्यावर भीति स्पष्ट दिसत होती. तिच्या भुंवया वक्र होऊन डोळे मोठे दिसत होते. आवाजांत एक प्रकारचा कंप होता. ती हलक्या स्वरांत पुढें म्हणाली, "अजूनही त्या गोष्टीची आठवण झाली, कीं अंगावर शहारे येतात. दारावरील आवाजच असा कांहींतरी भीतीप्रत होता! मी मोठ्या धीरानें दाराकडे पहात उभी होतें तोंच 'मी चंपा' हे शद्ब मला ऐकूं आले. मला निष्कारण वाटलेल्या भीतीबद्दल विषाद वाटला व सुस्कारा सोडून मी दार उघडलं तोंच आमच्या कंपनीचा मालक रामदास पुढ्यांत उभा राहिला. चंपा मागं वळून बाहेर गेली. मीही बाहेर गेलें असतें पण माझ्या अंगा-वर भरपूर कपडे नव्हते, शिवाय रामदासानं चटकन् खोलीचं दार मिटलं व तो खदखदां हसूं लागला. त्यावेळीं त्याच्या तोंडांतून दारुची दुर्गंधी भकसन् बाहेर पडली."

बोलतांना अनामिकेचा चेहरा अतिशय व्यग्र झाला होता. दमन व शशिधर तो वृत्तांत तन्मयतेनें ऐकत होते.

"दादा," अनामिका चिडून पुढें उद्गारली, "तो राक्षस आजपर्यंत अनेक गरीब नटींवर बलात्कार करून उन्मत्त झाला होता. दहा रुपयांची नोट अंगावर पडतांच त्याच्या वासना तृप्त करण्याकरतां आपल्या शरीराचा ताबा देणाऱ्या दुबळ्या स्त्रियांचा त्याला अनुभव होता. हंसत हंसत खिशांतून शंभराची नोट काढून त्यानें माझ्यापुढें केली. रागाच्या भरांत ती चटकन् घेऊन मी त्याचे तुकडे केले आणि 'शरम नाहीं वाटत चालता हो अगोदर.' असं म्हणून निकराच्या लढाईला सज्ज झालें. दादा, खरंच मला ह्या वृत्तपत्रांचा एवढा तिटकारा आणि किळस वाटतो म्हणून सांगूं! कोट्याधीश शेट रामदास, चित्रपट सृष्टीचा राजा म्हणून ह्या नराधम पशूचा फोटो देऊन त्याच्या चारित्र्याचा व औदार्याचा गौरव करणाऱ्या ह्या संपादकांच्या नरडीचा घोंट घ्यावा असं मला वाटतं. कुलीन स्त्रियांनीं चित्रपटसृष्टींत प्रवेश करावा कां करूं नये ह्याच्यावर पोकळ वाद माजविणारे हे वृत्तपत्रवाले आणि समाजशिष्ट यांनींच नटीचा धंदा हीन करून टाकला आहे. बिचारी नटी कितीही परीटघडीप्रमाणं स्वच्छ राहिली तरी तिच्या नैतिक वर्तनावर शिंतोडे उडविणाऱ्या समाजशिष्टांनींच तिचा अधःपात घडवून आणला आहे. समाजांत तिच्याभोंवतीं किती संशयित वातावरण असतें! वैवाहिक जीवनाची तर तिला आशाच सोडावी लागते. शेवटीं तिच्या आयुष्यांत असं कांहीं परिवर्तन होतं, कीं ती स्वतःलाच प्रश्न करते कीं या ढोंगी समाजाची कशाला पर्वा करा? चोरून आपल्या भेटीला लाचार झालेले श्रीमंत समाजशिष्ट, फोटोसाठीं वारंवार स्तुतिपर पत्र लिहिणारी तरुण मंडळी यांची पर्वा तिनं कां करावी? पैशाच्या आणि पगाराच्या जोरावर तिला वाटेल तें वैभव अनुभवतां येतं, समाजशिष्टांच्या बड्या बड्या क्लबाचे सभासद होतां येतं, तिच्या सभोंवार भीत भीत का असेनात, पण प्रतिष्ठित तरुण घिरट्या घालीत असतात. समाजाला हें कळत नाहीं कीं नटी ही देखील मनुष्यच आहे, तिलाही भावना आणि वासना आहेत. ह्या जगांत अनेक लोक कपटी आणि दुराचारी मार्गानं पैसा मिळवीत आहेत व

ऐश्वर्य भोगीत आहेत. पण त्यामुळें ह्या ढोंगी समाजाची सदसद्विवेकबुद्धि आणि सदभिरुची जागृत होत नाहीं. पण नटीचा आणि वेश्येचा पैसा पाहून मात्र यांच्या हृदयांत भयंकर वेदना सुरू होतात. खरंच, हा दुबळा मध्यम वर्ग अगदीं वेड्रा, भावनाप्रधान आहे."

"ताई, बर्फ कपाळावर ठेवला पाहिजे का?" दमननें तिचा वाढता आवाज ऐकून हंसत विचारलें.

त्याच्या ह्या भाषणानें अनामिकेचा आवेश एकदम खचला व ती देखील हंसत पुढें म्हणाली, "नको, नको, एवढं कांहीं तापलं नाहीं. खरंच दादा, सुशिक्षित नटी दिग्दर्शक, ध्वनिलेखक, चित्रदर्शक, संगीत दिग्दर्शक वगैरे अनेक माणसांसमोर तेजस्वी दिव्यापुढं, पावडरचे लेप चढविलेल्या अशिक्षित नटाबरोबर पुन्हां पुन्हां तालमीसाठीं प्रणयाचा अभिनय करते तेवढ्यावरूनच समाजानं तिच्या मनांत त्या नटाविषयीं प्रेमभावना आहेत असं समजावं किंवा त्या नटनटीचा अनैतिक संभव जोडावा ही किती क्षुद्रबुद्धि आहे!"

"ताई, बरं ह्या उपकथा नकोत. मला व्याख्यानं द्यायला आवडतात, पण तीं ऐकण्याचा मात्र अगदीं तेवढाच कंटाळा आहे. मग पुढं त्या रामदास शेटची गोष्ट सांग. अशी तूं रागावलीस कीं कॅमेऱ्याचं लेन्स् तडकन् फुटून जात असेल नाहीं? खरंच शशी, ताई किती सुंदर अभिनय करते नाहीं?"

"बरं बरं दादासाहेब, आपण किती शांत आणि गंभीर वृत्तीचे आहांत आम्हाला माहीत आहे. आमच्या दादाला झाल्या गोष्टीचा मात्र पटकन् विसर पडतो." ती पुढें म्हणाली, "रामदास राक्षस माझा हात धरणार होता इतक्यांत मी झटकन् रंगाचा डबा त्याच्या तोंडावर फेंकला. लगेच लोशनची बाटली पण फेंकली व त्याच्या डोळ्यांना तें झोंबलें. ही संधी पहातांच साडी घेऊन मी चटकन् निसटलें व पोलीस चौकीवर जाऊन तक्रार दिली. पण शेवटीं पोलीसांच्या आणि दिग्दर्शकाच्या आग्रहास्तव मी ती मागं घेतली व तेव्हांपासूनच मी रात्रींच्यावेळीं स्टुडिओंत जाण्याचं साफ नाकारलं आहे."

" ताई, " दमन थट्टेच्या उद्देशानें म्हणाला, " पण हेंच कथानक चित्रपटाला किती सुंदर होईल नाहीं ? "

" पण त्यांत कांहीं फेरफार करणं आवश्यक होईल. त्या नटीचा एक उतावळा भाऊ आहे. तो हा प्रकार ऐकून एकदम भडकतो आणि रागाच्या आवेशांत त्याला ठार मारतो आणि मग त्याच्यावर खुनाचा आरोप—"

बोलतां बोलतां अनामिका एकदम स्तब्ध झाली. तिचा चेहरा खिन्न झाला. रजनिकान्तप्रकरणाची आठवण होऊन तिला कसेंचसें वाटलें व अगदीं नकळतच तिची आर्त दृष्टी शशिधरकडे वळली. शशिधरही तिच्याकडे भान विसरून स्निग्धपणें पहात होता. त्यांचें दृष्टिमीलन होतांच दोघांच्याही हृदयांत विचित्र कालवाकालव झाली व झटकन् आपल्या मुद्रेवरील व दृष्टींतील मृदुभाव दडविण्याचा त्यांनीं निष्फल प्रयत्न केला. दोघांच्याही चेहऱ्यावर सलज्ज स्मित झळकलें. अनामिकेची भेदक दृष्टी त्याच्याकडे पुन्हां वळली व तिचा चेहरा आरक्त झाला. दमन स्पष्टपणें हंसूं लागला.

" दादा, हंसतोस कां ? " अनामिका साधेपणाचा आव आणून म्हणाली.

" कोण हंसतो आहे ? तूंच हंस आणि उलट मला विचार. खरंच शशी, बायकांची जात फार लबाड बुवा. पुरुषाला त्यांचे मार्ग बिलकुल कळायचे नाहींत. "

" पण तुझे मार्ग बायकांनाच काय पण मलाही कळत नाहींत. " शशिधर पुढें म्हणाला.

" कुठल्या आडमार्गानं जाऊन कोणत्या राजमार्गावर तूं पुन्हां उपटणार आहेस हेंच मला समजत नाहीं. "

" दमन, साम्यवादालादेखील लग्न आवश्यक असतं. आतां ही विचार करण्यासारखी बाब आहे. "

" वा, शशी, तूंच राजमार्गावर आलास. पण असं आहे, ताईचं लग्न जुळविल्याशिवाय दादानं लग्न करणं उचित नाहीं. "

" हं हं, माझी काळजी तूं करूं नकोस. मी कुणाशींही चार हात करायला समर्थ आहें."

" मग मी दाखविलं पाहिजे का, कीं हा सूर्य आणि हा जयद्रथ."

" नको नको, कृष्णदादानीं हें कृष्णकृत्य करण्याचं कारण नाहीं." अनामिका उसन्या फणकाऱ्यानें उत्तरली, " दादा, तुलाच मानसिक आणि बौद्धिक सहवासाची फार आवश्यकता आहे."

" पण त्यासाठीं हा उपाय नसून यानं अपाय मात्र खास होईल. काय शशी, तुला कसं वाटतं ! बरं, मग तुम्ही सिनेमाला जाणार आहांत ना ! मला येणं शक्य नाहीं. ताई, हा तुझ्याबरोबर आहे ना ! मग शशीच्या प्रकाशानं तुझं मुखकमल सहज प्रफुल्लित होईल आणि हृदयाला पाझर फुटेल. कारण चांदण्यानं दगड पाझरतो म्हणतात."

"दादा, हें कवित्व कधींपासून पाघळूं लागलास !" अनामिका आपले विकार दडविण्याचा प्रयत्न करीत म्हणाली.

"कुठंही प्रीतिसंगम पाहिला कीं कवीचं हृदय उचंबळून त्याला एकदम अशी काव्यस्फूर्ति होते."

दमनच्या त्या स्पष्ट व सूचक भाषणामुळें अनामिका एकदम ओशाळली. तिचा चेहरा आरक्त झाला. तिनें दमनला कांहीं तरी प्रत्युत्तर करण्यापूर्वींच तो तेथून निघून गेला. शशिधर अर्धवट हास्य करीत तिच्याकडे मुग्धपणें पहात उभा होता. कांहीं वेळानें अनामिका लाजत म्हणाली, " दादा, अगदींच वात्रट आहे. आणखी आईकडे जाऊन कांहींतरीच बोलायचा."

एवढं बोलून एकदां शशिधरकडे लाडिकपणें नेत्रकटाक्ष टाकून ती चटकन् आंत गेली. शशिधरच्या हृदयाचा ठाव घेण्याचा प्रयत्न त्या दृष्टींत होता. शशिधर आपल्याशींच विचार करीत होता. नॅन्सी आणि अनामिका त्याच्या दृष्टीसमोर उभ्या राहिल्या. दोघीही सौंदर्यसंपन्न, प्रेमळ, दोघांचाही दृढ स्नेहभाव, मात्र अनामिका अधिक धीट आहे, पण नॅन्सीची दूरदृष्टी तिच्याठायीं नाहीं. ज्या वेळीं बाबांनीं आपल्याला घराबाहेर काढला त्या वेळीं नॅन्सी माझ्या सुखासाठीं आपल्या सुखाचा नाश करण्यास तयार झाली.

माझ्या प्रेमाच्या दृढतेविषयीं ती किंचित् साशंक झाली. पण तीच अनामिका असती तर तिनंही माझ्याबरोबर उत्तराप्रत्युत्तरांत भाग घेतला असता व त्या घरांत आतां रहाणं उचित नाहीं असं सांगून बाहेर पडण्याचा सारखा आग्रह केला असता आणि त्या परिस्थितींत आपल्याला धीर दिला असता.

त्याच्या विचाराचा ओघ तसाच चालला असता, पण एवढ्यांत दमन परत तेथें येऊन म्हणाला, "शशी, आतां कसला विचार करतो आहेस? जाळ्यांत सांपडलेल्या पक्षानं पुन्हां उडून जाण्याचा प्रयत्न केल्यास तो अधिकच गुरफटून जातो हें लक्षांत ठेव. आणि भुकेनं व्याकूळ झालेला पक्षी दाणे दिसतांच जाळ्याचा विचार करीत नाहीं हेंही लक्षांत ठेव."

"दमन, पण आकाशांत उंच उंच भराऱ्या मारून व हवा खाऊन राहण्याचा प्रयत्न करणाऱ्या पक्षाला हें तत्त्वज्ञान कुठून समजलं?"

"बरं चल अगोदर, आई बोलावते आहे तुला चहाला."

शशिधर साशंकपणें त्याच्याकडे पहात हंसत आंत गेला.

"आई, हा बघ शशी आला. तूंच त्याला विचार." असें उगाचच म्हणत दमनही हंसत त्याच्याबरोबर आंत गेला.

---

# १६

"दादा, चल ना सिनेमाला." अनामिका दमनला खुर्चीवरून उठविण्याकरतां ओढीत म्हणाली.

"नाहीं. ताई, मी बिलकुल येणार नाहीं. तूं कांहीं एकटी नाहींस. मी आल्यामुळं तुला कांहीं अपाय झाला तर शशिधर डॉक्टर तुझ्याबरोबर आहे ना! शिवाय मला तुझे ते चित्रपट आवडत नाहींत मग तर झालं! आणखी तुझं रोज रोज घरांत चाललेलं नाटक पहातों आहेंच." दमन मिस्किलपणें हंसत उत्तरला.

"दादा, सरळ स्पष्ट बोल. हे बायकांसारखे टोमणे मारूं नकोस." अनामिका रागाचा आविर्भाव आणीत म्हणाली.

"ताई, हाच तुझा स्त्रियांबद्दलचा अभिमान का! बायकांना मग ही संवय असते ना!"

"तुझ्याबरोबर रिकामटेकडा वाद करायला मला वेळ नाहीं. तूं येतो आहेस कीं नाहीं! शशिधर कपडे करून तुझी वाट पहाताहेत." अनामिका अधिकच फणकाऱ्यानें म्हणाली.

"माझी वाट पहातो आहे! किती ढोंगी आहेस ग! जा त्याला शपथ घालून विचार. खरंच ताई, तुझा हा रागाचा आविर्भाव, अलीकडे घरांत चाललेला प्रणयाचा अभिनय आणि पावलोपावलीं दिसून येणारी रडण्याची नैसर्गिक कला दररोज पहात आहें आणखी सिनेमाचा त्रास आणि आग्रह कशाला!"

"दादा, तूं अगदीं खट्याळ आहेस. तुला यायचं आहे कीं नाहीं सांग बघूं! आठ वाजायला आले."

" मग वेळ कशाला ? टॅक्सी बोलावूं का ?" असें म्हणून दमन खिडकीकडे गेला व रस्त्यावरून जाणाऱ्या टॅक्सीला त्यानें उभी केली. " टॅक्सी उभी राहिली. चला आतां लवकर."

" माझ्याशीं तूं बोलूंसुद्धां नकोस. तूं अगदीं दुष्ट आहेस." अनामिका तोंड वेंगाडून म्हणाली.

" ताई, स्त्रियांच्या भाषणाचा उलट अर्थ घ्यावा असं मी ऐकलं होतं खरं. वेडे पोरी, तुला मी स्वार्थी म्हणत नाहीं. लबाड म्हणत नाहीं. जा तूं आतां. आईनं डोकं दुखतं आहे म्हटलं तें खरं असं तुला वाटलं का ?"

" होय, होय, आई तुझ्यासारखी ढोंगी नाहीं. तिचं संध्याकाळ-पासूनच डोकं दुखतं आहे." अनामिका जोरानें उत्तरली.

" मग आई फारच दूरदर्शी आहे असं दिसतं. खरंच, मी तुला सांगायलाच विसरलों. काल सकाळपासूनच माझं डोकं अगदीं भयंकर दुखतं आहे आणखी तूं आतां भडका करूं नकोस. चल बघूं मला झोपायचं आहे. चल चालती हो इथून."

इतक्यांत शशिधर तेथें आला.

" दादा, घेईन बरं याचा सूड." अनामिका चिडून रागानें म्हणाली.

दमन कांहीं न बोलतां खुर्चीवरून उठला. चेहरा गंभीर करून त्यानें हातांतील पुस्तक बाजूच्या टेबलावर ठेवलें. अनामिका त्याच्याकडे आश्चर्यानें पहात उभी होती. दमन सरळ तिच्याजवळ गेला व तिच्या बाहूजवळ पकडून तिला दाराबाहेर नेऊन म्हणाला, " शशी, पकड हिला आणि जा घेऊन, खालीं टॅक्सींत भर."

अनामिकेनें हात सोडवून घेतला व दमनला धक्का देऊन ती त्याला वेडावीत म्हणाली, " बरं बरं, आजपासून माझ्याशीं बोलत जाऊं नकोस."

" अच्छा, उद्यां सकाळीं आपण त्याचा विचार अवश्य करूं." असें म्हणून त्यानें हंसत खोलीचें दार बंद केलें.

" दादा अगदीं लबाड आहे." अनामिका लाजून म्हणाली, " मला वाटतं, आज त्यानं आणि आईनं न येण्याचा बेतच केला होता."

दोघेंही जिना उतरून खालीं आलीं. दारांत टॅक्सी उभी होतीच. तीं आंत बसत असतां दमन खिडकींतून पहात होताच. 'गुड लक' म्हणून तो मोठ्यानें ओरडला.

अनामिका आणि शशिधर सिनेमागृहांत पोहोंचलीं तेव्हां चित्रपट सुरू झालाच होता. त्यांना पहातांच मॅनेजर पुढें येऊन म्हणाला, " या, तुमचीच वाट पहात होतों. मुद्दाम बॉक्स ठेवली आहे तुमच्यासाठीं."

" थँक्स" अनामिका पुढें म्हणाली, " हे डॉक्टर शशिधर देशपांडे. हे मॅनेजर."

" डॉक्टर, ओ डॉक्टर!" मॅनेजर नकली हास्य करीत हस्तान्दोलन करून म्हणाला.

एवढ्यांतच अनामिकेला पाहण्यासाठीं रस्त्यावर गर्दी वाढत होती.

त्या वेळीं तिचा पेहराव साधाच होता तरी ती सुंदर व आकर्षक दिसत होती. ती पिरोजी रंगाची रेशमी साडी नेसली होती व त्याच रंगाचा बिनबाह्याचा ब्लाऊझ तिनें घातला होता. पदर पुढें घेऊन मानेजवळून पुन्हां तिनें तो मागें टाकल्यामुळें जांभळ्या रंगाच्या किनारीच्या सान्निध्यामुळें तिची नाजूक मान अधिकच आकर्षक दिसत होती. तिनें हातांत एकएकच बांगडी घातली होती. गळ्यांत कसल्या तरी निळसर मण्याची माळ रुळत होती व कानांतील झूल हालतांना त्या प्रकाशांत सारखे चमकत होते.

मॅनेजर त्यांना घेऊन लिफ्ट्‌मधून वरच्या मजल्यावर गेला व त्यांना बॉक्समध्यें बसवून आला.

समोरच्या रुपेरी पडद्यावर चित्र दिसत होतें. इतक्यांत अनामिका प्रथमच पडद्यावर चमकली तेव्हां प्रेक्षकांत एकदम गडबड झाली. अनामिका आपल्याशींच हास्य करून हळूंच म्हणाली, " खरंच, स्तुतीपेक्षां कलावंताच्या ऱ्हासास दुसरें एवढें वाईट साधन नसेल. कारण प्रशंसा ही एखाद्या नववधूसारखी आहे. प्रथमच तिला योग्य ती वागणूक दिली तर ती

सुखदायक होते, पण जर फाजील लाड केले तर मात्र ती कितीतरी त्रासाला कारणीभूत होते. पण काय हो, पुरुषांनीं कितीही जरी बढाई मारली तरी त्यांना स्त्रियांशीं कसं वागावं हें बरोबर समजणारच नाहीं. कारण ह्या शास्त्रांत सर्व साधारण विषयच मांडतां यावयाचे नाहींत. कदाचित् स्त्री ही काय चीज आहे हें न समजल्यामुळंच माणसानं तिच्यावर वाटेल ते आरोप लादण्याचा प्रयत्न केला आहे. मोठमोठ्या विचारवंतांनादेखील स्त्रीत्व न समजल्यामुळं त्यांच्या विचारांत विलक्षण विसंगती दिसते. शेक्स्पीयर-सारखा जगन्मान्य नाटककार एका वेळीं स्त्रियांचें आदर्शभूत म्हणून चित्र रंगवितो आणि त्याच लेखणीनं दुसऱ्या वेळीं Frailty thy name is woman (सारी स्त्रीजात तेवढी निमकहराम.) असं म्हणतो. स्मृतिकार मनुदेखील स्त्रियांना एका वेळीं देवता मानून नंतर त्यांच्यावर कडक नीति-निर्बंध घालतो."

बोलतां बोलतां ती मध्येंच थांबली. शशिधर तन्मयतेनें समोर पडद्याकडे पहात होता. प्रेमासाठीं घराचा त्याग करून आपल्या प्रियकराचा संसार स्वर्गमय करण्यासाठीं धडपडणारी प्रेमळ आणि निरागस नायिका तो पहात होता. प्रियकराला वैषम्य वाटूं नये म्हणून आपलं दारिद्र्य दडवून आपत्तीवर ठिगळया मारण्याचा प्रयत्न करणाऱ्या कारुण्य-मूर्ति तरुणीचा अभिनय अनामिका त्या भूमिकेशीं पूर्णपणें समरस होऊन करीत होती. त्यामुळें सभोंवार प्रेक्षकसमुदायांतून निघणारे सहानुभूतीचे सुस्कारे स्पष्ट ऐकूं येत होते.

शशिधरनेंही त्यावेळीं दीर्घ निश्वास टाकला. अनामिकेनें दचकून त्याच्याकडे पाहिलें. तन्मयतेनें तो समोर पहात होता. त्याचा चेहरा दु:खाकुल झाला होता. अनामिकेनें एवढा शोककारक प्रसंग तरी कोणता, हें पहाण्याकरतां आपली दृष्टी पडद्याकडे वळविली.

त्या प्रसंगांत अनामिका अतिशय तापानें विव्हळते आहे. परंतु प्रियकराला ऑफिसांतून रजा मिळत नसल्यामुळें आपणाला आज पुष्कळच बरें वाटतें आहे असा बहाणा करून ती त्याला निरोप देत होती व त्याचें पाऊल दाराबाहेर पडतांच आपल्या यातना असह्य झाल्यामुळें बिछान्यावर

एकदम अंग टाकून ती ढळढळां रडूं लागली. तें अत्यंत हृदयस्पर्शी दारुण दृश्य पाहून प्रेक्षकसमूहांतील स्त्रियांच्या डोळ्यांत अश्रू उभे राहिले. सिनेमागृहांत विलक्षण शांतता होती. अनामिकाही भान विसरून गेली होती. तिच्याही डोळ्यांतून अश्रूंचा ओघळ सुरू झाला होता. आंवढा गिळून तिनें रडें आवरण्याचा प्रयत्न केला. कांहीं अंतरावर पुढील खुर्चीवर बसलेल्या तरुणीनें हातरुमाल तोंडावर धरून एकदम हुंदका दिला. अनामिका एकदम दचकली. आपण केलेल्या अभिनयानें आपणच एवढं व्याकुल कां व्हावं ? असा विचार तिच्या मनांत आला. स्वाभिमानानें ती चित्रपटाकडे पुन्हां पाहूं लागली.

नायिका अन्तराळीं विचारशून्य मुद्रा करून पहात होती. पार्श्वसंगीतांतून अतिशय आर्द्र नादमधुर स्वर बाहेर पडत होते. अत्यंत दारुण व भेसूर परिणामाचं आगमन सूचित करणारे ते हृदयस्पर्शी स्वर दुःखानें ओथंबल्याप्रमाणें बाहेर येत होते. प्रेक्षकांच्या व्याकुळ मनोवृत्ति अगदीं तटस्थ झाल्या होत्या. शशिधरच्याही डोळयांतून दोन अश्रु चटकन् खालीं पडले. अनामिका त्याला स्पर्श करून मृदु स्वरांत म्हणाली. " शशी, I am not going to die here. ( मी इथं मृत्युवश होणार नाहीं. ) "

तिचा कंठ दाटून आला. शशीधरनें तिचा हात आपल्या हातांत घेतला व तो दाबून त्यानें स्निग्धपणें तिच्याकडे पाहिलें. खुर्चीच्या मागें टाकलेल्या डाव्या हातानें तिचा डावा बाहू पकडून तिला किंचित् जवळ ओढून तो प्रेमळपणें म्हणाला, " अनाम, खरी कला कलावंताच्या हृदयाचा ठाव घेत असते. चल आज हा चित्रपट यापुढं मला बघवणार नाहीं. It's highly emotional. चल आपण फिरायला जाऊं या का ? "

दोघेंही खुर्चीवरून उठलीं. एवढा सुंदर चित्रपट टाकून मध्येंच जाणारे हे अरसिक कोण ह्या अपेक्षेनें कांहीं प्रेक्षकांनीं मागें पाहून हास्य केलें.

सिनेमागृहाच्या बाहेर येतांच टॅक्सींत बसून तीं दोघेंही अपोलोबंदराकडे निघालीं.

ह्या वेळीं दहाचा सुमार झाला होता. हवेंत गारठा असल्यामुळें समुद्रकिनाऱ्यावर एकदम शांतता भासत होती. भरतीमुळें आणि वाऱ्याच्या

चिथावणीमुळें समुद्राला उन्माद चढला होता व उत्साहानें उचंबळत आपल्या लाटांनीं आघात करून, भूमीच्या तटाचें चुंबन घेऊन तो प्रणय-लीला करीत हंसत होता. पण आकाशभर सांवरीच्या कापसाप्रमाणें पसरलेल्या जाळीदार पडद्यांतून चंद्रमा पाहत आहे हें जाणून भूमी मात्र मुग्धपणें निश्चल उभी होती. त्या विस्तीर्ण देखाव्यावर मृदु चांदणें पसरलें होतें. किनाऱ्यापासून दूर अंतरावर तरंगत्या राजवाड्याप्रमाणें दैदीप्यमान परदेशी जहाजें निश्चलपणें उभीं होतीं. मधून मधून उंच पांढऱ्याशुभ्र शिडाच्या लहान लहान होड्या वाऱ्याच्या झोताबरोबर शिडें खालीं वर करीत मान नमवीत पोहणाऱ्या राजहंसाप्रमाणें समुद्राच्या पृष्ठभागावर नाचत होत्या.

शशिधर व अनामिका किनाऱ्यालगत एका बांकावर बसून समोरचा रमणीय देखावा पहात होतीं. बराच वेळ कुणींच कांहीं बोललें नाहीं. शेवटीं त्या चमत्कारिक शांततेचा भंग करण्यासाठीं अनामिका म्हणाली, "वारा किती गार वहातो आहे नाहीं?"

"हा माझा कोट घाल." असें म्हणून शशिधरनें आपला जाड लोंकरीचा कोट काढून तिच्या अंगाभोंवतीं गुंडाळला व तो पुढें म्हणाला, "अना, तुझा चित्रपट पाहून मला असं वाटलं कीं आज मी तुझ्या व्यक्तित्त्वाची एक लुप्त बाजू पाहिली. तुझ्या प्रत्येक हालचालीकडं पहातांना त्याच्या मागं असलेली अन्तस्थ भावना आविष्कृत होत होती."

"शशी," एवढेंच बोलून अनामिकेनें त्याच्याकडे आर्द्र दृष्टीनें पाहिलें. त्या चांदण्याच्या प्रकाशांत अश्रूमुळें तिचे डोळे चमकत होते. आपल्या दोन्ही हातांनीं त्याचा हात तिनें घट्ट दाबला व गहिंवरून ती पुढें म्हणाली, "माझ्या हृदयाचा मलाच संशय वाटतो. माझ्या सुखासाठीं, स्वार्थासाठीं तुमच्या प्रेमाची अपेक्षा तर मी करीत नाहीं ना, असा विचार माझ्या मनांत विलक्षण कालवाकालव करीत असतो."

बोलतां बोलतां ती एकदम स्तब्ध झाली. आवंढा गिळून तिनें शशिधरकडे पाहिलें व त्याचा हात तिनें आपल्या गालावर दाबला. त्या वेळीं तिचे दोन अश्रु त्या हातावर पडले. ते आपल्या पदरानें ती पुसूं लागली.

" अनाम, आणि अगदीं असंच मलाही वाटलं. तुझ्या उदार हृदयाचा आसरा मला मिळाला तर मी किती सुखी होईन असं सारखं वाटत असतं मला. तुझ्या सहवासांतच मी माझं दुःख विसरूं शकलों. हताश मनोवृत्ति पुन्हां उमलली. दमन, तुझी आई आणि तूं यांच्या प्रीतिनिर्झराच्या त्रिवेणीसंगमांत धुऊन निघाल्यामुळं पुन्हां जीविताकडं आशेनं आणि अपेक्षेनं पहाण्याचं मनोधैर्य मला वाटूं लागलं. "

शशिधरनें आपल्या डाव्या हातानें तिला जवळ ओढून हृदयाशीं धरली व उजव्या हातानें तिची हनुवटी वर करून अधरांचें त्यानें चुंबन घेतलें. अनामिकेनें त्याचा चेहरा आपल्या नाजूक हातांनीं घट्ट धरून कांहीं वेळ डोळे मिटले. तिच्या नेत्रांतून अश्रूंचे ओघळ गालावरून वहात होते.

" अनाम " शशिधर गहिंवरून म्हणाला, " जग मला स्वार्थी, कपटी, दुराचारी म्हणेल. पण तुझ्याबद्दल मला वाटणारी प्रेमभावना तुला तरी समजते आहे ना ? "

अनामिका कांहींच बोलली नाहीं. शशिधरचा चेहरा आपल्या हातानें ती चांचपीत होती. आपल्या बोटांनीं त्याच्या गालावर स्पर्श करून तिनें त्याच्या अधरावर पांचही बोटें दाबलीं. शशिधरनें तोच हात घट्ट धरून तळहाताचीं अनेक चुंबनें घेतलीं. तिनें एकदम त्याच्या मानेला दृढ मिठी घातली व त्याच्या पिळदार खांद्यावर डोकें ठेवून ती आनंदाश्रू गाळूं लागली.

दोघांचाही श्वासोच्छ्वास अडखळत बाहेर पडत होता. अनामिकेचें अंग रोमांचित झालें होतें. तिच्या सबंध शरीरांतून कसल्या तरी आवेशपूर्ण लहरी उत्पन्न होऊन हृदयांत एकत्रित होत होत्या. तिनें आपलें मुखकमल वर करून अर्धोन्मीलित दृष्टीनें शशिधरकडे पाहिलें. त्यानेंही आपलें तोंड खालीं करून तिच्या अधराला आपले ओंठ भिडविले व आपल्या हातांनीं तिला हृदयाशीं घट्ट धरून ठेवली.

आपण मधुरस्वप्नांत आहों असें अनामिकेला वाटत होतें. दोघेंही त्या स्थितींत बराच वेळ निश्चल राहिलीं होतीं. आकाशभर पिंजरलेले ढग वाऱ्यानें पुन्हां आकाशाच्या निळ्या अफाट गादींत भरून त्यावर तारकांचे सुंदर बंध बांधले होते. त्या रमणीय देखाव्यावर चंद्राचें शीतल चांदणें स्वच्छ-

पणें ओतलें होतें. ताजमहाल हॉटेलच्या बाजूनें बाहेर पडणाऱ्या मोटारच्या दिव्याचा प्रखर प्रकाशझोत त्याच्या अंगावर पडतांच शशिधरनें तिला आलिंगनांतून मुक्त केलें. अनामिकेला क्षीणता आली होती. कांही वेळ गेल्यावर ती प्रेमार्द्र स्वरांत म्हणाली, "शशी, जीविताच्या प्रवाहांत पोहतांना आपण एकमेकांना सोबत करून सहज पैलतीरावर पोहचूं. गतकालाच्या कटुस्मृतींचं चित्र डोळ्यापुढं उभं करून दुःखाश्रूंनीं समोरचा आशाजनक देखावा कां बरं दूर करावा? शशी, नॅन्सीची पुण्यस्मृति माझ्याही हृदयांत वास करते आहे. तिनंच आपल्या लाडक्या शशीची सर्व जबाबदारी माझ्यावर सोंपविली असंच मी समजतें."

शशिधरनें तिचा हात आपल्या हातांत घेतला व दीर्घ निश्वास टाकून तो शांतपणें म्हणाला, "अनाम, चल जाऊं या ना? बरीच रात्र झाली असावी. उजाडेपर्यंत असं या आल्हाददायक वातावरणांत बसायला किती आनंद वाटेल बरं! खरंच, आत्मघाताला उद्युक्त झालेल्या भ्रमिष्टाला पुन्हां आशा आणि आकांक्षा या अफाट रस्त्याच्या नाक्यावर सोडण्याचं श्रेय तुला आणि तुझ्या दादालाच आहे. जीवन हाच ज्याला अत्यंत असह्य रोग वाटत होता आणि जो मरणाच्या एकच अन्तिम उपायाची अत्यंत उत्सुकतेनं वाट पहात होता, त्या हताश रोग्याला डॉक्टर बनविण्याचं तुम्ही कार्य केलंत. अनाम, तुझ्या दादाचे ते स्फूर्तिदायक शब्द आतां मृत्यूशिवाय माझ्या स्मरणशक्तींतून जाणं शक्य नाहीं. मी आतां बेळगांवला दवाखाना काढण्याचं ठरविलं आहे. आपण तिथंच विवाह करूं."

एवढें बोलून त्यानें वांकून तिच्या गालाचें एकवार चुंबन घेतलें व दोघेंही नाकावरून उठलीं. अनामिकेनें कोट काढून शशिधरच्या अंगांत तो चढवीत म्हटलं, "शशी, तुझ्या औदार्याचा मी वाटेल तसा उपयोग करून घेतें आहे ह्या कल्पनेनं मला अगदीं लाज वाटते."

शशिधरनें तिला जवळ ओढीत म्हटलें, "अनाम, माझ्या मनांतील बोल बोलून मला अशी हिणवूं नकोस. प्रेमभावना ही स्वार्थीच असते.

परंतु परस्परांच्या स्वार्थांवरच दोघांनाही उदात्त भावनांचा आणि खऱ्या आनंदाचा अनुभव मिळवितां येत असतो."

"खरंच बाई," अनामिका प्रेमाकुल स्वरांत म्हणाली, "तुम्ही असे बोलूं लागला कीं आपण डॉक्टर नसून बडे तत्वज्ञानी आहांत असं वाटूं लागतं मला. दादा तुम्हां डॉक्टरांची नेहमीं थट्टा करीत असतो. त्या दिवशीं तो मला सांगतो कीं 'ताई, शशी प्रेमळ असला तरी डॉक्टर आहे. शारिरीक हृदयरोग त्याला समजत असेल. पण तुझ्या मानसिक हृदयरोगाची त्याला कदाचित् जाणीव व्हावयाची नाहीं, तेव्हां, उगाच त्याच्यावर ढोंगीपणाचा आरोप करशील."

तिनें कौतुकानें शशिधरकडे पाहिलें. दमनशीं झालेले विनोदयुक्त बौद्धिक वाद त्यालाही आठवून तो हंसत म्हणाला, "खरंच दमनचं म्हणणं कांहीं चूक नाहीं. आम्हा डॉक्टरांना मृत्यु आणि जन्म ह्या गोष्टी सरावाच्या झाल्या असल्यामुळं जन्माचं कुतूहल आणि मृत्यूचें औदासिन्य एवढंसं वाटतच नाहीं. वैद्यकीय धंद्यांतील माणसं बहुतेक याच मनोवृत्तीचीं असतात, यामुळं भावनांची जोपासना होणंच असंभवनीय असतं. त्याचं हेतुपुरस्सर पोषण केलं तरच तें डॉक्टरला शक्य आहे."

अनामिका आपल्याच मधुर कल्पनांत गुंग होती. तिनें जरी लडिवाळपणें हंसत त्याच्या भाषणाकडे लक्ष असल्याचा बहाणा केला होता तरी तिच्या शून्य दृष्टीकडे पहातांच मनांत वेगळेच विचार चालले असावेत हें सहज ताडतां येत होतें. ती हंसत पुढें म्हणाली, 'घरीं गेल्यावर दादा आपली पुष्कळ थट्टा करणार. खरंच, त्याला अनुरूप अशी पत्नी मिळाली पाहिजे. पण तो विवाह करील असं मला वाटतच नाहीं. त्याला आपल्या जीविताची तर बिलकुल पर्वा वाटत नाहीं. माझ्या मैत्रिणींनीं त्याचीं भाषणं ऐकलीं किंवा लेख वाचले म्हणजे त्या दादाचा परिचय करून घेण्याकरतां मुद्दाम घरीं येतात. पण त्या वेळीं हा त्यांच्याशीं अगदीं निश्चल वृत्तीनं वागतो. त्याच्यासारख्या कुशाग्र बुद्धीच्या माणसाला त्यांच्या आकांक्षा आणि भावना समजत नाहींत असं नाहीं; कारण त्या गेल्या म्हणजे मात्र मला दम भरतो आणि विचारतो, 'ताई, मी म्हणजे तुझ्या मैत्रिणींना

सार्वजनिक देवळांतील शेंदरी मारुती वाटतों का ग, कीं ज्यानं त्यानं चिमटा घेऊन त्याला वेदना कराव्या ? तूंच लबाड आहेस. पण तुला पुन्हा सांगतों कीं त्या मारुतीला कितीही स्त्रियांनीं कितीही जरी डवंचला तरी तो खरा ब्रह्मचारी आहे आणि तो ब्रह्मचारीच रहाणार.'

दमनचें भाषण आठवून अनामिकेला मनापासून हसूं आलें. शशिधरही हंसत तें भाषण ऐकत होता. ती हसें आवरण्याचा प्रयत्न करीत पुढें म्हणाली, "त्या दिवशीं तो मला विचारतो, 'ताई, तुम्ही बायका त्या बिचाऱ्या दत्त आणि मारुती ह्या दोन ब्रह्मचाऱ्यांच्याच एवढ्या मागं कां ? कां त्या बिचाऱ्यांना सतावतां ?"

ती पुन्हां मनसोक्त हसूं लागली. शशिधर हसें ओसरतांच म्हणाला, "खरंच, दमनच्या औदार्यामुळेंच त्याच्या गुणाचं चीज होत नाहीं. आपल्याला महत्त्व मिळावं, आपला गौरव व्हावा असं आतां त्याला वाटेनासंच झालं आहे. शिक्षण पूर्णपणें संपादन करून आयुष्याच्या मध्य-कालांत जर त्यानं साम्यवादाचं ध्येय ठरवलं असतं तर आज हिंदुस्थानांतच नव्हे तर अखिल जगांत कदाचित् त्याची आन्तरराष्ट्रीय व्यक्ति म्हणून प्रसिद्धि झाली असती. आपला ध्येयवाद प्रतिपादन करतांना सभोंवारची परिस्थिति अनुकूल अगर प्रतिकूल आहे याचा विचार करण्याचं त्याला महत्वच वाटत नाहीं. लोकनिंदेचा त्याला विषाद नाहीं किंवा प्रशंसेनंही बेहोष झाल्यासारखं त्याला वाटत नाहीं. ध्येय हें एक व्यसनच त्याला जडलं आहे आणि त्याच्यासाठीं कितीही अलोट स्वार्थत्याग करतांना त्याच्या मनाला यत्किंचित्ही भीति वाटत नाहीं. अना, दैव अनुकूल असलं तर हिंदुस्थानच्या इतिहासांत त्याचं नांव राहील असं मला वाटतं."

अनामिका खिन्नपणें ऐकत होती. आकाशांत ढगाआड चंद्र पुन्हा लपला होता. दमनच्या जीविताबद्दल अनामिकेच्या मनांत एकदम भीति उत्पन्न झाली. विचारमग्न होऊन ती निमूटपणें चालली होती. कांहीं वेळ गेल्यावर ती उदासपणें म्हणाली, "माणसाला सुखी व्हावयाचं असेल तर जगाचा नियमितच परिचय असावा लागतो. दादाला जीवि-ताचं बरंचसं रहस्य एवढ्या वयांतच कळल्यासारखं झालं आहे. त्याला

कळतं कीं मोठमोठ्या राजसत्ता लयास गेल्या, कुबेरासारखे क्रोडोपति धुळीस मिळाले. एका काळीं महान् महान् समजल्या जाणाऱ्या व्यक्तीदेखील जगाच्या इतिहासांत उल्लेखिल्या जात नाहींत. आपल्या घराण्याचा अभिमान बाळगणाऱ्या माणसांना जर दीर्घायुष्य लाभलं तर आपला वंश निर्मूलन होत असल्याचं प्रत्यक्ष डोळ्यांनीं पहावं लागतं. या साऱ्या गोष्टी त्याच्या दृष्टीसमोर उभ्या राहतात. तो म्हणतो, 'लहानपणीं भयंकर आजारांतून पुनर्जन्म झाला. पोहोतांना बुडून मरण्याचा प्रसंग आला होता. खुनी ठरून फांसावर चढण्याचा संभव होता आणि ह्या तिन्ही प्रसंगीं मृत्यू आला असता तर तो निरर्थक ठरला असता. यापेक्षां माझ्या उदार ध्येयामुळं मला कधीं मृत्यूचं आमंत्रण आलं तर त्या वेळीं मनाचा धडा करून तें स्वीकारणं उचित नाहीं का होणार?' आईला त्याच्या भयंकर यातना होतात आणि तिच्यासाठींच त्याला आपलं पुढं पडणारं पाऊल कांहीं वेळ तरी आखडावं लागतं. खरंच, दादासारखा भाऊ मिळण्यासाठीं मी गेल्या जन्मीं असं कोणतं पुण्य केलं होतं कुणास माहीत."

अनामिकेचें हृदय भरून आलें, कंठ दाटून आला व तिच्या डोळ्यांत अश्रू उभे राहिले. कांहीं वेळ कुणींच बोललें नाहीं. त्या उदासीन शांततेचा भंग करण्यासाठीं शशिकांत मनगटावरील घड्याळांत पहात म्हणाला, "साडेदहा कधीं वाजायला आले हें समजलंच नाहीं. घरीं मामी वाट पहात असतील."

समोरून येणाऱ्या टॅक्सीला थांबवून त्यानें अनामिकेला आंत बसण्यास सांगितलें व आपणही मागोमाग आंत चढला. टॅक्सी चालू झाली.

अनामिका आपले केंस मागें सारून कोपऱ्यांत रेलून डोळे मिटून स्वस्थ होती. शशिधरही पाठीमागें अंग टाकून बसला होता. कांहीं वेळ गेल्यावर तिनें नेत्र उघडले व त्याचा हात हातांत घेऊन आर्द्र स्वरांत म्हटलें, "शशी, कांहीं दिवसांपूर्वी मला आयुष्यांतील सारं रहस्य पार नाहींसं झाल्यासारखं वाटत होतं. पराक्रम, यश आणि गौरव हीं मानसिक आनंदाचीं साधनं मला अत्यंत तिरस्करणीय वाटत होतीं. केवळ जगणं हेंच आपलं कर्तव्य आहे ह्याच कल्पनेनं मी कसं तरी आयुष्य कंठीत होतें.

दादाचा बंदिवास, नॅन्सीचा मृत्यु, कॉलेज-शिक्षणाला जुलमाचा रामराम आणि आगामी दारिद्र्याची छाया यामुळं मी इतकी वेडावून गेलें होतें कीं आत्महत्त्या करण्याची प्रबल इच्छा माझ्या मनाला सोडीत नव्हती. एके दिवशीं सायनाईड घेऊन प्राण देण्याचीही मी तयारी केली. त्या रात्रीं मी आईचा निरोप घेण्याकरतां खोलींत गेलें. मला एकदम तिचा हुंदका ऐकूं आला. मीदेखील तिच्या कुशींत झोपून रडूं लागलें."

अनामिकेच्या डोळ्यापुढें तें चित्र उभें राहिल्यामुळें तिचा चेहरा अतिशय व्याकुळ दिसत होता. डोळ्यांतून घळघळा अश्रू वहात होते. तिनें नाक व डोळे पुसले व आवंढा गिळून ती दाटलेल्या आवाजांत पुढें म्हणाली, "त्यावेळीं आईनं मला घट्ट हृदयाशीं धरून रडं आवरण्याचा प्रयत्न करीत कसंबसं म्हटलं, 'मला दमाची आठवण झाली ग. अना, तुझ्यासाठीं आणि दमासाठींच मी माझा जीव कोंडून ठेवला आहे.' आईच्या त्या वाक्यानंच माझ्या मनानं कच खाल्ली. मलाही आई आणि दादासाठीं जगलं पाहिजे असं वाटलं. माझ्या खोलींत जाऊन मी विषाची ती बाटली मोरींत फेंकून दिली व पाणी ओतून कांचाही जाळींतून खालीं घालविल्या. त्या सबंध रात्रीं मी बिलकुल झोंपलें नाहीं."

तिनें दीर्घ निःश्वास सोडून थकल्याप्रमाणें शशिधरच्या खांद्यावर मान टाकली व त्याचा हात तसाच आपल्या हातांत धरून ठेवला. तिच्या तोंडावर वाऱ्याच्या जोरामुळें खेळणारे केस मागें सारून शशिधरनें म्हटलें, "अनाम, जीविताचा डोंगर चढतांना गतकालच्या सखल भागाकडं वळून पाहिलं कीं आपत्ती अडचणींचे खांच खळगे किती आनंददायक व अभिमानास्पद वाटतात! आपण त्या सगळ्या आपत्ती ओलांडून आज ह्या स्थितीला पोहोंचलों हा विचार किती सुखद आहे बरं!"

"शशी," अनामिका शांतपणें म्हणाली, "आज मात्र मला उत्साह, आशा आणि सात्त्विक आनंद वाटतो आहे. आयुष्याचा लढा लढतांना तुझा सहवास किती आल्हादजनक होत आहे!"

शशिधरनें झटकन् तिला जवळ ओढून तिच्या अधराचें गाढ चुंबन घेतलें.

एवढ्यांत मोटारीला एकदम ब्रेक लागल्यामुळें दोघांनींही फिरून समोर पाहिलें. गाडी गिरगांवांत पोहोंचली होती. " इधर खडी करो. " असें म्हणून गाडी उभी रहातांच शशिधर अनामिकेसह खालीं उतरला.

यावेळीं अकरा वाजण्याचा सुमार झाला होता. त्यामुळें बहुतेक घरांतून सामसूम झालें होतें. मधूनमधून रेडीओंतून पियानोचे व व्हायो-लिनचे मंदस्वर ऐकूं येत होते. अनामिका व शशिधर झपझप पावलांनीं आपल्या बंगल्याचा मार्ग आक्रमित होती. मधूनच एखादा टॅक्सीवाला त्यांच्या जवळून मंदपणें गाडी हांकीत अपेक्षेनें पहात होता. हवेंत गारठा बराच असल्यामुळें बिछाना आपली उत्सुकतेनें वाट पहात असेल असेंच घाईनें चालणाऱ्या प्रत्येक वाटसरूला वाटत असावें.

इतक्यांत शेजारच्या इमारतींत अकराचे ठोके पडले. चार पावलें चालल्यावर पुढल्या बंगल्यांतील घड्याळांतही ठोके पडतांना ऐकूं आले. अगदीं आपल्या बंगल्याजवळ पोहोंचेपर्यंत पुढें मागें घड्याळें वाजतांना पाहून अनामिका हंसत म्हणाली, "काय हो, हीं घड्याळं पहारेकरी तर नाहींत ना ? कीं आम्हाला चोर समजून ह्या घंटा देताहेत. खरंच, घड्याळाप्रमाणं स्त्रियांतही एकमत आढळायचं नाहीं असं म्हणणाऱ्या पुरुषांच्याच घरांतून हे विसंवादी नाद ऐकूं येतात ना ?"

ती एवढें बोलत आहे तोंच तळमजल्यावरील एका बिऱ्हाडांत एकच ठोका पडला. दोघांनींही खिडकींतून आंत पाहिलें तों भिंतीवरील घड्याळांत साडेअकरा वाजले होते. टेबलावरील दिव्याच्या प्रकाशांत एक विद्यार्थी पुस्तक वाचण्यांत मग्न झाला होता.

"विद्यार्थ्यांचा काल सर्वसाधारण जगापेक्षां अधिक जोरानें धांवत असतो." असं म्हणून शशिधरनें अनामिकेच्या खांद्यावर हात ठेवला व दोघेंही जिना चढूं लागलीं.

दुसऱ्या मजल्यावर जातांच अनामिका दारावरील घंटेचें बटन दाबून म्हणाली, "आई झोंपली असेल. पण दादासाहेब मात्र कांहींतरी लिहीत नाहींतर वाचीत असणार."

इतक्यांत दारामागें चाहूल ऐकूं आली. चटकन् ती शशिधरला मागें ओढून जिन्याआड दडून राहिली.

दमननें दार उघडलें व तो हंसत म्हणाला, “ हं ताईसाहेब, अजूनही लपंडाव खेळायची इच्छा आहे वाटतं ? हं आतां चोरासहित बाहेर या. ”

ती रागाचा आविर्भाव करीत एकदम पुढें आली व वेडावून उत्तरली, “ अहो ढोंगीमहाराज, आपणही आतां आंधळ्या कोशिंबिरीचा खेळ पुरे करा. दादा, थंडीसाठीं लोकरीचा रग पांघरायचा सोडून हें ढोंग कशाला पांघरतोस ? तुझं डोकं दुखत होतं, तुला झोंप येत होती आणि आणखी काय काय होत होतं. मग आतां एवढा वेळ जागा कसा राहिलास ? ”

“ ताई, आईनं मला थिएटरकडं पाठविलं. आई मला पुष्कळ बोलली. ती म्हणाली कीं ‘ तूं त्यांना असं एकटं कसं जाऊं दिलंस. अना आपल्याला मोठी शहाणी समजली तरी अजून खुळी बावळट पोर आहे आणि शशिधर तर बोलून चालून डॉक्टरच.’ मी मॅनेजरकडं जाऊन चौकशी केली तेव्हां तो मला म्हणाला, कीं अगदीं थोडाच वेळ बसला होतां. शशी, अशा थापा देऊन चांदण्यांत फिरायला जातां कां ?”

“ इश्श, दादा, हें बघ, तुझ्याशीं मी बोलणारच नाहीं अशानं. तुझं डोकं दुखत नसून पोटांत दुखतं आहे. आई चांगले ओळखते आपल्या चिमुकल्या बाळाचे पराक्रम. तूं सांग आईला, कीं ‘ मी सिनेमाला जातों आहे.’ आणि पहा तुला आई एकटा जाऊं देते का ? ह्याचे सिनेमा म्हणजे उल्लू क्रान्तिकारकांचे खलबतखाने ! दादा एक रात्र बाहेर राहिला कीं घ्या दुसऱ्या दिवशीं, पोलीसांची झडती, जबाब, चौकीवर आमंत्रण कांहीं ना कांहीं त्रास घरांत आलाच म्हणून समजा.”

“ हं, चला आतां आंत. मध्यरात्र होत आली. शशी, उद्यां तुझ्या अण्णांना मला हा प्रकार कळविणं भाग आहे.”

अनामिका लाजून आंत गेली. दमन व शशिधर गॅलरींत उभे राहून समोर पहात होते. चंद्र पश्चिम दिशेकडे प्रकाशत होता. त्याची कान्ति

क्षीण झाल्यामुळें आकाशाच्या नीलप्रदेशांत लुकलुकणाऱ्या चांदण्यांची गर्दी वाटत होती. वाऱ्यानें हांकलल्यामुळें लहान लहान ढग पांढऱ्या शुभ्र कोंकरांच्या कळपाप्रमाणें क्षितिजाकडे पळत होते व चंद्रही आपण त्याच्या-मध्यें सांपडूं म्हणून सारखा धांवत सुटला होता. वाऱ्याच्या झुळकेबरोबर दारावरील लतामंडपांत फुललेल्या जाईजुईचा व रातराणीचा मिश्र सुगंध दरवळत होता.

शशिधरनें दमनच्या पाठीवर हात ठेऊन कृतज्ञतेनें स्निग्ध स्वरांत म्हटलें, "दमन, बेळगांवला असतांना तूं मला सांगितलं होतंस कीं, जीवितांत कांहींतरी स्वारस्य आहे. त्यावेळीं मी तें केवळ ऐकलं होतं. पण आज मला त्याचं सत्यत्त्व पटलं. दमन, मित्राचे उपकार मानण्याची कृत-ज्ञता माणसानं दाखवूं नये म्हणतात, पण तूंच मला मार्गावर आणलास."

"अरे डॉक्टर तो डॉक्टर" दमन त्याला गदगदा हलवून म्हणाला, "अरे, मला माझ्या ताईचं लग्न जमवायचं होतं शशी. माझ्या ध्येयासाठीं धडपडतांना जर यदाकदाचित् मी मृत्युवश झालों तर ताईला व आईला कोणीतरी धीर देणारा मी पहात होतों."

एवढ्यांत अनामिका लुगडें बदलून तेथें आली आणि "दादा, चला आंत." असें म्हणून दोघांचेही बाहू पकडून तिनें त्यांना आंत नेलें.

दार बंद करून ती म्हणाली, "आपण आज तिघेंही गोष्टी करीत पडूं या. आजची रात्र झोंपूं नये असंच वाटतं मला."

"शशी," दमन भीतियुक्त आवाजांत उद्गारला, "Oh Doctor, is it moon-stroke? ताई, काय होतं आहे तुला! डॉक्टर, ताईला असं पूर्वी कधींच झालं नव्हतं. आईला उठवून आणूं का?"

"दादा, तुला मात्र आतां वेड लागलं खास." अनामिका त्याला जोरानें धक्का देऊन म्हणाली.

इतक्यांत शकुन्तलाबाईही उठून बाहेर आल्या.

"आई, शशिधरला घेऊन ताई सिनेमाला—नाहीं—फिरायला गेली होती हं."

" बरं, बरं तर, सात नमस्कार कर. " अनामिका नाक व तोंड मुरडून वेडावीत उत्तरली.

" चला बाळ, बारा वाजायला आले असतील. झोंपायचं नाहीं वाटतं ? " शकुन्तलाबाईनीं प्रेमळपणें प्रश्न केला.

" तें पण हिलाच विचार. सबंध रात्रभर गोष्टी करूं या म्हणून सांगते आहे. " दमन पुन्हां म्हणाला.

" चला झोपायला. आतां मध्यरात्रीं कसल्या गोष्टी करतां ? " असें म्हणून सर्वांसह त्या आंतल्या दालनांत गेल्या.

थोड्याच वेळांत दिवे मालवून सर्व मंडळी बिछान्यावर पडली.

" दादा, " अनामिका अंगावर रग घेत म्हणाली, " पाहूं सर्वां-नंतर कोण झोपतं तें. "

" ताई, आतां चूप रहा बघूं. " दमन हंसत म्हणाला, " तूं झोपेंत सुद्धां सबंध रात्रभर बोलत राहील. सापाला जरी मारला तरी त्याची शेपटी कितीतरी वेळ वळवळ करीत असते. तशीच तुम्हां बायकांची जीभ अगदीं शेवटीं थांबते. कालच मी शशीच्या एका पुस्तकांत एक केस वाचली. एक स्त्री मरण पावल्यावर अर्धा तास तिची जीभ नवऱ्याला हुकूम सोडत होती. खरंच सर्वयींनं जिभेवर तुम्हाला केवढा ताबा चालवितां येतो. "

" दादा, मग एखादी मुकीच बायको कर ना. तुझीं व्याख्यानं तरी निमूट ऐकत बसेल." अनामिकेनें प्रत्युत्तर केलें.

" बरं आतां तोंड मिट बघूं. "

" मुळींच नाहीं. मी अशी बडबडत राहणार, " असें म्हणून अनामिका पुष्कळ वेळ त्याला चिडविण्याचा प्रयत्न करीत होती, पण तो एकही शब्द न उच्चारतां पडून राहिला यामुळें नाइलाजानें तीही स्तब्ध झाली व अल्पावधींत झोपीं गेली.

" शशी, पाहिलेंस ? सर्वांअगोदर अना आपणच झोंपली हं " असं म्हणून दोघेही हंसले व कुशीवर वळून निद्रावश झाले.

---

# १७

मे महिना अर्धाअधिक संपत आला होता. वर्षाऋतूचे दिवस अगदीं समीप आले होते. उष्मा अतिशय होत असल्यामुळें आकाशांत ढगांची झालेली गर्दी पाहून लवकरच पाऊस पडेल या आशेनें लोक वाट पहात होते. पण अल्पावधींत आकाश अगदीं निरभ्र होत होतें. सारें जग तहानेनें व्याकुळ झाल्याप्रमाणें म्लान दिसत होतें. प्रखर तापामुळें मोठमोठे वृक्ष पर्णविहीन झाले होते. त्यांच्या अंगाभोवतीं वेष्टण घालून राहिलेल्या लता अगदीं कोमेजून गेल्या होत्या. फुलांना बहर येऊन वासानें दशदिशा दरवळून सोडणारीं फुलझाडं देखील केवळ पाळांमुळांजवळच जीव धरून राहिलीं होतीं.

प्रातःकालच्या मृदु वेळीं लहान लहान पाखरांनीं कांहीं वेळ चिंवचिंव करीत या झाडावरून त्या झाडावर उड्या माराव्या आणि शेवटीं थकून पानाच्या छायेमध्यें बसून भूमीवर पडलेल्या एखाद्या दाण्यासाठीं अगर कीटक प्राण्यासाठीं खालीं पहावें असें दृश्य दिसत होतें. सूर्य वरवर येऊन प्रखर उन्हाचा ताप होऊं लागला कीं शरीरकष्ट करणारे मजूर कांहीं काल आराम करून दिवस संपून विश्रान्ति कधीं मिळते असा विचार करीत पुन्हां आपल्या उद्योगाला लागत होते. सायंकाळच्या शांत समयीं कोकिळा कोठल्या तरी झाडाच्या उंच फांदीवर बसून कूऽकूऽ असा शब्द करीत होती. तो शब्द निसर्गानें सोडलेल्या खिन्न सुस्काऱ्याप्रमाणें वाटत होता.

रात्रींच्या शीतल वेळीं वहाणारा मंद वारा मात्र किती तरी आल्हादजनक वाटत होता.

दमन, अनामिका व शशिधर ह्यांना घेऊन शकुन्तलाबाई मालवणास विश्रांतीकरीतां गेल्या होत्या. पुष्कळ काल मुंबईच्या बाहेर न

गेल्यामुळें त्यांना शहरांतील जीवनाचा फार कंटाळा आला होता; यामुळें मालवणांतील ते दिवस सर्व मंडळींना अतिशय आनंददायक वाटत होते. सकाळीं समुद्रावर पोहायला जावें, दुपारीं वाचीत पडावें संध्याकाळीं शहराच्या हद्दीवर असलेल्या टेंकडीवर हिंडून मधुर करवंदें आणि काजूचीं फळें खावीं व गप्पागोष्टी करीत थकून घरीं यावें आणि रात्रीं जेवणानंतर अंगणांत खुर्च्या टाकून झोंप येईपर्यंत शिळोप्याच्या गोष्टी कराव्या हाच त्यांचा दिनक्रम झाला होता.

त्या दिवशीं संध्याकाळीं दमन, शशिधर व अनामिका नेहमींप्रमाणें टेंकडीच्या माथ्यावर बसून मालवणचा वृक्षमय देखावा पहात होतीं. समुद्रांत सूर्यबिंब मावळतांना पश्चिम आकाशांत विलक्षण रंगाचें मोहक संमिश्रण झालें होतें व त्याचें परावर्तन पाण्याच्या पृष्ठभागावर व पृथ्वीतलावर होऊन तो देखावा अत्यंत नयनमनोहर दिसत होता. समोर अफाट पसरलेला समुद्र, त्यांत दिसणारी सिंधुदुर्ग किल्ल्याची बारीक पट्टी, किनाऱ्यावर नारळीच्या झाडाचें दाट बन आणि उंच सुरु वृक्ष यामुळें त्या देखाव्याला गांभीर्य आलें होतें. खालीं झाडींतून मधून मधून दिसणारे बंगले, वळणाच्या रस्त्यानें जाणाऱ्या मोटारी व खटाऱ्या गाड्या लहान मुलांच्या खेळण्याप्रमाणें चिमुकल्या दिसत होत्या. लहानशा पुलाखालून वहाणाऱ्या खाडीच्या संथ प्रवाहांत पुलाचें प्रतिबिंब पडलें होतें व त्यावरून गाड्यांच्या रांगा मंदपणें चालल्या होत्या. गाडीवाल्याच्या हालचाली बाहुल्याप्रमाणें दिसल्या तरी बैलाला जोरानें चालण्याकरतां बोललेले अपशब्द मात्र डोंगर माथ्यावर अगदीं स्पष्टपणें ऐकूं येत होते.

तो रमणीय देखावा पाहून दमनचें हृदय उत्कट भावनांनीं भरून आलें. तो गंभीरपणें म्हणाला,

"If such be the nature's holy plan
Have I not reason to lament,
For what man has made of man ! खरंच शशी, आपल्या वैभवाचा व कर्तृत्वाचा अभिमान बाळगणाऱ्या प्रत्येक मनुष्यानं इथं येऊन समोरचा अफाट देखावा पहावा म्हणजे त्याला आपल्या क्षुद्रत्वाची

कल्पना येईल. किती उदात्त भावना आणि विचार त्यावेळीं मनांत येतात! असं इथंच कल्पान्तापर्यंत बसून जीवनाचं गूढ उकलण्याचा प्रयत्न करावा असं मला वाटतं."

"पण दमन, आतां अगोदर मागं फिरूं या. ह्या थंड वेळीं दगडाआड असलेलीं फुरशीं व साप बाहेर पडत असतात. सर्पदंशामुळं परवांच एका विद्यार्थ्याला मृत्यु आला ना?"

"शशी, उद्यांपासून ताई आतां या टेंकडीवर फिरायला येत नाहीं. तिला कसलंच भय वाटत नाहीं. पण फक्त साप, चोर आणि भूत या तीन गोष्टींना ती भयंकर घाबरते. आज सबंध रात्र ती आतां झोंपत नाहीं."

"दादासाहेब" अनामिका त्याला वेडावून म्हणाली, "पण अचरट धाडस म्हणजे कांहीं शहाणपणा नव्हे. असं सर्पदंशानं सहज मरण्याएवढं जीवित स्वस्त नाहीं. ह्या जगांत जाणून बुजून अपघाताला बळी जाण्याचा मूर्खपणा करणाऱ्या दीडशहाण्यांना निष्कारण महत्व मिळतं याची मला अतिशय चीड येते."

दमननें प्रेमळपणें हास्य केलें व समोरच्या लालभडक आकाशाकडे पहात तो म्हणाला, "ताई, स्वर्गांत देव आणि राक्षस यांच्यामध्यें किती भयंकर लढाई चालली आहे! ते बघ आकाशांतून रक्ताचे सारखे पाट वहात आहेत. देवांनीं जर असं युद्ध चालवलं आहे तर आम्हांलासुद्धां ह्या जगांतील राक्षसांशीं लढाई नको का द्यायला?"

बोलतां बोलतां तो गंभीर होऊन पुढें म्हणाला, "निसर्गाच्या रहाटगाडग्यांत आणि जागतिक संस्कृतीच्या मनोऱ्यांत प्रत्येक व्यक्तीचं कार्य केवळ दगडासारखं आहे. निसर्ग आणि संस्कृति प्रत्येकाचा उपयुक्त वेळीं बळी घेऊनच आपलं सुंदर मंदिर उभारतात. ह्या कार्यासाठीं त्यांनीं बुद्धिमान् व कर्तबगार माणसं निर्माण केलीं. त्या कल्पक कारागिरांकडून, शिल्पकारांकडून संस्कृतीच्या मनोऱ्याला सुंदर सजावट करून घेतली आणि त्यांचें कार्य झाल्यावर त्यांनाही आत्मसात् करून घेतलं. ही घटना जगाच्या जन्मापासून सुरू आहे आणि जगाच्या अन्तापर्यंत चालू राहणार आहे. अनेक पिढ्या, अनेक राष्ट्रं ही याच निसर्गनियमानं निर्माण

झालीं आणि नाश पावलीं आहेत. ताई, म्हणूनच कोणत्याही व्यक्तीनं आपलं जागतिक कार्य पूर्ण झाल्यावर जगण्याचा अट्टहास करणं अगदीं वेडगळपणाच आहे. कारण एका काळची व्यक्ति त्या काळाच्या, त्या समाजाच्या आकांक्षा, अपेक्षा आणि भावना बोलत असते म्हणूनच त्या व्यक्तीला त्यावेळीं देवपण येतं. पण तीच व्यक्ति जर आपल्या नियंत्रित कक्षेबाहेर जिवंत राहिली तर त्यांतील देवपण नष्ट होऊन सारा समाज कदाचित् प्रत्याघातामुळें ( reaction ) तिचा तिरस्कारही करूं लागतो."

अनामिका तें विचारप्रवर्तक भाषण खडकावरील दोन चार दगडांशीं खेळत किंवा हाताजवळील गवताची काडी तोंडीत तन्मयतेनें ऐकत होती. शशिधरही वाऱ्यानें मंदपणें डोलणाऱ्या काजूच्या झाडाकडे पहात विचारमग्न झाला होता. सूर्याचें तेजोविहीन लाल बिंब समुद्राला स्पर्श करीत होतें. त्या संधिप्रकाशामुळें तिघांच्याही चेहऱ्यावर विलक्षण कान्ती चढली होती. वाऱ्याच्या झोतामुळें दमनच्या अंगांतील सदरा सारखा फडफडत होता. केंस हातानें मागें सारीत तो शांतपणें पुढें म्हणाला,

" खरंच, मृत्यु ही जगाच्या शांततेला किती आवश्यक गोष्ट आहे! ईश्वरानं मनुष्याला दिलेली ती एक सुंदर देणगीच आहे. व्यक्तीनं आपलं क्षेत्र विस्तृत केलं आपल्या उद्योगांत तो खरा आनंद मानूं लागला; साऱ्या प्राणीमात्राकडे तो बंधुभावानं पाहूं लागला कीं त्याला मृत्यूचंही एवढं दुःख होणार नाहीं. कारण जागतिक संस्कृतींत आपला अवशेष राहिला ही भावना त्याच्या मनांत दृढ होते. निसर्गाच्या विस्तृत यंत्रांतील आपण एक अवशेष आहों ही कल्पना हृदयांत जोपासल्याशिवाय माणसाला अन्तिम समाधान लाभणं सर्वस्वी असंभवीय आहे. पण एका विशिष्ट कक्षेंतून जगताचा आणि जीविताचा अर्थ लावण्याचा आम्ही प्रयत्न करतों आणि अंधश्रद्धेनें मांडलेल्या काल्पनिक सिद्धांतावर (Hypothesis) आयुष्याच्या तत्त्वज्ञानाची रुपरेखा दृढ करतों आणि मग कोठल्याही शास्त्रानं किंवा सरळ विचारसरणीनं त्याचं सत्यत्व असंभवनीय आहे असें समजतांच आपण अट्टहासानं जरी आपला विश्वास दृढ ठेवण्याचा प्रयत्न केला तरी मनाला फसविणं सर्वस्वीं अशक्य होतं आणि या मानसिक विरोधामुळंच आपण अगदीं दुःखी होत असतों. पण मी जीविताचं रहस्य

जाणण्याचा कधीं प्रयत्नच करीत नाहीं. जन्माला आलों आहे. जागतिक प्रगतीला हातभार लावणं हें माझं ध्येय आहे आणि मृत्यूचं आमंत्रण येतांच कधींतरी मला नाइलाजानं गेलं पाहिजे हें समजत असतांना मी कशाला घाबरावं ?"

"दमन," शशिधर हंसण्याचा प्रयत्न करीत म्हणाला, "तुझं हें जीविताच्या तत्वज्ञानाचं पृथक्करण किती भीतिदायक आहे ! खरा आनंद कोणत्या मार्गानं लाभेल हें ऐकूनच मला भय वाटतं आणि यापेक्षां 'खाना, पीना मजा करना' हेंच तत्वज्ञान अधिक सुलभ दिसतं. दमन, थट्टा विनोदावरून तूं गंभीर विषयांत प्रवेश कधीं करतोस हें दिवस संपून रात्र कधीं झाली त्याप्रमाणेंच समजत नाहीं. आपण जागृतावस्थेंतून निद्रावश केव्हां झालों याची जाणीव नसावी पण कुणीतरी भयंकर शब्द करून धडपडून एकदम जागं व्हावं त्याप्रमाणंच तुझे हे विचार ऐकून मी सावध होतों."

"खरंच, दादाला ही फार वाईट खोड आहे. कुठलाही सरळ साधा विषय काढा, दादानं गंभीर स्वरूप दिलंच म्हणून समजा." अनामिका लडिवाळपणें म्हणाली, "दादा, उद्यां हे बोधामृताचे घुटके पाजून बायकोला तूं अगदीं बेजार करशील."

"चुकतेस तूं," शशिधर मध्येंच म्हणाला, "तरुण माणसं असं फाजील तत्वज्ञान सांगूं लागलीं कीं विवाह हें एकच रामबाण औषध त्यावर उपायकारक होतं. दमन, निसर्गाच्या नियमाची रूपरेखा सांगतांना तुला विवाहाची निसर्गसिद्ध आवश्यकता नाहीं का वाटत ?"

"शशी," तो कांहींसा खिन्नपणें हंसून म्हणाला, "अरे, माझं वैवाहिक क्षेत्र अतिशय मर्यादित होत चाललं आहे. माझ्या आकांक्षा जाणणारी, माझ्या ध्येयाला हातभार लावणारी अशी पत्नी मिळणं सर्वस्वीं असंभवनीय आहे असं वाटतं मला. मग एखाद्या तरुणीशीं विवाह करून मी तिला आयुष्यभर दुःखी कशाला करूं ? सर्वसाधारण स्त्रीला संसारसुखाची लालसा असते यामुळें तिला कदाचित् पुढंमागं माझ्याशीं विवाह केल्याबद्दल पश्चात्ताप वाटेल."

"दादा" अनामिका चिडल्याप्रमाणें म्हणाली, "खरंच, तुम्हा पुरुषांना स्त्री ही काय चीज आहे हें समजलें नाहीं आणि कदाचित् समजणारही नाहीं. अत्यंत उदार विचार प्रगट करणारा आणि स्त्रीबद्दल अतिशय तिरस्कार बाळगणारा दोघेही स्त्रीबद्दल भलताच ग्रह करून घेत आहेत. महान् महान् तत्त्ववेत्तेही एखाद्याच स्त्रीच्या सहवासावरून स्त्रीजातीबद्दल आपला निर्णय देत असतात. तुम्ही पुरुष त्यांच्याकडे अगदीं आकुंचित दृष्टीनें पाहत असतां. एखादाच पुरुष स्त्रीला विश्वासांत घेत असेल. पुरुष आपलं हृदय देत नसतात. तुमचं प्रेम तुमच्या प्रत्येक व्यवसायाप्रमाणें एका विशिष्ट मर्यादेंतच असतं. पण स्त्रीला तुमचं खरंखुरं प्रेम हवं असतं आणि तें नाहीं मिळालं तर तें शोधतांना कधीं कधीं तिचा तोल भलतीकडेच जातो. पण एकदां कां तें मिळालं म्हणजे ती तुमचे सहस्र अन्याय खाशीनं विसरेल. दादा, वेश्येकडून रात्रीं अपरात्रीं परत येणाऱ्या दारुबाज नवऱ्याला दार उघडून, हृदयाशीं धरून, अश्रुमोचन करून करुणा भाकणाऱ्या स्त्रीजातीबद्दल तुच्छतादर्शक शब्द बोलणाऱ्या पुरुषांच्या कृतघ्नबुद्धीची कल्पनाच होत नाहीं. देवानं स्त्री ही मूर्तिमंत क्षमा निर्माण केली आणि आपल्या कार्याची यशस्विता पहाण्यासाठीं पुरुषांची जात निर्माण केली."

"आणि त्या प्रयोगांत देवाला अगदीं उलट अनुभव आला असंच ना?" दमन एकदम हंसत म्हणाला, "शशी, टाळी दे. किती जोरदार भाषण हें! पण खरंच ताई, विवाह ही एक आयुष्यभर विचार करण्याएवढी महत्वाची गोष्ट आहे आणि मग आपला बेत निश्चित झालाच तर त्यावेळीं आपण वृद्धच झालेलों असतों. स्त्री ही पुरुषाची आई असते, पत्नी असते आणि कन्याही असते. स्त्रीच्या ह्या तिन्ही अवस्था पाहूनही पुरुषाला स्त्रीत्वाची योग्य कल्पना होत नाहीं. मनुष्याला ब्रह्म आणि स्त्री ह्या दोन्ही गोष्टी जन्मभर विचार करूनही समजणं असंभवनीय आहे. म्हणूनच कदाचित् कांहीं माणसांना स्त्री हेंच ब्रह्म वाटत असेल. पण ताई, I am too busy to get married."

इतक्यांत सुकलेल्या पानांतून सळसळ आवाज करीत कांहीं तरी जिवाणू गेलें. अनामिका दचकून उभी राहिली. पुढें असलेल्या शशि-

धराच्या बाहूला धरून त्यालाही तिनें मागें ओढलें. दमन जवळ पडलेला मोठा दगड घेऊन पुढें जात होता.

" दादा, दादा, माग हो. उगाच नको, चल आपण माग फिरूंया." अनामिका घाबरून आग्रहानें म्हणाली.

परंतु दमनचें लक्ष तिच्या भाषणाकडे नव्हतें. तो सावधपणें सभोंवार पहात पुढें जात होता. पण त्याला कुठेंच कांहीं दिसेना. मागें फिरून तो एकदम भीतिप्रद आवाजांत ओरडला, " ताई, पळ पळ ! तें बघ."

" ईऽऽ " अशी किंकाळी मारून अनामिका शशिधरला एकदम बिलगली. त्यानें पाठीमागून तिचा बाहू पकडून चटकन् तिला जवळ धरली. दमन मात्र खदखदां हसूं लागला. अनामिकेची व्याकुळ मुद्रा क्षणभर सस्मित झाली. दीर्घ निश्वास टाकून तिनें वक्षःस्थलावर हात ठेवला. तिचें हृदय सारखें जोरानें धडधडत होतें. शशिधर आपला हात सोडून उभा होता. अनामिका अगदीं ओशाळून गेली.

" ताई, तुम्ही दोघांनींहि माझे आभार मानले पाहिजेत." दमन हंसत त्यांच्याजवळ जाऊन म्हणाला.

" दादा, तूं अगदीं अगदीं दुष्ट आहेस ! "

" हीच का उपकाराची फेड ? " दमननें प्रश्न केला.

" तूं माझ्याशीं बोलूं नकोस. थांब तुझं नांव आईला सांगतें." अनामिका चिडल्याचा आविर्भाव करीत पुढें म्हणाली, " माझ्या हृदयांत कशी पण धडकी भरली ! "

शशिधरच्या चेहऱ्यावरील खिन्नता बघून दमन एकदम चमकला. व त्यानें हसें आवरलें. नॅन्सीच्या अपघाताच्या वेळचें दृश्य आठवून तो गंभीर झाला होता. अनामिकेला खुणावून त्यानें गप्प राहण्यास सांगितलें. तिच्याही सर्व प्रकार लक्षांत येऊन विषयान्तर करण्यासाठीं ती म्हणाली, " दादा, सापाला दुखवून सोडूं नये. साप म्हणजे तुझा भांडवलदार असतो. कधीं येऊन दंश करील याचा नेम नाहीं."

" ताई, भांडवलदार हा सापापेक्षां अजगरच जास्त म्हणतां येईल. तो समोर दिसणारं खाद्य अगदीं फूत्कार न करतां गिळून गलेलठ्ठ झालेला

असतो. त्याला मजूरही सारखा, मध्यम वर्गही सारखा आणि आपल्या जातींतील लहान लहान अजगरही सारखाच. त्यानं गिरणीच्या चिमणीला एकदां कवटाळलं कीं त्यानं तें पचविलंच म्हणून समज. पण त्याला एखाद्यानंच जर पकडण्याचा प्रयत्न केला तर तो त्याला कधींच गिळंकृत करून टाकतो. पण ताई, आमचा समाज त्या अजगराला श्रीविष्णूचा शेष समजून त्याची पूजा करतो आहे. त्याच्या भक्ष्यस्थानीं पडण्यासाठीं राष्ट्रांतील बुद्धिवान् लोकही आतुर झालेले दिसतात."

"हं, दादासाहेब पुरे करा." अनामिका हात पुढें करून मान हालवीत म्हणाली, "हा कांहीं चौपाटीचा किनारा नाहीं का कामगार मैदानही नाहीं. हं, चला आतां उशीर झाला. घरीं उगाच आई वाट पहात असायची."

तिघेंही उठून उभीं राहिलीं. त्यांनीं डोंगरमाथ्यावर पाहिलें. अफाट पसरलेल्या माळावरच्या सुकलेल्या गवतावर संधीप्रकाश पसरला होता. त्या कुरणांतून चरणाऱ्या गाईम्हशी हाकवीत गवळ्याचीं पोरें गात चाललीं होतीं. एका कातळावर लहानसें देऊळ दिसत होतें व फडा उभारलेल्या सापाप्रमाणें पांढरा चांफा उभा होता. टेकडीच्या बाजूनें काढलेल्या रस्त्यानें बैलगाड्यांच्या रांगा उतरणीवरून जात असतां चाकाच्या घर्षणामुळें वेगवेगळे स्वर उत्पन्न होत होते व बैलांच्या गळ्यांतील घुंगुरवाळ्यामुळें त्याला एक प्रकारें सुंदर साथ होत होती.

जुनाट वटवृक्षाच्या उंच फांदीवर बसून पक्षी मधूनच उदासवाणा शब्द करीत होते.

दमननें खिन्नपणें सभोंवार पाहून दीर्घ निश्वास टाकला. जगताच्या अफाट विस्ताराकडे आणि निसर्गाच्या गूढ विविधतेकडे पाहून त्याला मानवी जीवनाच्या क्षुद्रत्वाची जाणीव झाली. तिघेंही डोंगरावरून खालीं उतरून घरच्या रस्त्याकडे वळलीं.

सर्व मंडळी घरीं येतांच शकुन्तलाबाई पुढें होऊन म्हणाल्या, "दमा, रुक्मीची तार आली आहे. ती परवां मोटारनें इकडे येत आहे."

दमन क्षणभर स्तंभितच झाला. रुबी मालवणला येईल याची त्याला बिलकुल कल्पना नव्हती. कांहीं न बोलतां त्यानें आईच्या हातांतील तार घेतली व दोनतीन वेळां तारेंतील मजकूर वाचला. पण त्याचा अर्थ समजण्याएवढें देखील त्याचें मजकुरावर लक्ष नव्हतें. क्षणार्धांत त्याच्या मनांत अनेक विचारांचें थैमान सुरू झालें होतें.

रुबीचा नवरा वारला त्याला फार काळ लोटला नव्हता. यावेळीं कुणाच्या तरी स्नेहाची आवश्यकता तिला फार भासत असणार. तिच्या सान्निध्यांत तिला विशेष आप्तेष्ट असें कुणीच नाहीं आणि यामुळें तिचें जीवित यावेळीं अतिशय दुःखाकुल असेल याची त्याला जाणीव होती. म्हणूनच जमशेटपूरला जाऊन तिला धीर द्यावा असें अनेक वेळां त्याला वाटलें होतें. पण त्याचा स्वाभिमान या विचाराच्या आड आला होता. तिला मालवणला बोलवावी असाही विचार त्याच्या मनांत आला होता. पण त्या वेळीं त्याच्या मनानें कच खाल्ली होती. रुबीशीं आपण विवाह करावा हा विचार मनांत येतांच त्यानें तो एकदम उधळून लावण्याचा प्रयत्न केला. ती आपल्याशीं लग्न करण्याचें साफ नाकारील. आईलाही ही गोष्ट आवडणार नाहीं. सारा समाज आपल्याकडे कुचेष्टेनें पाहील, भांडवलशाही कट्टर साम्यवादाला कशी सहज विकत घेऊं शकते याचें उदाहरण म्हणून आपल्या विवाहाकडे देशांतील वृत्तपत्रें बोट दाखवतील. शिवाय रुबी विलासी आहे. तिला आपल्या ध्येयाविषयीं अभिमान न वाटतां त्यापासून परावृत्त करण्याचा ती आटोकाट प्रयत्न करील. तिला आपली तळमळ समजायची नाहीं. अशा विचारांनीं तो अतिशय अस्वस्थ झाला व त्यानें मान वर करून शकुन्तलाबाईकडे पाहिलें. त्यांच्याहि नजरेंत त्याला साशंकता दिसली.

"आई," दमन निर्विकार मुद्रा करण्याचा प्रयत्न करीत म्हणाला, "उद्यां मी मुंबईला जातों. रुबी आली तर तुम्ही आहांतच."

शशिधर किंचित हास्य करीत त्याच्या चेहऱ्यावर उमटणारे विकार बारकाईनें पहात होता.

"आई, मी रुबीला येऊं नको म्हणून तार पाठवूं का?" दमननें खिन्नपणें पुन्हां विचारलें.

"नको, नको," असें म्हणून शकुन्तलाबाईंना एकदम गहिंवरून आलें. घसा साफ करून त्या पुढें म्हणाल्या, "दमा, तुला सुख होत असेल तर माझी कसल्याच गोष्टीला आडकाठी नाहीं. माझ्या स्वार्थी भावनांसाठीं मी माझ्या बाळाच्या सुखांत अडथळा कसा आणूं? दमा, तूं समंजस आहेस. मला तुम्हां तरुणांच्या भावना आणि आकांक्षा समजतात. वेड्या, आपल्या आईच्या वेडगळ भावनांसाठीं असा भलताच सुखत्याग करूं नकोस. मलाही नाना व मावशी असाच विचार करून स्वातंत्र्य देत होतीं. मग मी—"

पुन्हा त्यांचा गळा दाटून आल्यामुळें तोंडांतून शब्द बाहेर फुटेना. आपलें रडें आवरीत त्या पलीकडल्या दालनांत गेल्या. अनामिकाही आईच्या मागोमाग आंत गेली. दमननें हताशपणें सुस्कारा सोडला व वेताच्या खुर्चीत अंग टाकून तो उदासीनतेनें म्हणाला, "शशी, कांहीं वेळ मी अगदीं हतबुद्ध होऊन जातों. मला मानसिक स्वास्थ्य कधीं मिळायचंच नाहीं कां असा दुःखी विचार माझ्या मनाला व्याकुळ करीत असतो." कांहीं वेळ स्तब्ध राहून तो पुढें म्हणाला, "मी साम्यवादी कसा झालों म्हणून प्रश्न केला तर त्याचं उत्तर साम्यवाद्याचीं भाषणं ऐकून किंवा पुस्तकं वाचून मी साम्यवादी झालों नाहीं. अजूनही माझ्या दृष्टीसमोर तो भीषण प्रसंग उभा राहतो."

बोलतां बोलतां त्याच्या आवाजांत व्याकुलता उत्पन्न झाली होती. चेहरा खिन्न दिसत होता. डोळे दयार्द्र झाल्यामुळें मंद तेजानें चमकत होते व रुंद भालप्रदेशावर दीनतीन आंठ्या पडल्या होत्या. पुढें आलेले केंस मागें सारून शून्य दृष्टीनें समोरच्या दिव्याकडे पहात तो उदासपणें म्हणाला,

"तीन वर्षांपूर्वीची गोष्ट. ते दिवस पावसाळ्याचे होते. सायंकाळ झाली नव्हती, तरी आकाशांत काळ्याकुट्ट ढगांची दाट गर्दी झाल्यामुळें बराच उशीर झाल्यासारखा वाटत होता. पावसाची मोठी सर पडून गेली असली तरी झिमझिम पाऊस लागतच होता. मी हॉटेलांतून गरम गरम

चहा घेऊन बाहेर पडलों व फिरावयास जाण्याचा बेत रद्द करून बसच्या स्टँडवर उभा राहिलों. सहजच माझी दृष्टी सभोंवार गेली. जवळच्या इमारतीच्या पायरीवर बसून एक भिकारीण आपल्या तीन मुलांसह सकाळपासून जमविलेलं अन्न एका कागदावर एकत्र कालवून खात होती. शशी, त्या लहान गोजिरवाण्या मुलांचे ते पापशून्य चेहेरे, भालप्रदेशावर रुळणाऱ्या केंसांच्या अव्यवस्थित बटा व फाटलेले भिजलेले गलिच्छ कपडे पाहून माझ्या हृदयांत चर्रर झालं. तीं भिजून चिंब झालीं होतीं तरी तोंडांतील घांस संपवून हातांतील घांस कधीं तोंडांत कोंबतों या विचारांत तीं आपल्या साऱ्या यातना विसरलीं होतीं. शशी, खरंच, अजूनही तें दृश्य आठवलं कीं माझ्या काळजाचं पाणी पाणी होतं."

दमननें गच्च मुठी आवळल्या व अत्यंत उद्वेगानें दांत चावून दीर्घ निश्वास टाकला. साऱ्या जगाचाच तिरस्कार वाटत असल्याप्रमाणें त्याच्या चेहऱ्यावर सात्विक संताप व्यक्त होत होता. दृष्टीसमोर तें दृश्य दिसत असल्याप्रमाणें तो कांहीं काळ अन्तराळीं पहात स्तब्ध राहिला. बराच वेळ गेल्यानंतर सावध झाल्यासारखें करून तो व्याकुळ स्वरांत म्हणाला, "त्या मुलांनीं दोनचार घांस आपल्या चिमुकल्या हातांनीं खाल्ले असतील नसतील तोंच त्या बंगल्याचा भय्या एकदम मोठ्यानें ओरडत दांडा उगारून बाहेर आला व त्यानें भयंकर गर्जना केली, "क्यंव रंडी ये धरमशाला है? यहां खाना खाने को शरम आती नहीं? सूवरकी अवलाद!" तीं मुलं भयभीत होऊन आपल्या उष्ट्या हातांनींच आईला बिलगलीं होतीं. बिचाऱ्या त्या बाईनं तो कागद दोन्ही बाजूस धरून उचलतांना एकदम मध्येंच तो फाटला व सर्व अन्न खालीं सांडलें. एखादा भयंकर अपघात पहातांच आपण गचकन् डोळे मिटावे त्याप्रमाणें मी केलें. त्यावेळीं त्या बाईच्या चेहऱ्यावर प्रेतकळाच दिसली. शशी, बिचाऱ्या त्या लहान मुलांनीं अशा आईच्या उदरीं जन्माला येण्याच्या अन्यायाशिवाय असं कोणतं पातक केलं होतं कीं त्यांना पोटाला अन्न नाहीं, थंडीवाऱ्यांत वस्त्राशिवाय फुटपाथवर झोपावं आणि सबंध दिवस पोटासाठीं वणवण फिरावं? त्या वेळीं मी माझे खिसे चाचपले. पण बससाठींही माझ्या खिशांत पैसा नव्हता. एवढ्यांत त्या बंगल्यासमोर

मालकाची मोटार उभी राहिली. माझ्याकडे एक वेळ बेपर्वाईनं पाहून तो भय्याचा मुजरा घेत आंत गेला. साऱ्या श्रीमंत वर्गाचा मला मनस्वी तिटकारा वाटला. मशिनगन लावून जाणाऱ्या येणाऱ्या भांडवलदाराचा मुडदा पाडावा असंच क्षणभर माझ्या मनाला वाटलें. Oh Capitalism, thou monster of monsters!"

असें म्हणून दमननें आवेशानें गच्च मुठी आवळल्या व दांतओंठ चावून समोर हात नाचविले.

क्षणभरानें त्याचा चेहरा निर्विकार होऊन पुन्हां मुद्रेवर निराशा उमटली. थकल्याप्रमाणें अंग शिथिल करून खुर्चीच्या मागें त्यानें मान टाकली. खिडकींतून येणारा वाऱ्याचा झोत त्याच्या तप्त भालप्रदेशाला शांत करीत होता. टेबलावरील दिव्याकडे शून्य दृष्टीनें पहात तो पुढें म्हणाला, "शशी, काय कुणाला माहीत, तशा प्रकारचे देखावे मी अनेक वेळां पाहिले असतील. पण त्या प्रसंगाचा माझ्या मनोवृत्तीवर जो विलक्षण परिणाम झाला तो कधींही नाहींसा होणार नाहीं. कधीं तापानं आजारी पडलों कीं तेंच भीषण चित्र माझ्या दृष्टीसमोर दिसतं. अखेरच्या वेळीं तेंच दारुण चित्र पहात मी मृत्युवश होणार असंही मला वाटतं. शशी, त्या रात्रीं मी बिलकुल झोंपलों नाहीं. हिंदुस्थानांत साम्यवाद कसा प्रस्थापित करतां येईल या विचारांतच मी सारी रात्र काढली. त्या रात्रीं अत्याचारी क्रान्तिकारकांचाही संघ स्थापावा असा विचार माझ्या मनांत सारखा घोळत राहिला."

"आणि दमन, अजूनही तूं क्रान्तिकारकांच्या गुप्त कटांत सामील झाला आहेस असा मला संशय येतो." शशिधर कळकळीनें पुढें म्हणाला, "दमन, खरं काय तें सांग. तुझीं भाषणं अत्याचारप्रवर्तक असतात. त्यांत हिंसेचा तिखटपणा असतो. मामींनाही तसा संशय आहेच. खरं सांग मला."

दमननें खिन्न हास्य केलें. त्या हास्यांतही औदार्याची छटा स्पष्ट दिसत होती. शशिधरकडे प्रेमार्द्र दृष्टीनें पाहून तो शांतपणें म्हणाला, "शशी, माझ्यावर तुमचा विश्वास नाहीं याबद्दल मला अतिशय वाईट वाटतें. अरे, अत्याचारी क्रान्तीशिवाय साम्यवाद प्रस्थापित होणं शक्य नाहीं असं म्हणणारा साम्यवादी संघ बराच मोठा आहे. पण त्याचं म्हणणं सत्य का असत्य

याचा विचार करण्यापेक्षां तें शक्य का अशक्य याचा विचार मी करीत असतों. हें बघ, क्रान्तीची मनोभूमिका तयार होण्यास श्रमजीवी समाजाचा दारुण छळ झाला पाहिजे. यासाठीं देशांत बेकारी, बेबंदशाही, अन्याय, जुलूम, दारिद्र्य, अज्ञान आणि रोगराई यांसारख्या आपत्तीनं देश जर्जर झाला पाहिजे म्हणजे क्रान्तिकारकांना त्या चिथावलेल्या समाजाला साम्यवादाच्या मशालीनं सहज भडकवितां येईल. आणि म्हणूनच कांहीं साम्यवादी संपाच्या यशापयशाकडं बिलकुल न पहातां संपाकरतां मजुरांना प्रोत्साहन देत असतात."

"पण दमन, हिंदुस्थानांत अशी क्रान्ति संभवनीय आहे का?" शशिधरनें मध्येंच उत्सुकतेनें प्रश्न केला.

"ऐक अगोदर. साम्यवादाला भांडवल लागत नसल्यामुळं पुष्कळ रिकामटेकड्या, अडाणी, दुराचारी भाईंनीं साम्यवादाच्या सार्वजनिक उद्यानांत गलिच्छपणा निर्माण केला आहे. शशी, लहानपणच्या परिस्थितीमुळं अगर अनुवंशिकतेमुळं समाजांत आपण जे अनेक उपजत गुन्हेगार पहातों त्या प्रकारचेच कांहीं भाईलोक त्या साम्यवादाच्या छत्राखालीं आहेत. यामुळें त्यांना समाजांत अस्वस्थता निर्माण केल्याशिवाय राहवतच नाहीं. ते स्वभावतः क्रान्तिकारक झालेले असतात आणि त्यांना शांतता असह्य होते. They clamour for revolution. (ते कधींही क्रान्तीसाठींच आक्रोश करणार.) म्हणूनच बुद्धिप्रधान क्रान्तिकारकानीं क्रान्ति यशस्वी होतांच पांडवसैन्याप्रमाणं ह्या आपल्या क्रान्तिकारकांना तत्परतेनें नामशेष केलं पाहिजे. नाहींतर अल्पावधींतच त्यांना दुसऱ्या विरोधी क्रांतीला (Counter revolution) टक्कर देणं आवश्यक होईल. पण ह्या तत्त्वाकडं दुर्लक्ष केल्यामुळं कित्येक राष्ट्रांत एकसारख्या क्रान्तीनें राज्यघटना बदलत आहेत असें आपण पहात असतों. तसंच क्रान्तीची चव चाखल्यावर जनतेंत ती एखाद्या व्यसनाप्रमाणं दृढ होण्याचाही संभव असतो. शिवाय क्रान्तीच्या धुमश्चक्रींत उत्साहाच्या आणि क्रोधाच्या आवेशांत आपला तोल भलतीकडंच जातो आणि साम्यवादाला विघातक असेच प्रकार घडून येतात. शशी, जर भांडवलशाही खात्रीनं नष्ट होईल आणि ती नष्ट करण्यासाठीं अत्या-

चारी क्रान्तीशिवाय अन्य मार्ग नसेल तर कितीही भयंकर रक्तपात झाला तरी जागतिक संस्कृतीसाठीं एका पिढीनं आपला देह धारातीर्थी ठेवावा असं मीही कदाचित् म्हणेन. पण निरपराधी मुलाबाळांचे अमानुष रीतीनं प्राण घेऊन जर साम्यवाद प्रस्थापित करावयाचा असेल तर तो मला नको आहे. कारण मत्सरानं आणि सूड बुद्धीनं केलेल्या रक्तपातावर उभारलेला साम्यवादाचा मनोरा पत्त्याच्या किल्ल्याप्रमाणं कधीं कोसळेल याचा नेम नाहीं. कारण तिथंही स्वार्थबुद्धीचं बीजारोपण झालेलं असतं. त्या वेळीं क्रान्तीच्या युद्धांत सेनापतीचं कार्य यशस्वी करणाऱ्या क्रान्तिकारकानांच देशाचीं अधिकारसूत्रं द्यावीं लागतात. पण युद्धशास्त्र आणि राजनीति यांत जमीन अस्मानाचं अन्तर असतं. क्रान्तीच्या पुढाऱ्यांनीं सत्तेचा उन्माद चाखलेला असतो आणि त्यांच्याही शासनपद्धतींत व्यक्तीचं स्वातंत्र्य गमावलं जातं. शशी, यासाठींच प्लेटोनं म्हटल्याप्रमाणं तत्त्ववेत्ते राजे असावेत तसेंच तत्ववेत्ते क्रान्तिकारकही असावेत. कारण क्रान्ति व्हावयाची असेल तर ती भावनाप्रधान उपयोगी नाहीं. निदान तिचे कार्यवाहक तरी अत्यंत बुद्धिप्रधान हवेत. ”

“ पण दमन, भावनावश झाल्याशिवाय अत्याचारी क्रान्ति शक्य नाहीं. ” शशिधर मध्येंच म्हणाला. इतक्यांत अनामिका तेथें येऊन हंसत म्हणाली, “ दादा, लवकरच क्रान्ति होणार असं दिसतं. ”

“ हो, एका देशांत क्रान्ति झाली कीं शेजारच्याही राष्ट्रांत क्रान्ति-कारक वारे वाहूं लागतातच. ” दमननें हंसत प्रत्युत्तर केलें.

“ पण पहिली क्रान्ति इंग्लंडच्या Bloodless revolution प्रमाणं झाली. पण ही दुसरी क्रान्ति French revolution प्रमाणं भयंकर होणार आहे असं वाटतं. क्रान्ति वगैरे शब्द ऐकून गुप्तहेर म्हणून आईनं मला इकडं पाठविलं आहे. दादा, तुझ्या ताईला भाऊबीजेला एक भेट देशील का रे ? ”

“ अगदीं खात्रीनं ” दमन हंसत म्हणाला, “ तुम्ही स्त्रिया असं मागणार तें काय ? फार तर हिरकण्याचीं अगर टप्पेदार मोत्यांचीं कुडीं, सोन्याच्या बांगड्या, रेशमी साड्या, पावडरचे डबे याशिवाय काय पाहिजे

तुम्हाला ? ताई, पुरुष स्त्रियांना फसवतात, याचा अर्थच हा कीं तुम्हां स्त्रियांना ते अलंकारांनीं आणि पैशांनीं विकत घेऊं शकतात. खरा प्रियकर आणि व्यापारी दृष्टीनं पहाणारं गिऱ्हाईक यांतील भेद तुम्हांला कळतच नाहीं. हजारों वर्षे पुरुषाला आकर्षित करण्यासाठीं स्त्री वस्त्रालंकारांनीं आपल्याला भूषवीत आली आणि तोही तिला वस्त्रालंकारांनीं वश करीत आला यामुळं सर्वसाधारण स्त्रीला उपजतच भूषणाची लालसा वाटत असावी."

"हं दादासाहेब, फार बोललांत" अनामिका त्याला वेडावून म्हणाली, "राक्षसदेखील आपल्या कृत्याचं समर्थन करण्यासाठीं गीतेचे पाठ म्हणून दाखवील. अरे, तुम्ही पुरुष शृंगारलेल्या बाहुलीवरच बेहोष खूष होता हें पाहूनच स्त्रिया वस्त्रालंकारांनीं आपल्याला मोहक करीत असतात. खरं म्हणशील तर स्त्री ही पुरुषांच्या अंगीं असलेल्या बुद्धि, औदार्य आणि शौर्य या तीन गुणांवरच लुब्ध होत असते. एखादा दागिना देऊन व अनेक उदार कृत्यांचीं वचनं देऊन तुम्हीं दानशूरतेचें ढोंग पांघरतां, आपल्या तुटपुंज्या ज्ञानाचं अगाध प्रदर्शन करतां आणि आपल्यावर कधींच न आलेल्या प्राणांतिक प्रसंगांचीं खोटीं वर्णनं करून शूरत्वाच्या गप्पा सांगतां. दादा, साधारण स्त्री या सर्व प्रकारानं सहज मोहित होते आणि म्हणूनच तुम्हीं पुरुष नेहमीं आपल्यापेक्षां बुद्धीनं, सामर्थ्यानं कनिष्ठ अशाच स्त्रीशीं सहवास दृढ करीत असतां. Because they worship you as their idols (कारण त्या तुमची देवाप्रमाणं पूजा करतात.) दादा, भांडवलशाहीचा खरा छळ तुला पाहायचा असेल तर तो तुला प्रत्येक कुटुंबांत दिसेल, त्याच्यासाठीं गिरणीच्या धुराड्याकडं पहाण्याची गरज नाहीं."

"आणि म्हणूनच मी विवाहाच्या गुलामगिरींत कोणाही स्त्रीला अडकवूं इच्छित नाहीं" दमननें हंसत प्रत्युत्तर केलें, "ताई, भांडवलशाहीचा मी कट्टा दुष्मन् आहें. त्या राक्षसाला कोणत्याही स्वरूपांत क्षणमात्र मी जगूं देणार नाहीं. ताई, कुणालाही सांगायचं नाहीं, माझी शपथ आहे. आम्हीं गुप्त कट केला आहे; त्या कटांत सामील असलेले क्रान्तिकारक अखिल हिंदुस्थानभर जाळ्याप्रमाणं पसरले आहेत. परराष्ट्रां-

तील साम्यवादी संघाकडून आम्ही आर्थिक सहाय्य मिळविण्याचा प्रयत्न करतों आहों. यासाठीं लागणारी शस्त्रसामुग्री आम्ही जमवीत आहों. तुला आणि शशीलाही ह्यांत सामील झालं पाहिजे."

"दादा" अनामिका गहिंवरून ओरडली, "काय केलंस हें! आईला वचनं देऊन शेवटीं असा गळा कापलास?"

तिनें एकदम हुंदका दिला व दोन्ही हातांनीं तोंड दडवून ती रडूं लागली.

"ताई, चल, किती वेडी आहेस तूं!" दमन तिच्या खांद्याला पकडून गदगदां हलवीत म्हणाला, "थट्टादेखील तुला समजत नाहीं. अत्याचारी क्रान्तीविरुद्धच मी शशीबरोबर बोलत होतों. वेडगळ कुठली! असं मुलासारखं भोंकाड पसरायला आतां तूं लहान नाहींस कांहीं."

अनामिका डोळे पुशीत असतांच तिच्या चेहऱ्यावर हास्य झळकलें. हळूंच तिनें ओशाळून शशिधरकडे पाहिलें. तोदेखील कौतुकानें तिच्याकडे पहात हास्य करीत होता.

"शशी, हंसूं नकोस" दमन रागाचा आविर्भाव करीत म्हणाला, "डोळयांनीं कटाक्ष टाकण्याएवढीच डोळयांतून पाणी काढण्याची क्रिया स्त्रियांना सुलभ असते."

"बरं बरं," अनामिका मान हालवीत म्हणाली, "तूं माझ्याशीं बोलूंसुद्धां नकोस."

"ठीक आहे. शशी, मग पुढल्या वर्षी आम्ही क्रान्ति यशस्वी करणारच." दमन उसन्या निश्चयानें म्हणाला.

"नाहीं लवकरच." अनामिका जीभ चावीत म्हणाली.

"पण क्रान्तीचा संभव हिंदुस्थानांत होईल असं तुला वाटतं का?" शशिधरनें मध्येंच प्रश्न केला.

"शशी, एखाद्या राष्ट्रांत क्रान्ति यशस्वी झाली म्हणून ती सर्वच राष्ट्रांमध्यें शक्य असते असं समजूं नकोस. समाजसत्ताक राज्यपद्धतींत जनतेच्या आकांक्षाप्रमाणं कांहीं प्रमाणांत बदल होत असतो. यामुळें लोकमताच्या तीव्रतेबरोबर राजसत्ताधारीही आपलं धोरण बदलीत असतात.

यासाठीं क्रान्तीला अनियंत्रित सुलतानशाही पोषक असते आणि त्यामुळंच लोकमत क्षुब्ध होणं संभवनीय असतं. बऱ्याच राष्ट्रांतील भांडवलशाहीच्या भागीदारांना या तत्त्वाची जाणीव असल्यामुळंच मजुरांच्या मागण्यांना क्रान्तीचं स्वरूप येईल असं दिसतांच भुकेनं व्याकूळ झालेल्या मजुरांपुढं लहानशा सुधारणेचा चत्कोर फेंकून भांडवलशाही किंवा तिचे राजसत्ताधारी हस्तक येणारी परिस्थिति पुढं ढकलीत असतात. कालपरत्वं ज्या राष्ट्रांत अशा राजकीय,सामाजिक आणि आर्थिक सुधारणा होत असतात त्या राष्ट्रांत क्रान्ति असंभवनीय ठरते. शिवाय राष्ट्रांत एकाच धर्माच्या नांवाखालीं अखिल जनता असली तर साम्यवाद प्रस्थापित करणें जास्त सुलभ होतें. कारण धार्मिक स्वातंत्र्यासाठीं जनतेंत जर संशयित वृत्ति असेल तर भिन्नभिन्न धर्मांचे लोक एकाच ध्येयासाठीं निकरानं लढतील हें असंभवनीय आहे. याशिवाय हिंदुस्थानची अध्यात्मिक परंपरा आणि संस्कृति अशी विचित्र आहे, कीं परराष्ट्रांशीं तुलनात्मक दृष्टीनं पहातां भारतवासीयांना अत्याचारी मार्गाबद्दल ओढ कमीच असून ते जास्त शांतताप्रिय आहेत. तसंच आमच्या देशांत ज्ञातिनियंत्रणामुळं भांडवलशाही आणि मजूर यांमध्यें क्रान्तीला आवश्यक इतका अभेद्य तट झालाच नाहीं. याचं कारण भांडवलदाराला आपल्या मुलांमुलींचे विवाह ज्ञातीच्या नियंत्रित क्षेत्रांतच करावयाचे असल्यामुळं पुष्कळ वेळां त्याला मध्यमवर्गांतूनही आज निवड करावी लागत आहे. त्याचप्रमाणं हिंदुस्थान देश कृषिप्रधान असल्यामुळं यांत्रिक उद्योगप्रधान देशांत दिसणारी कुबेरी भांडवलशाही अजून आपल्या देशांत निर्माण झाली नाहीं. क्रान्तीच्या मार्गांत आणखीही अनेक अडचणी आहेत. शशी, माणसाच्या मोठेपणाला महत्त्व देऊन आणि त्याच्या बुद्धिमत्तेची व योग्यतेची खोटी प्रशंसा करून चिडलेल्या जनसमूहाकडून क्षुब्ध परिस्थितींत जाणून बुजूनच वक्तृत्ववान पुढारी युद्धप्रवर्तक भाषणांनीं देशांत चळवळ घडवून आणीत असतात. पण क्रान्तीची भूमिका तयार करणं फारच कठीण असतं. मग ती इष्ट असो अगर नसो."

"पण दमन, मला वाटतं कीं प्रत्येक व्यक्तीला सांपत्तिक किंवा आर्थिक समता प्राप्त करून दिली तर महत्त्वाचीं व अवघड कार्यं तत्परतेनं

आणि जबाबदारीनं कुणीच करणार नाहीं. त्याचप्रमाणं जर प्रत्येक व्यक्तीला त्याच्या सामाजिक अगर राजकीय महत्त्वाप्रमाणं मोबदला न मिळतां तो प्रत्येकाला जर समप्रमाणांतच मिळाला तर अवघड व बौद्धिक कार्यांची जबाबदारी कुणीच घेणार नाहीं."

"शशी, ही भीतीसुद्धां मला निरर्थक वाटते. साम्यवादाखालीं आर्थिक मोबदला जरी कदाचित् समप्रमाणांत मिळाला तरी प्रत्येक व्यक्तीच्या विशिष्ट व अधिक महत्त्वाच्या कार्याबद्दल त्याला अधिक मोबदला देण्यांत येतोच. मात्र तो मोबदला आर्थिक स्वरुपाचा नसतो एवढंच. त्या व्यक्तीला सामाजिक मोबदला व कधीं राष्ट्रीयदृष्ट्या अधिक मान्यता आणि अधिकारं देऊन मानवी व्यक्तित्व, वैशिष्ट्य आणि कीर्ति त्याला देता येते. शशी, माणसाला पैशाचा अभिलाष कां वाटतो याचं उत्तर पैशानं मिळणारी सत्ता हेंच प्रामुख्यानं देतां येईल. पण साम्यवादांत ही पैशाची सत्ता काढून घेऊन ती सरळ मनुष्याच्या कर्तबगारीशीं संघटित केली जाते. पैशाच्या जोरावर आपली विशिष्ट आवडनिवडही साध्य करतां येते. यासाठीं मनुष्याला तो आवश्यक वाटत असतो. पण साम्यवाद प्रस्थापित झाल्यावर होणारा अगणित अपव्यय थांबवून राष्ट्रसत्ता सर्वसाधारण वैयक्तिक आवडनिवड मनुष्याला सुलभ करून देण्याचा प्रयत्न करील. शिवाय जगांतील प्रत्येक उदात्त कार्य, मग तें सामाजिक, राजकीय, कलाविषयक किंवा शास्त्रीय असो तें निर्हेतुक उदारवृत्तीमुळंच झालं आहे. राजकीय क्षेत्रांतील पुण्यात्मे पहा, सामाजिक क्षेत्रांतील सुधारक घ्या किंवा चित्रकार, साहित्यिक आणि संशोधक पहा. त्यांची उत्कट कृति नेहमींच निःस्वार्थबुद्धीनं निरपेक्षपणं नानाप्रकारच्या आपत्ती सोसूनच निर्माण झाली आहे असं तुला दिसून येईल. शशी, जर प्रगतिपर संस्कृतीवर विश्वास ठेवायचा तर उत्तरोत्तर असे उदार पुण्यात्मे अधिकाधिक दिसूं लागतील. शिक्षणानं आम्हाला भावी पिढीला ह्या ध्येयाच्या प्राप्तीसाठीं सुसंस्कृत करतां येईल. आणि हाच आपला उदात्त धर्म होऊं शकेल. मनुष्य धर्मासाठीं केवढा अलोट स्वार्थत्याग करीत आला आहे हें तूं पाहिलें आहेस. मग तो पारमार्थिक धर्म असो अगर राष्ट्रधर्म असो. याशिवाय

साधारणतः मनुष्य हा उद्योगप्रिय प्राणी आहे असं मला वाटतं. त्याच्या प्राथमिक गरजा भागल्या कीं तो संशोधक व निर्माता बनतो. साम्यवादा-मुळं मनुष्यास जास्त विश्रान्ति मिळाली म्हणजे तो जास्त तन्मयतेनं आपला उद्योग करील व अधिक कार्यसंपन्न व प्रतिभासंपन्न होईल. शशी, भांडवलशाही जगतांत पैसा हें ध्येय झालं आहे. साम्यवादी जगतांत लौकीक आणि मान्यता हें ध्येय होईल. भांडवलशाहीनं निर्माण केलेले प्रश्न साम्यवादानंतर उत्पन्न होतील असं मला वाटत नाहीं. आम्हीं बुद्धि-परंपरेनं चालत आलेल्या नैतिक, धार्मिक व सामाजिक कल्पनामुळं व पूर्वग्रहामुळं निःपक्षपातानं याचा बिलकुल विचार करीत नाहीं आणि यामुळंच अजून कांहीं काळ साम्यवाद मूळ धरणार नाहीं असं मलाही वाटतं."

"दमन" शशिधर गंभीरपणें म्हणाला, "एवढा साम्यवादाबद्दल खोल विचार कितीसे लोक करीत असतील कुणास माहीत. मानवाच्या कर्तृत्त्वाची आणि बौद्धिक विकासाची ही काल्पनिक रूपरेषा आहे असं मला वाटतं. मानवाच्या विवेकबुद्धीची ही फाजील अपेक्षा तूं करीत आहेस असं मला वाटतं. कदाचित् तूं भावी पिढीचा प्रतिनिधी असशील."

"ह्या पदवीबद्दल मी तुझा फार आभारी आहें." दमन हंसत म्हणाला, "पण शशी, शास्त्रीय प्रगति आणि आन्तरराष्ट्रीय परिस्थिति यांचे परिणाम जागतिक स्वरूपाच्या कोणत्या दिशेनं होणार. परिस्थितीचं कधीं कसं भिन्न स्वरूप दिसेल हें कुणालाच सांगतां येणार नाहीं. पण शेवटीं उदात्त साम्यवाद प्रस्थापित झाल्याशिवाय राहणार नाहीं. मग कदाचित् साम्यवाद प्रस्थापित होत असतां जुल्मम आणि अतर्क्य हालअपेष्टा मानव-जातीला सहन कराव्या लागतील. कारण प्रत्येक स्थित्यंतर कांहीं व्यक्तींस व संस्थेस कष्टदायक होत असतं. व ज्यांनीं तें स्थित्यंतर घडवून आणलं त्यांच्या हातून अन्याय होत असतील, पण कालान्तरानं तो उत्साह नाहींसा होऊन पुन्हां शांतता निर्माण होत असते. शशी, अखेरीबद्दल मी पूर्ण आशावादी आहें."

"दादा," अनामिका मध्येंच म्हणाली, "तुम्ही कित्येक वेळां उगाच भांडवलशाहीला शिव्या देतां. गिरण्या जर तोट्यांत चालत असल्या अन् मालाला मागणी नसली तर मग भांडवलदारांनीं तरी काय करावं?"

" ताई, " दमन एकदम आवेशानें उत्तरला, " जगांत कोट्यावधी माणसं थंडीनं गारठलेलीं दिसत असतांना कापडाला मागणी नाहीं असं म्हणणं याचा अर्थ तरी काय ? त्याचप्रमाणं अगणित कुटुंबं अन्नासाठीं तडफडत असतां धान्याला मागणी नाहीं म्हणून हजारों मैलांच्या पिकलेल्या गव्हांच्या शेतांना आग लावण्यांत येते किंवा कापसाचीं पिकं जाळलीं जातात ही किती लाजिरवाणी गोष्ट आहे ? अग कपड्याला, धान्याला आणि जीविताला लागणाऱ्या अनेक जिनसांना कदाचित् आजच्या एवढी जोराची मागणी कधींच नव्हती. पण भांडवलशाहीच्या विषमतेमुळं ती गरज पुरविण्याचं सामर्थ्य मात्र कुणांत राहिलं नाहीं. ताई, जगांतील प्रत्येक लढाई ही भांडवलशाहीच्या व्यापारासाठीं जमिनीसाठीं, आणि राष्ट्राराष्ट्रांच्या स्वार्थासाठीं चालली आहे, मग त्याला धर्मयुद्ध म्हणा अगर मातृभूमीच्या स्वातंत्र्यासाठीं अगर लोकशाहीच्या संरक्षणासाठीं युद्ध म्हणा. फार तर त्याचा परिणाम एका भांडवलशाहीची सत्ता बदलून दुसऱ्या भांडवलशाहीची सत्ता प्रस्थापित होण्यांत होईल एवढंच. पण साम्यवाद प्रस्थापित झाला तरच जगांतून लढाईचं कायमचं उच्चाटण होईल असं मला वाटतं. तोंपर्यंत अशाच क्रूर लुटारू ( Exploiting ) लढाया चालू राहणार. "

" पण दादा, " अनामिका म्हणाली, " साम्यवाद हा उदार ध्येयवाद आहे हें मी कबूल करतें. पण साम्यवादीही आयुष्याच्या अखेरपर्यंत आपल्या ध्येयाशीं इमानी रहाणार नाहीं असं वाटतं. विवाह झाल्यावर त्यांच्या कार्याच्या मर्यादाही आकुंचित होतात. आपल्या मुलांच्या आर्थिक स्वास्थ्यासाठीं स्वतंत्रपणें धनाचा संचय करावा हा मोह सहाजिकच त्याला होणार आणि भांडवलशाहीच्या दूषित वातावरणांत तोदेखील सामील होणारच. सहाजिकच त्याचा साम्यवादाबद्दल वाटणारा उत्साह कमी होणार व लोकही त्याच्या सच्चेपणाबद्दल साशंक असणार. दादा, लष्करा-प्रमाणं कांहीं तरुण माणसांनीं त्यांत सामील व्हावं आणि कसलेल्या योद्ध्यांनीं शत्रूच्या भक्षस्थानीं पडावं असंच ह्या साम्यवादाचं रहाटगाडगं चालणार. "

" ताई, एकाच निवडणुकींत जर मतदार आपल्या अंतिम ध्येयावर विश्वास ठेवून आपले प्रतिनिधी निवडून देतील तर अनेक राष्ट्रांत साम्यवाद प्रस्थापित करायला फार काल लागायचा नाहीं. पण भांडवलशाही पैसा, वृत्तपत्रें आणि भांडवलदारांच्या हातांतील बाहुली बनलेली राजसत्ता याच्या साह्यानं प्रचारकार्य करून साधारण समाजाच्या डोळ्यांत सहज़ धूळ फेंकते आहे. अग, मतदारसंघ जेवढा अशिक्षित, अज्ञानी तेवढं भांडवलशाहीला फायदेशीरच होत असतं."

" मग दमन, जागतिक साम्यवादाची आशा मृगजळच ठरणार का ?" शशिधरनें खिन्नपणें प्रश्न केला.

" शशी, माझ्याही मनांत अशी शंका कधीं कधीं निर्माण होत असते आणि त्या वेळीं मी अगदीं हताश होतों. धनांध झालेल्या भांडवलशाहीला नष्ट करणं सर्वस्वी अशक्य आहे. आणि केवळ अत्याचारी क्रान्तीचा स्फोटच कदाचित् तिचीं पाळंमुळं खणून टाकील. पण शशी, भावनावश साम्यवाद क्वचितच दृढतेनें पाळंमुळं धरील असंही मला निश्चितपणं वाटतं. जर जगांत उदात्त साम्यवाद नांदायचा असेल तर तो बौद्धिक साम्यवादच असला पाहिजे. शशी, पुन्हां सांगतों कीं जर प्रगतिपर संस्कृतीवर विश्वास ठेवायचा तर बौद्धिक साम्यवाद हीच अंतिम समाजघटना आहे असं मला वाटतं."

दमननें दीर्घ निश्वास टाकला. खिडकींतून त्यानें आकाशाकडे पाहिलें. लक्षावधी चांदण्या आकाशांत लुकलुकत होत्या. आकाशगंगा नीलपटावर पसरली होती. वृक्षांच्या छायामय आकृति आकाशाच्या पार्श्वभूमीपुढें गंभीरपणें डोलत होत्या.

कांहीं वेळानें खिन्नपणें दमन म्हणाला, " मानवजातीला विश्रान्ति नाहीं. एकसारखी धडपड हाच तिचा धर्म आहे. मानवाला अखेरपर्यंत अज्ञात आणि अजिंक्य ध्येयासाठीं धडपडलं पाहिजे असंच मला वाटतं."

दमननें त्या प्रसंगाचें जणूं काय हें भरतवाक्यच म्हटल्याप्रमाणें भास झाला. शशिधरला आणखी कांहीं बोलायचें होतें. पण तो स्तब्ध

राहिला. अनामिकाही गप्प होती. आकाशाच्या मध्यभागांतून एक तारा दिव्य तेजानें चमकत क्षितिजापर्यंत येऊन लुप्त झाला.

बराच वेळ कुणींच कांहीं बोललें नाहीं. शेवटीं दमन उदासपणें म्हणाला, "ताई, जेवण झालं नाहीं का ?"

अनामिकेचें हृदय भावनांनीं भरून आलें होतें. हलकेच हातानें डोळे पुसून तिनें दमनच्या बाहूला स्पर्श केला व ती स्निग्ध स्वरांत म्हणाली, "तुम्हांला जेवायला बोलवायलाच मी आलें होतें. पण तुमचं बोलणं ऐकण्याच्या भरांत विसरून गेलें. चला, आई वाट पहात असणार."

तिघेंही निमूटपणें खोलींतून गेलीं. दिव्याच्या मंदप्रकाशामुळें त्या प्रसंगाला विलक्षण औदासिन्य आलें होतें.

———

# १८

रुबी मालवणला आल्यावर पांचसहा दिवस झाले होते तरी दमनशीं मोकळेपणानें दोन घटका बोलण्याची तिला संधि मिळाली नव्हती आणि कधीं तसा योग आलाच तर दमन कांहींतरी निमित्तानें तेथें शशिधर अनामिका किंवा शकुन्तलाबाई यांना बोलावीत होता. यामुळें तो आपल्याशीं एकांत टाळतो आहे ही गोष्ट रुबीच्या लक्षांत येण्यास फार काल लागला नाहीं.

तिनें आपल्या चतुर बुद्धीनें, प्रेमळ स्वभावानें आणि मनमोकळ्या वागणुकीनें अल्पावधींतच अनामिकेला आपल्या जीवाभावाची सखी केली होती. एवढंच नव्हे तर शकुन्तलाबाईंचेंही प्रेम तिनें संपादन केलें होतें. रुबी परधर्मीय आहे ह्या विचारानें जरी त्यांना वैषम्य वाटलें होतें तरी त्या आपल्या मनाला समजावण्याचा प्रयत्न करीत होत्या. दिवसेंदिवस दमनची वैवाहिक जीवनाबद्दल उदासीनता वाढत चालली आहे, आणि या वेळीं त्याच्या पसंतीला जरासुद्धां विरोध करणें उचित होणार नाहीं; रुबी सौन्दर्यसंपन्न आहे, हुषार आहे व दमनवर तिचें खरेंखुरें प्रेम आहे. त्याचा संसार ती खात्रीनें सुखाचा करील व त्याला वैराग्याच्या मनोवृत्तीपासून परावृत्त करील. फौजदारी खटल्याच्या वेळीं तिनें आपण होऊन आर्थिक सहाय्य केलें होतें. काळजीमुळें ढळढळां रडली होती आणि आज आपण तिला नकार कसा द्यावा !

पण कदाचित् दमन तिच्याशीं विवाह करणार नाहीं असा विचार त्यांच्या मनांत डोकावत होता. कारण तो म्हणत असे, “आई, चिमुकल्या संसारांत माझं मन आतां रमणार नाहीं. माझ्या आचारविचाराशीं कुणीही स्त्री समरस होणार नाहीं आणि एका स्त्रीच्या जीविताचा नाश केल्याचा

आरोप मात्र माझ्यावर करतील. माझ्या ध्येयासाठीं तन्मयतेनं लढतांनाच मला आनंद वाटतो."

अनामिका मात्र दमन–रुबी यांच्या स्नेहाचें परिवर्तन विवाहांत घडवून आणण्यासाठीं अनेक प्रयत्न आणि बेत करीत होती. या बाबतींत शशिधराशींही ती विचारविनिमय व संगनमत करीत होती. पण दमन मात्र रुबीच्या भावना आपल्याला समजत नसल्याचा बहाणा करीत होता. ती आल्यापासून त्याच्या चेहऱ्यावर एकसारखें विलक्षण गांभीर्य पसरलेलें दिसत होतें. एखादें तत्त्वज्ञानाचें अगर अर्थशास्त्राचें पुस्तक घेऊन तो वाचनांत अगदीं मग्न असे. मध्येंच कुणी कांहीं प्रश्न केला तर अगदीं त्रोटक उत्तर देऊन पुन्हां तो वाचन सुरू करी. रुबीच्या स्निग्ध प्रेमार्द्र-दृष्टीकडे पहातांना तो आपला चेहरा निर्विकार करण्याचा आटोकाट प्रयत्न करी. यामुळें तो आपला तिरस्कार करीत असावा असाही दुःखदायक विचार तिच्या मनांत येत होता. त्या दिवशीं शशिधरनें त्याला ह्या मनोवृत्तीबद्दल प्रश्न केला तेंव्हां तो खिन्नपणें हंसून म्हणाला, "शशी, मला कांहीं होत नाहीं. माझ्या मनोवृत्तींत बिलकुल बदल झालेला नाहीं. फक्त तो तुमच्या दृष्टींत झाला आहे. आपल्याला ह्या शांत ठिकाणाहून पुन्हां लवकर मुंबईस जावयाचं आहे यामुळं मला कांहींसं वाईट वाटत असतं. लहानपणीं नाना, आजी आणि आम्ही इकडे येत होतों. या समुद्रकिनाऱ्यावर पोहायला शिकलों, होड्या फिरविल्या, बांबूचे किल्ले बांधले आणि सुंदर शिंपले जमविले. त्या साऱ्या रम्य बालक्रीडा आठवून मन उदास होतं. शशी, व्यसनाधीन मनुष्याप्रमाणं साम्यवादाचं मला व्यसन लागलं आहे, त्यांतून बाहेर येऊन व्यवहारी दृष्टीनं जगाकडं मला पहातां येईल असं वाटत नाहीं. माझ्या मनावर कित्येक वेळां वैराग्याचा एवढा भयंकर पगडा बसतो, कीं सर्वसंगपरित्याग करून मी बैरागी कसा बनलों नाहीं याचं मला आश्चर्य वाटतं!"

"दमन," शशिधर म्हणाला, "मला तुझ्याबद्दल भीति वाटूं लागली आहे. तुला वेड लागलं असावं असाही संशय मला येतो. बेळगांवला मला तूंच ना तो स्फूर्तिदायक उदात्त उपदेश केला होतास?

दमन, मी पडलों डॉक्टर. बेशुद्ध असतास तर एखादें इंजेक्शन् देऊन शुद्धीवर तरी आणला असता. पण सावध असतांना बेशुद्धपणाचं ढोंग केल्यावर कुठचा धन्वंतरी तुला बरा करील? तुझा लपंडाव रुबीच्या आणि आमच्या लक्षांत येत नाहीं असं का तुला वाटतं?"

"शशी, खरा डॉक्टर आहेस!" दमन त्याच्या पाठीवर हातानं थोपटून हंसत म्हणाला, "अरे, तुला एखादं औषध उपायकारक झालं म्हणून मलाही तें परिणामकारक होईल असं तुला कसं वाटतं? हृदय-रोगावरचं औषध मानसिक रोगावर कसं चालेल?"

"पण दमन," शशिधर लगेच उत्तरला, "पुष्कळ वेळां मान-सिक रोगाचं मूळ कारण हृदयरोगच असतो आणि त्या वेळीं हृदयविकारा-वरील औषधच परिणामकारक होतं. अलीकडं तर आम्हां डॉक्टरांचं असं ठाम मत होत चाललं आहे, कीं प्रत्येक तरुणाच्या आजारांत हृदयविकारच प्रथमतः कारणीभूत होत असतो And then it quickly affects the brain (आणि मग तो झटकन् मेंदूवरही परिणाम करतो.)"

इतक्यांत रुबी तेथें आली. तिनें मनगटावरील घड्याळांत पाहिलें तो नऊ वाजून गेले होते. वर्षाऋतु समीप आल्यामुळें जरी आकाशांत मेघ पसरले होते तरीदेखील बाहेर स्वच्छ चांदणें पडलें होतें. सायंकाळीं पावसानें कांहीं वेळ शिंतोडा घातल्यामुळें भूमींतून एक प्रकारचा उन्मादक वास येत होता व बंगल्याच्या फाटकाजवळ फुललेल्या रातराणीचा मोहक सुगंध वाऱ्याच्या झुळकेबरोबर मिश्रित होऊन दरवळत होता. आजू-बाजूच्या झाडींतून रानकिडे किरकिरत होते.

रुबी निमूटपणें खिडकीकडे जाऊन बाहेरच्या देखाव्याकडे पहात उभी राहिली. समोर दिसणारीं नारळीचीं झाडें मंदपणें डोलत होतीं. जवळच असलेला विस्तीर्ण पिंपळवृक्ष वाऱ्यानें सारखा सळसळत होता. त्या वृक्षाच्या मागें चंद्रबिंब मंदपणें प्रकाशत होतें. यामुळें माडाचीं लांब झांपें रुपेरी कान्तीनें चमकत होतीं.

कांहीं वेळ त्या देखाव्याकडे पाहून रुबीनें दीर्घ निश्वास टाकला व तिनें मान फिरवून मागें पाहिलें. तिच्या सौंदर्याला या वेळीं मोहक मार्दव

प्राप्त झालें होतें. ती फिक्कट पोपटी रंगाची व काळयाभोर किनारीची साडी नेसली होती व त्याच रंगाचा बिनबाह्याचा ब्लाऊझ तिच्या अंगांत होता. आपल्या काळयाभोर कुरळ्या केंसाची सैल लांब वेणी तिच्या पाठीवर रुळत होती. केंसाच्या कांहीं बटा तिच्या भालप्रदेशावर व कानशिलाजवळ रुळत होत्या. कानांतील हिरकण्याचे डूल एकसारखे दिव्याच्या प्रकाशांत चमकत होते. खिडकींत उभी राहून आकाशाकडे पहातांना नीलनभाच्या पार्श्वभूमीमुळें तिच्या उंच शरीरयष्टीचें सौष्टव अतिशय आकर्षक वाटत होतें. खिडकीच्या एका बाजूला आपली पाठ टेकून ती उभी होती व तिनें आपला हात वर करून दाराच्या चौकटीला धरलें होतें. उघड्या मांसल बाहूवर दिव्याचा मंद प्रकाश पडल्यामुळें तिच्या निर्मल गौर कान्तीला विशेषच मोहकता आली होती. वाऱ्याच्या झुळकेबरोबर तिच्या केंसावरून पदर खालीं घसरला तरी कांहीं हालचाल न करतां ती समोर खिन्न दृष्टीनें पहात तशीच उभी होती.

शशिधर निमूटपणें खोलींतून कधींच निघून गेला होता. दमन जवळच पडलेला एक इंग्रजी मासिकाचा अंक घेऊन शून्यपणें त्याचीं पानें चाळीत होता. रुबीनें पुन्हां निश्वास टाकल्याचा आवाज ऐकतांच त्यानें मान वर करून तिच्याकडे पाहिलें. ती हातानें डोळे पुशीत होती. खिडकीकडे जाऊन त्यानें तिच्या चेहऱ्याकडे पहाण्याचा प्रयत्न केला. तिच्या गालावरून अश्रूंचे ओघळ वहात आहेत हें त्या चांदण्यांत त्याला दिसलें. तिच्या चेहऱ्यावर व्याकुलता दिसत होती.

"रुबी," त्यानें स्निग्ध स्वरांत हांक मारली. तिनें अश्रूंनीं डबडबलेल्या नेत्रांनीं त्याच्याकडे एक वेळ पाहिलें व पुन्हा मान फिरवून समोरच्या वृक्षामागें प्रकाशणाऱ्या चंद्राकडे पाहूं लागली.

"रुबी," दमन पुन्हां आर्त स्वरांत म्हणाला, "रुबी, कसला एवढा विचार करते आहेस ? आकाशांत तुला एवढं काय दिसत आहे ?"

"Lovely Moon. (निराकार चंद्रकोर.)" रुबी आंवढा गिळून अत्यंत करुण स्वरांत उद्गारली.

" रुबी, " दमन तिच्या भाषणाचा मतितार्थ आपणास समजला नाहीं असें दाखवून म्हणाला, " पण तिनंच आपल्या तेजानं साऱ्या तारका आकाशांतून नाहींशा केल्या आहेत. "

" खरं आहे तुझं म्हणणं " ती एकदम दाटलेल्या पण निश्चयी स्वरांत म्हणाली, " मी उद्यां मुंबईला जातें. "

तिच्या डोळ्यांतून दोन अश्रु खालीं सांडले व गळा दाटून आल्यामुळें तिला पुढें बोलवेना. पदरानें डोळे पुसून ती पुन्हां बाहेर पाहूं लागली.

" रुबी, तुझा असा बेत एकाएकीं कां झाला ?" दमननें खिन्नपणें प्रश्न केला.

तिला एकदम रडूं कोसळलें व त्याच्या अंगावर शरीराचा भार टाकून रडावें असेंच तिला वाटलें. तिनें हुंदका दिला. त्या वेळीं तिचें शरीर गदगद हाललें.

दमन खिन्नपणें विचार करीत होता. तिच्या दुःखावेगाचें कारण त्यानें कधींच जाणलें होतें. तिच्या मानसिक यातना न समजण्याएवढं त्याचें हृदय कठीण नव्हतें. कांहीं वेळानें तिचा उजवा हात आपल्या हातांत घेऊन तो उदासपणें म्हणाला, " रुबी, तूं आल्यामुळं तर सर्वांना किती आनंद झाला आहे ! "

" किती खोटं बोलतोस तूं. " ती एकदम हुंदकून म्हणाली, " तूं माझा तिरस्कार करतोस ! "

" तुझा तिरस्कार करण्याचा मला काय अधिकार ? " दमननें खिन्नपणें उत्तर दिलें.

बराच वेळ कुणींच कांहीं बोललें नाहीं. रुबी त्याच्या हृदयाचा ठाव घ्यावा म्हणून त्याच्याकडे निरखून पहात होती. कांहीं वेळ दोघेंही खिडकीपाशीं स्तब्धपणें उभीं राहून आकाशांत चाललेल्या ढगाच्या धांव पलीकडे पहात होतीं. त्यांच्या चेहऱ्यावर मृदु चांदणें पडलें होतें.

" रुबी, समुद्रावर फिरायला येतेस का ? " कांहीं वेळानें दमन शांतपणें म्हणाला.

तिच्या चेहऱ्यावर एकदम हास्याची छटा उमटली. झटकन् हातानें अश्रु पुसून तिनें होकार दिला व दोघेंही जिना उतरून खालीं आलीं. तेवढ्यांत रुबीनें आरशासमोर उभी राहून केशरचना व वेशभूषा व्यवस्थित असल्याचें पाहिलें व ती निघण्याकरतां बाहेरच्या खणांत गेली.

तिच्या चेहऱ्यावरील प्रेमळ उत्कंठा दमनच्या लक्षांत आली. तिचे सुंदर नेत्र उत्सुकतेनें चमकत होते. बारीक लांब भुंवया किंचित् वर झाल्यामुळें त्या अर्धवर्तुलाकार होऊन मोहक दिसत होत्या. चेहऱ्यावर उमलणारें गोड हास्य दडविण्याचा प्रयत्न करतांना तिचा लाल अधर किंचित् पुढें येऊन गालावर नाजूक खळी पडत होती. गालावरील आरक्तता दडविण्यासाठींच कीं काय ती आपल्या हाताचीं लांब सुबक बोटें मुखकमलावरून फिरवीत होती. तिचा रुंद भालप्रदेश साडीच्या पोपटी पदराच्या सान्निध्यामुळें विशेषच आकर्षक वाटत होता.

पण दमन मुद्दामच तिच्याकडे न पाहतां म्हणाला, " ताई आज लवकर झोंपली. शशिधरही फिरायला येत नाहीं म्हणाले."

रुबीनें चेहऱ्यावरील विकार दडविण्याचा प्रयत्न केला. तिला आनंदच वाटला. हास्य दडविण्याकरतां ती चपला चढविण्याच्या निमित्तानें खालीं वांकली व साहजिकपणाचा आव आणून म्हणाली, " कां बरं अनाताई एवढ्या लवकर झोंपली ? बरं वाटत नाहीं का तिला ? "

" झोपेचं सोंग केलं असेल तिनं." दमन चटकन् बोलून गेला.

त्याच्याकडे तन्मयतेनें पाहून रुबी आपली दृष्टी त्याच्या चेहऱ्यावर स्थिर करीत होती. दमनच्या अंगांत विजार व सदरा होता. त्यानें सदऱ्याचे हात वर गुंडाळले होते. गळ्याकडील बटन मोकळा सोडल्यामुळें त्याची पिळदार मान व खांदे रुबाबदार दिसत होते. केंस हातानेंच मागें लोटल्यामुळें त्याच्या रुंद भालप्रदेशावर केंसाचा झुबका रुळत होता व दिव्याच्या मंद प्रकाशांत तोंडावर पडलेल्या छायेमुळें नाकाची ठेवण फारच सुंदर वाटत होती. चेहऱ्यावर एक प्रकारचें गांभीर्य पसरलें होतें व त्याच्या टपोऱ्या डोळ्यांत औदार्याचें पाणी चमकत होतें.

रुबी पुन्हां पुन्हां वळून त्याच्याकडे पहात चालली होती. प्रेमभावनेनें तिचें हृदय भरून आल्यामुळें सभोंवारच्या साऱ्या जगाला ती पार विसरून गेली होती.

दोघेंही घरांतून बाहेर आलीं. रुबीनें फाटकापाशीं फुललेल्या रातराणीचे दोन तुरे तोडून त्याचा वास घेतला व त्यांतील एक तिनें दमनपुढें केला व चार फुलांचा झुबका घेऊन दोन्ही हातांनीं तो व्यवस्थित वेणींत खोंवून ती चालूं लागली.

या वेळीं किनाऱ्यावर अवर्णनीय शोभा पसरली होती. पश्चिम आकाशांत चंद्र प्रकाशत असल्यामुळें समुद्राच्या अफाट पृष्ठभागावर रुपेरी चमक पसरली होती. भरतीमुळें लाटा जणूं काय उचंबळून आपल्या फेंसाच्या सुंदर आकृति करीत किनाऱ्यावर दूरवर पसरत होत्या. मागें जाणाऱ्या व उन्मादानें पुढें धांवणाऱ्या लाटांचा परस्परांवर आघात होऊन पाणी एकदम उंच उडत असतांना रमणीय देखावा दिसत होता.

चंद्राचें शीतल चांदणें पडल्यामुळें प्रत्येक पदार्थ फुलल्यासारखा दिसत होता व किनाऱ्यावरील विस्तृत वालुकामय प्रदेश दुधसागराप्रमाणें भासत होता. त्या वाळूचा शीतल स्पर्श चालतांना पावलें आंत रुतत असल्यामुळें अतिशय सुखकर वाटत होता व गार वाऱ्याच्या झोतानें मन कितीतरी उल्हसित होत होतें.

तो देखावा पाहून भावनातिशयानें रुबी स्निग्धपणें म्हणाली, “अहाहा, जगांतील प्रत्येक दृश्य पदार्थाबरोबर माझं मनही फुलून गेलं आहे. दमन, तुझ्या हातांत हात घालून या किनाऱ्यावर असं कल्पान्तापर्यंत फिरावं असं मला वाटतं. किती सुंदर शोभा ही! निसर्गाचा हा गायनाचा स्वर्गीय जलसाच चालला आहे. समुद्र त्या काव्यसंग्रहाचीं पानें लाटेच्या रूपानें सारखा बदलीत आहे. चंद्र मेणबत्तीप्रमाणं त्याच्यावर प्रकाशत असतां रुपेरी शाईनं लिहिलेलीं तीं गूढ लिपींतील अक्षरं सारखीं चमकताहेत. वाऱ्यानं साथ करण्यासाठीं एकच सूर धरला आहे आणि ढगाच्या पडद्याआड आलेल्या तारका विलसून अमृततुल्य गान करीत आहेत. पण दमा, तें स्वर्गीय संगीत हृदयालाच ऐकूं येतं आहे. दमा!”

तिनें त्याचा हात घट्ट हृदयाशीं दाबला. दमननेंही तिच्या कम्बरे-भोंवतीं विळखा घातला होता.

जवळच पसरलेल्या माडवृक्षाच्या छायेंत दोघेंही बसलीं. लाटा पोकळ गर्जना करीत सारख्या किनाऱ्यावर थांबत होत्या. कांहीं वेळानें रुबी दमनचा हात आपल्या गालावर दाबून म्हणाली, "दमा, माझ्या दुबळ्या हृदयाला तूं हात देणार नाहींस का ? तुझ्याशिवाय मी तडफडून प्राण सोडीन."

"रुबाया," दमन खिन्नपणें आकाशाकडे पहात म्हणाला, "ह्या चंद्राप्रमाणंच आयुष्याचा मार्ग मला एकटेपणानं काढला पाहिजे. माझ्या सहवासानं तुला असं कोणतं सुख मिळणार ?"

"तें तुला कसं कळणार ?" ती अत्यंत करुण स्वरांत म्हणाली, "दमा, स्त्रीहृदयाची तळमळ पुरुषाला कालत्रयीं तरी कळेल का ? तूं माझ्याशीं विवाह करशील का ? होय म्हण."

"रुबाया, आपला विवाह कधींतरी शक्य आहे का ? तूं गिरणीची लक्षाधीश मालकीण तर मी साम्यवादी. आपला धर्मभेद किती तीव्र आहे, आपल्या विवाहापासूनच आपल्या दुःखास सुरवात होईल. ज्या सुखासाठीं आपण प्रेमविवाह करूं त्याच सुखाला आम्ही कायमचे—"

रुबीनें चटकन् त्याच्या तोंडावर आपले दोन्ही हात धरले व आवंढा गिळून ती गहिंवरून म्हणाली, "दमा, माझ्याच शब्दांनीं माझ्या व्याकुळ हृदयावर अशा तीव्र जखमा करूं नकोस. दमा, मला क्षमा कर. घोर अपराध झाला असला तरी औदार्याच्या राज्यांतदेखील त्याला क्षमा व्हायची नाहीं का ? दमा, मी हिंदी स्त्री होतें त्यामुळं मला मनोधैर्य झालं नाहीं. मी अगदीं अजाण होतें."

रुबीचा कंठ दाटून येऊन तिच्या डोळ्यांतून घळघळ अश्रू वाहूं लागले. दमननें तिची हनुवटी वर करून दृष्टि आपल्या नजरेला भिड-विण्याचा प्रयत्न केला व तिला घट्ट हृदयाशीं धरून अडखळत निश्वास सोडला.

बराच वेळ दोघेंही स्तब्ध होतीं. दमनच्या वक्षःस्थलावर डोकें टेकून तिनें डोळे मिटले. समोर पसरलेल्या वृक्षाच्या छाया पुढें मागें नाचत होत्या. कांहीं वेळानें दमन अतिशय गंभीरपणें म्हणाला, " माझ्या ध्येयामुळं माझ्या जीविताची नौका कुठं जाईल याचा नेम नाहीं. कदाचित् ध्येयनिष्ठेसाठीं मला मृत्यूचंही आव्हान स्वीकारावं लागेल. रुबाया, केवळ प्रेमासाठीं तुझ्या आयुष्याचा खेळखंडोबा मी कसा बरं करूं? तूं वैवाहिक जीवनाचा आणि ऐषआरामाचा आस्वाद चाखला आहेस. कदाचित् ध्येयसिद्धीसाठीं धडपडतांना दीर्घ कारागृहवास माझ्या नशीबीं यावयाचा आणि तुला एकटेपणानं तुरुंगांत खितपत पडलेल्या साम्यवाद्याची पत्नी म्हणून समाजांत दिवस काढावे लागतील. रुबी, जीविताबद्दल मला बिलकुल भरंवसा वाटत नाहीं, अशा वेळीं दुर्दैवानं कदाचित् तुझ्यावर पुन्हां वैधव्याचा—"

तिनें चटकन् त्याच्या तोंडावर आपला उजवा तळहात ठेवला व ती पुन्हां आवंढा गिळून म्हणाली, " किती भयंकर बोलतोस दमा! दुर्दैवानें जरी कसाही दारुणप्रसंग ओढवला तरी तुझ्या सहवासांतील एका दिवसानं मला जीवितांतील सारं स्वारस्य आणि आनंद उपभोगल्यासारखं वाटेल आणि त्या दिवसाच्या गोड स्मृतीवरच मी राहिलेलं आयुष्य कंठीत राहीन. पण तूं माझा अव्हेर केलास तर मात्र मी झुरून झुरून मरेन."

तिनें त्याच्या मानेला गच्च विळखा घालून आपलें मस्तक त्याच्या छातीवर ठेवलें होतें. त्यानें तिच्या मृदु केसावर हनुवटी आधारून खिन्न स्वरांत म्हटलें, " रुबाया, तुझ्याबद्दल माझ्या हृदयांत दृढ झालेली प्रेमभावना कालत्रयीं नाहींशी होणं शक्य नाहीं आणि यामुळंच गाडींतील तुझ्या सहवासांतील पापी कृत्याची जाणीव असतांही माझ्या हातून तो अन्याय घडला. एकमेकांना दृढालिंगनांत धरून गुदमरून प्राण सोडावे असंच मला वाटतं. रुबाया, तुझ्यासारख्या सौंदर्यसंपन्न अप्सरेनं माझी विनवणी करावी असा कोणता गुण माझ्याजवळ आहे! उदार, सुंदर तरुणीच्या बाहुपाशांत असतांना एवढ्या समंजसपणं मी विचार करीत आहे

म्हणून माझं हृदय दगडाचं तर नाहीं ना असंही मला वाटतं. रुबी, मला क्षमा कर. तुझ्या प्रेमासाठीं मी आजन्म अविवाहित राहीन. पण विवाहाच्या बंधनांत तुला जखडण्यासाठीं मला विनवूं नकोस."

"दमा, माझ्या हृदयाला तुझ्यासाठीं किती पीळ पडतो आहे!" रुबी त्याला अधिकच बिलगून कंपित स्वरांत म्हणाली, "तुझ्याशीं एका दिवसापुरतं विवाहसौख्य मिळालं तरी मला धन्यता वाटेल. तूं कितीही सांग, पण मी भांडवलदाराची मुलगी, खाणीच्या मालकाची विधवा व एवढ्याचसाठीं तूं संशयानं माझ्याकडे पहातोस. पण मी माझ्या साऱ्या इष्टेटी-वर, तुझ्या एका शब्दाबरोबर पाणी सोडतें. दमा, मी संसारांत कधींच सुखी नव्हतें. आम्हा दोघांत रहस्य असं मुळींच नव्हतें. मोटारच्या सहल, चित्रपट, क्लब, टेनिस् आणि प्रवास या चैनींनीं माझ्या हताश हृदयाला मी जगवित होतें. पण शेवटीं या प्रकाराचाही मला अगदीं वीट आला होता. हा मोटारचा भयंकर अपघात झाला नसता तर माझ्या जीविताला कोणती भयंकर दिशा लागली असती कुणाला माहीत! दमा, मला पापी, दुराचारी,स्वार्थी म्हण, पण पतीच्या सहवासांतही मला तुझी सारखी स्मृति होत असे आणि तुझ्याशीं विश्वासघात केल्याची जाणीव होऊन माझ्या हृदयाला दारुण वेदना होत असत."

दमननें तिला घट्ट हृदयाशीं धरली. परस्परांच्या हृदयाची धडधड दोघांनाही जाणवत होती. दृढ मिठीमुळें श्वासोछ्वासदेखील अडखळत बाहेर पडत होता. रुबीचे दोन्ही हात दमनच्या केंसावरून फिरत येऊन त्याच्या गालावर स्थिर झाले होते. ती साश्रू नयनान त्याच्याकडे अस्पष्ट-पणें पहात होती. दमननें तिच्या मानेखालीं आपल्या अधरांनीं चुंबन घेतलें व तिच्या वक्षःस्थलावर मस्तक ठेवून तो स्तब्ध राहिला. रुबीनें आपल्या क्षीण शक्तिनें त्याला तसेंच हृदयाशीं धरून ठेवलें होतें. जणू काय शब्दानीं हृदयाची तळमळ वर्णन करणें अशक्य असल्यामुळें हृदयाची धडधडच ती त्याला स्पष्टपणें ऐकवित होती.

आकाशांत ढगामागें चंद्र लपल्यामुळें एकदम कांहींसा अंधार झाला होता. समुद्र ढगांना हांकविण्याकरितां कीं काय सारखी पोकळ-

गर्जना करीत होता. वाराही जोरानं वहात होता. निवतीच्या खडकावरील दीपगृहांतून प्रकाशाचा झोत मधून मधून चमकत होता. किनाऱ्यावरून गलबताकडे जाणाऱ्या होडीचे नावाडी कोंकणी गीत गात वल्हवित होते. त्यांचा स्वर त्या शांत वेळीं वाऱ्यामुळें स्पष्ट ऐकूं येत होता. पश्चिम क्षितिजाजवळ चंद्र निस्तेज कान्तीनें प्रकाशत होता.

" दमा, " रुबीनें प्रणयार्त स्वरांत हांक मारून म्हटलें, " दमा, माझ्याशीं विवाह करशील ना ! "

" रुबाया, " दमन तिला हृदयाशीं गोंजारून म्हणाला, " तोच तोच प्रश्न पुन्हा पुन्हा कां विचारतेस ? त्यापेक्षां कांहींतरी उदात्त,. अधिक प्रिय असं मी देत आहे असं नाहीं कां वाटत तुला ! "

" माझ्या दमा, " रुबी त्याच्या ओंठावर आपल्या हातानें स्पर्श करीत काकुळतीनें म्हणाली, " मला अशी हिणवूं नकोस. मला ब्रह्मानंद उपभोगूं दे. माझ्याशीं लग्न करशील असे शब्द तुझ्या मुखांतून बाहेर पडूं देत. "

" याचं उत्तर ओठांनीं दिलं तर चालेल ना ? " असें म्हणून त्यानें तिच्या गालाचीं व अधराचीं पटापट चुंबनें घेतलीं.

रुबीनें त्याचे दोन्ही हात हातांत घेऊन आपल्या हृदयाशीं घट्ट दाबले व हलक्या स्वरांत म्हणाली, "दमा, दमा, I faint with joy ! "

तिनें त्याच्या अंगावर शरीराचा भार टाकला. दमनचे हात सैरावैरा तिच्या देहावरून फिरत होते.

या वेळीं मध्यरात्रीचा समय होत आला होता. सभोवार कुणाचीच चाहूल नव्हती. निस्तेज चंद्र काळ्याकुट्ट ढगांमागें लपल्यामुळें बराच अंधार वाढत होता. आकाशांत पूर्व दिशेला चांदण्याची गर्दी वाढत चालली होती. इतका वेळ जोरानें वाहल्यामुळें विश्रान्तीसाठीं वारा पडला होता. माडदेखील मंदपणें डोलत मधूनमधून झापांचा सळसळ असा शब्द करीत त्या अफाट समुद्रकिनाऱ्यावर पहारेकऱ्याप्रमाणें उभे होते.

दमन व रुबी फिरावयास गेल्यानंतर अनामिका आणि शशिधरही चांदण्यांत सहल करण्यासाठीं समुद्रकिनाऱ्यावर गेलीं होतीं. तीं दोघें परत घरीं आलीं व दमनची भरपूर थट्टा करण्याच्या उद्देशानें अंगणांत आराम खुर्च्या टाकून गप्पा मारीत बसलीं होतीं.

बारा वाजण्याच्या सुमारास दमन व रुबी घरीं आलीं. दमननें केलेली थट्टा अनामिका विसरली नव्हती.

" दादा, आई माझ्यावर पुष्कळच रागावली दमनला रुबीबरोबर एकटं कसं जाऊं दिलंस म्हणून. मला ती फार बोलली. "

दमननें मंद हास्य केलें व तो म्हणाला, " आजचा दिवसच असा आहे कीं प्रत्येकानं केलेला उपदेश त्याच्या अंगाशीं उलटतो आहे."

रुबीनें लडिवाळपणें त्याच्याकडे पाहिलें. तिच्या गालावर मोहक आरक्तता दिसली. शशिधरही आपल्या भाषणाची आठवण होऊन स्मित करीत होता.

" ताई, तुम्ही पण फिरायला खास गेलां होतां. एवढी सुंदर चांदणी रात्र प्रणयी माणसं खोलींत बसून बिलकुल घालविणार नाहींत. काय डॉक्टरसाहेब, माझा तर्क बरोबर आहे ना ? "

" दमन, आपला स्वानुभव तसाच असल्यावर तर्क कशाला करीत बसायला पाहिजे ? "

" दादा, आत्तां मला उलगडा झाला. प्रणयी माणसं चांदण्या रात्रीं फिरायला जात असतात." अनामिका म्हणाली, " आम्ही तुम्हांलाच शोधायला गेलों होतों. समुद्रावर स्वच्छ चांदणं पडलं होतं, पण तुम्ही कुठंच दिसलां नाहींत. "

" आणि आम्ही दिसूं म्हणूनच तुम्ही कुठं तरी दडलां होतां वाटतं ! मी फिरलों म्हणून आई कांहीं म्हणायची नाहीं. पण ताई, मुलीनं असं रात्रीं अपरात्रीं तरुणाबरोबर फिरणं उचित नाहीं. "

" ऐकलंस बाई रुबी, " अनामिका एकदम उद्गारली, " आमचे साम्यवादी दादासाहेब स्त्रियांबद्दल किती समता बाळगतात ती ! रुबी, सावध हो बरं आतां कदाचित् विवाहाचं वचन दिलं असलंस तर, "

रुबीच्या ओठावर शब्द आले होते. ‘ वचन दिलं नाहीं. वचन घेतलं. ’ पण ती हंसून स्तब्ध राहिली.

अनामिकेच्या त्या भाषणानें दमन गोंधळून गेला. रुबीशीं आपल्याला वचनबद्ध करण्याचा हा कट होता असेंच त्याला वाटलें.

घड्याळांत बाराचे ठोके पडले. इतक्यांत पिंगळी पक्षांनीं समोरच्या पिंपळवृक्षावर बसून किलबिल किलबिल असा शब्द केला. वाऱ्याच्या शीतल झुळकेबरोबर रातराणीच्या फुलांचा सुवासही एकदम आंत आला.

“ दादा, ” अनामिका आनंदानें सद्गदित होऊन म्हणाली, “ किती सुमंगल प्रसंगाची सूचना ही ! पिंगळीपक्षाची जोडी अशी रात्रीच्या वेळीं ओरडणं फार शुभ असतं. रातराणीसुद्धां तुमचं अभिनंदन करते आहे. ”

“ खरंच, ” दमन शांतपणें म्हणाला, “ गेल्या दोन तीन वर्षांचा आपला इतिहास लिहिला तर ती एक ठराविक ठशाची रोमांचकारी कादंबरीच होईल. त्यांतील सर्व पात्रांवर अनेक संकटें आणि आपत्ति येऊन त्याचा शेवट आनंदपर्यवसायी झाला असंच दिसेल. निसर्ग आणि मनुष्य यांच्या लढ्यांत् निसर्ग मनुष्याला केवळ खेळवितच असतो. यामुळं माणसाच्या संकुचित बुद्धीला आपला विजय होत आहे असं वाटलं तरी शेवटीं तो पराजितच होतो. ”

“ दादा, ” अनामिका म्हणाली, “ आणि त्या कादंबरीचा उपसंहार मी लिहीन. आणि आज रुबीच्या मांडीवर सहा महिन्याचं गोंडस बालक खेळतं आहे आणि दमन रुबीजवळ बसून दोघेंही त्या बाललीला पहाण्याचं स्वर्गीय सुख उपभोगताहेत—”

“ आणि मीही त्याला एखादं वाक्य जोडीन. ‘ आणि अनामिकाताई आपल्या दोन वर्षांच्या सुंदर बाळाला घेऊन बेळगांवहून बाळंतपणासाठीं माहेरीं आल्या आहेत. ” रुबी गोड हास्य करीत म्हणाली.

“ इश्श, वात्रट कुठली ! ” असें म्हणून अनामिका ओशाळली, “ दादा, थांब मी आईला पण उठवतें. ”

ती आंत गेली व थोड्याच वेळांत शकुन्तलाबाईसह बाहेर येऊन हंसत म्हणाली, “ आई, तुला दादा विचारतो आहे कीं लग्न इथंच करायचं कीं मुंबईला गेल्यावर ? कारण—”

" होय आई," दमन मध्येंच म्हणाला, " यापेक्षां बेळगांवलाच बरं नाहीं का ? काकींची पण तीच इच्छा आहे कीं शशीचं लग्न बेळगांवलाच व्हावं. आणि शशी, त्यांची ही इच्छा तुला पूर्ण केलीच पाहिजे."

" आई, पण दादाचं लग्न इथंच करायचं तुझ्या मनांत आहे ना ? मग आम्हांला घाई केली पाहिजे."

" अना," शकुन्तलाबाई प्रेमळपणें म्हणाल्या, " कुठंही आणि कधींही विवाह करा. तुमच्या आईला तुमच्या सुखाशिवाय कांहीं इच्छा नाहीं. दमा––"

त्यांचा कंठ दाटून आला. वात्सल्यानें सर्वांकडे पहातांना त्यांच्या डोळयांत पाणी आलें. त्यांच्या सात्विक चेहऱ्याकडे पाहून रुबीला आपल्या मृत मातेची आठवण झाली. एक वेळ त्यांना गच्च मिठी मारून भरपूर रडावें असेंही तिला वाटलें. क्षमेच्या याचनेनेंच ती आपल्याकडे पहाते आहे असें वाटून शकुन्तलाबाई तिच्या पाठीवरून हात फिरवून ममताळू-पणानें म्हणाल्या, " रुबी बाळ, माझ्याबद्दल तूं अशी बिलकूल शंका बाळगूं नकोस. तूं मला अनासारखीच आहेस. दमाचं आयुष्य सुखी करण्याइतकी चलाख आणि उदार आहेस तूं !"

शकुन्तलाबाईंना पुन्हां गहिंवरून आलें. कांहीं काल सर्वत्र स्तब्धता होती. कांहीं वेळानें पदरानें डोळे पुसून त्या म्हणाल्या, " चला, बारा वाजून गेले असतील. उद्यां सकाळीं किल्ल्यावर जाणार ना तुम्ही ?"

सर्व मंडळी आंत गेली. संध्याकाळीं दूरवर फिरावयास गेल्यामुळें त्यांना लवकर गाढ झोंप लागली. पण दमन मात्र बिछान्यावर पडून खिडकींतून आकाशांतील लुकलुकणाऱ्या चांदण्यांकडे पहात बराच काळ-पर्यंत विचार करीत होता. पहांटेचा प्रहर होण्यापूर्वींच कुठंतरी कोंबडा आरवला, तेव्हां विचारतंद्रींतून तो एकदम जागा झाला. पांयाजवळ पड-लेली शाल कम्बरेपर्यंत ओढून तो कुशीवर वळला व थोड्याच वेळांत झोंपीं गेला.

———

# १९

बेळगांवात शशिधर आणि अनामिका यांचा विवाह-समारंभ झाल्यानंतर दोन चार दिवसांनीं रुबी आणि दमनही त्याच ठिकाणीं विवाहबद्ध झालीं; तेव्हां शकुन्तलाबाईंना कितीतरी समाधान आणि धन्यता वाटली! एखादें सुखस्वप्न पहावें आणि जागृत होतांच अनपेक्षितपणें तसा योग घडून आलेला दिसावा तसेंच त्यांना वाटत होतें. त्यांना आपल्या निर्मल आनंदापुढें सभोंवारच्या जगाचें बिलकुल महत्व वाटलें नाहीं. दमन-रुबीच्या परधर्मीय विवाहामुळें त्यांच्या वर्तनाबद्दल साशंकपणें समाज-शिष्ट कुजबुजत होते, वाटेल ती अश्लील निंदा करीत होते व वेगवेगळीं अनुमानेंही काढीत होते.

मुंबईतदेखील दमनच्या विवाहाचा बराच गाजावाजा होत होता. भांडवलशाहीचीं हस्तक वृत्तपत्रें साम्यवादाची कुचेष्टा करण्याकरतां त्या विवाहाचा भरपूर फायदा घेत होतीं व दमनची मजूरवर्गांत दिवसेंदिवस वाढणारी लोकप्रियता पाहून मत्सरानें कांहीं भाईलोक स्थानीं अस्थानीं त्याची शक्य तों नालस्ती करण्याची सुसंधि दवडीत नव्हते.

पण दमन मात्र ह्या सर्व परिस्थितीमुळें यत्किंचित्‌ही खिन्न झाला नव्हता. वृत्तपत्रांतून येणारे अश्लाध्य निंदा-लेख तो रुबीपासून दडवीत होता व तिला वाईट वाटूं नये म्हणून तो नेहमीं तिच्याबरोबर गप्पागोष्टी करण्यांत व फिरण्यांत वेळ घालवित असे. त्या दिवशीं ती कांहींशी खिन्न दिसतांच तो म्हणाला, “ रुबी, सत्याचरण करीत असतांना लोक-निंदेमुळंच आपला आत्मविश्वास दृढ होत असतो. समोर चाललेल्या वायफळ टीकेला प्रत्युत्तर करून कांहींच फायदा व्हावयाचा नाहीं. मात्र त्या विषयाला रंग चढविण्यासाठीं टपलेल्या क्षुद्र वृत्तीच्या संपादकांना मात्र भरपूर

खाद्य मिळेल. कुठंतरी काळं असल्याचा भास होतांच पर समजून त्याचा कावळा करून हीं वृत्तपत्रें गहजब करतील व समाजशिष्ट कावळ्यांची सभा भरवितील. त्या वेळीं त्यांना पळविण्याचा प्रयत्न केला किंवा त्यांच्या दृष्टिविषयाला स्पर्श जरी केला तरी ती काव काव अधिकच असत्य होते. यापेक्षां तिकडे दुर्लक्ष करण्याची सहनशीलता असली म्हणजे आपोआपच तो कंठशोष बंद होत असतो. रुबी, परस्परांच्या सहवासानं सुख व आनंद वाटत असतांना बाहेरच्या जगामुळं आम्ही आमचं जीवन दुःखीकष्टी कां बरं करावं ? ”

ह्या उदार वृत्तीमुळें रुबीला त्याच्याविषयीं कितीतरी आदर वाटत होता. केवळ आपल्या सुखासाठींच आपण त्याला विवाहाच्या बंधनांत अडकविलें आहे असेंच तिला वाटत होतें. आपल्या सुखासीन मनोवृत्तीमुळें त्याच्या उदात्त ध्येयाच्या आड आपण येऊं अशी भीति तिच्या मनाला वाटत होती. पण ती मोठ्या धीरानें त्याच्या कार्याला हातभार लावण्याचा निश्चय करीत असे.

त्या दिवशीं सकाळीं अकरा वाजतां जेवण आटपून दमन आरामखुर्चीवर पडून नुकताच आलेला टाईम्सचा अंक वाचीत होता. त्याच क्षणांत पलीकडे असलेल्या कॉटवर पडून रुबी कसला तरी इंग्रजी मासिकाचा अंक चाळीत होती. दमननें वर्तमानपत्राचें मुख्य पृष्ठ उघडलें.

“ काय, मुंबईत गिरणीकामगारांनीं संप जाहीर केला ! भाई सदानंद त्यांचा पुढारी ? केवढा मूर्खपणा हा ! ” तो एकदम आश्चर्यानें उद्गारला.

रुबी चटकन् उठून त्याच्याजवळ गेली. तिनेंही वर्तमानपत्रांतील ठळक मजकुरावर नजर टाकली. कांहीं वेळ दमन शून्य दृष्टीनें खालीं पहात होता. त्याचा चेहरा एकदम गंभीर झाला.

“ मला त्यांनीं सभेचं आमंत्रणही पाठविलं नाहीं. ” खिन्नपणें निश्वास सोडून तो म्हणाला, “ कामगारांची सभा भरवून त्यांचं मत घेण्यापूर्वीच ह्या भाईपुढाऱ्यानीं हा अखेरचा निर्णय करण्यांत मजुरांचा केवढा विश्वासघात केला आहे ? एवढ्या तांतडीनं संप पुकारण्यांत यांचा हेतु तरी काय आहे ? ”

रुबीनें त्या वर्तमानपत्रांतील विशिष्ट मजकुरावर बोट फिरवून त्याचें लक्ष तिकडे वेधलें.

"काय ? गिरणीमालकसंघानें भाई सदानंदाची मुलाखत घेण्याचें नाकारलें, मजुरांच्या प्रतिनिधींनीं ॲसेंब्लींत आणलेलं बिल फेटाळलं आणि हिंसात्मक भाषणं केल्याबद्दल एकदोन भाई लोकांची रवानगी बंदिशाळेंत केली; एवढ्याचसाठीं हे सार्वत्रिक संपाचा इतक्या तातडीनं वणवा पेटविणार तर !"

दमननें गच्च मुठी आवळल्या. क्रोधानें त्याचा चेहरा लाल झाला होता. डोळे विलक्षण तेजानें चमकूं लागले. रुबीला त्याच्या क्रुद्ध मुद्रेकडे पहातांना अतिशय भीति वाटली.

"माझ्या एका शब्दावरही विश्वास न बसण्याएवढं मजुरांचं मन ह्या वृत्तपत्रांनीं आणि ह्या स्वार्थी भाई लोकांनीं कलुषित केलं असणार. भाई सदानंदासारखा क्रूर प्राणी ह्या संपाचा पुढारी. रक्तपात व्हावे, जागतिक भयंकर महायुद्धें होऊन लक्षावधी मुडदे पडावे, वैमानिक हल्ले होऊन जिकडे तिकडे हजारों शहरं उध्वस्त होऊन आगीचे डोंब पेटावे हीच त्याची इच्छा ! आपल्या वाणीच्या आणि वक्तृत्वाच्या जोरावर निरक्षर मजुरांना त्यानं भारलं आहे. मजूरराज्याच्या गोड थापांनीं तो सहज त्यांना चिथावित असतो. प्रत्येक गिरणींत ह्या वेळीं किती तरी कापड पडून आहे. कापडाला सर्व देशांत एवढी मंदी आहे कीं गिरणीमालकांनीं गिरण्या बंद राहाव्या म्हणून हा संप घडवून आणला आहे असंच कुणालाही वाटेल. या संपामुळं कामगारकुटुंबांना किती भयंकर आपत्ति सोसाव्या लागणार ! आणि शेवटीं संप अयशस्वी होऊन भांडवलशाहीला मजूरवर्ग पुन्हां शरण येणार. पण भाई सदानंद संपाच्या यशापयशाची बिलकुल पर्वा करणार नाहीं. रक्तमय जागतिक क्रान्तिसाठीं प्रत्येक राष्ट्रांतील कामगारवर्गाला चिथविलं पाहिजे, त्यांना जीवित असह्य केलं पाहिजे हीच त्याची राक्षसी महत्वाकांक्षा ! पोलीसांच्या गोळीबारानं मजुरांचे मुडदे पडले; अनेक कुटुंबं निराधार झालीं, लहान लहान मुलं तडफडून मेलीं म्हणजे त्यांना खरा आनंद वाटेल. रुबी, साम्यवादाबद्दल अशा

प्रकारचीं मनोराज्यं कल्पून अनेक स्त्री-पुरुषांचे बळी घेणं मला असह्य वाटतं. थोड्याशा हजारांच्या जमलेल्या फंडावर कुबेरासारख्या श्रीमंत भांडवलशाहीशीं हे भाई जागतिक महायुद्ध करणार! ह्या संपाच्या पत्रकांवर सही करणाऱ्यांत एकही शांतताप्रिय आणि विचारी भाईपुढारी नाहीं. अडाणी मजुरांना ते पतंगाप्रमाणं दिव्यावर झडप घालण्यास सांगतील. पूर्वजांच्या लोकोत्तर कार्याचे खोटे पोवाडे गातील. संपाला धर्मयुद्ध म्हणून पुकारतील आणि विकारवश मजूर डोळे झांकून ह्या फोपाट्यांत उडी घेऊन तडफडून मरतील. रुबी, माझ्या हृदयाची तळमळ या वेळीं मला स्वस्थ बसूं देणार नाहीं. ”

रुबीची मुद्रा व्याकूळ झाली होती. खुर्चीच्या हातावर बसून व दमनच्या केसावर आपला गाल आधारून ती आवंढा गिळून म्हणाली, “ दमन, तुझ्या कार्याच्या आणि ध्येयाच्या आड येणार नाहीं अशी आईला स्मरून मी शपथ घेतली आहे. मी या वेळीं काय बोलूं ? ”

तिनें एकदम हुंदका दिला. दमनसमोर पहात तिचा बाहू गोंजरून म्हणाला, “ रुबी, उगी रहा, आई येईल. कुणाकडे यांतील एक शब्दही बोलूं नकोस. ”

तिनें कसेंबसें रडें आवरलें व डोळे पुसून ती जवळच्या आरामखुर्चीवर पडली. दमन विचार करीत स्तब्ध राहिला होता.

रात्रीं जेवण झाल्यानंतर रावसाहेब, दमन व शशिधर दिवाणखान्यांत संभाषण करीत बसले होते. पण दमनचें लक्ष त्या भाषणाकडे बिलकुल नव्हतें. रावसाहेबांनीं एखादा प्रश्न केला तर तो पुन्हा विचारून त्याचें त्रोटक उत्तर देत होता, व तो पुन्हा विचारमग्न होत होता. यापुढें संभाषणाला रंग चढत नव्हता. शेवटीं रावसाहेब म्हणाले, “ चला, दहा वाजून गेले. सकाळीं फिरायाला जातां ना तुम्ही ? ”

दमन आणि शशिधर आपल्या खोलींत गेले. रावसाहेब मात्र खटल्याचे कागद पहात बसले होते.

दमन खोलींत गेला. रुबी गाढ झोंपली होती. टेबलावरील दिवा मंदपणें प्रकाशत होता. त्या अस्पष्ट प्रकाशांत त्यानें तिच्याकडे पाहिलें.

कसल्या तरी मधुर स्वप्नामुळें तिच्या चेहऱ्यावर हास्याची छाया पसरल्या-सारखी दिसत होती. गाढ निद्रेमुळें तिचे ओंठ किंचित् विलग झाले होते. तिनें कमरेपर्यंतच शाल पांघरली होती. दीर्घ श्वासोच्छ्वासाबरोबर तिचें वक्षःस्थल मंदगतीनें वर खालीं होत होतें. तिनें एक हात उशीवर आपल्या मानेखालीं घेतला होता.

दमनला तिला स्पर्श करण्याचा मोह अनावर झाला. तिच्या मुखकमलाजवळ त्यानें आपलं तोंड नेतांच त्याच्या भालप्रदेशाला तिच्या उष्ण श्वासाचा स्पर्श जाणवला. तो कसल्या तरी दृढ निश्चयानें एकदम मागें सरकला. त्या अंधुक प्रकाशांत त्यानें चार कपडे एकत्र करून आपल्या बॅगेंत भरले. घाईघाईनें पोषाख केला. पुन्हां एकवार रुबीच्या कॉटजवळ जाऊन तो कांहीं वेळ तिच्याकडे तन्मयतेनें पहात उभा राहिला. इतक्यांत रावसाहेबांच्या खोलींतील स्विच्‌चा आवाज झाला.

त्यानें मागें फिरून हळुच बॅग उचलली व रुबीकडे निरखून पहात असतांच टेबलावरील दिवा मालविला व पाय न वाजवितां चांचपत तो खोलीबाहेर पडला.

बाहेर गाढ अंधार पसरला होता, तरी रस्त्यावरील दिव्याचा प्रकाश खिडकींतून आंत येत होता. यामुळें त्यानें बंगल्याचा मुख्य दरवाजा गांठला. सभोंवार कानोसा घेऊन हळूच दार उघडलें. बाहेर येतांच पुन्हा तें मिटून झपझप चालूं लागला.

बाहेर झिमझिम पाऊस पडत होता. हवेंतही बराच गारठा आला होता. आकाशांत ढगांची गर्दी झाल्यामुळें जिकडे तिकडे गडद अंधार पसरला होता. रानकिडे सारखे किरकिरत होते. त्या शांत वेळीं दूर अन्तरा-वर मालगाडीनें घातलेली शीळ स्पष्ट ऐकूं येत होती. दमनच्या पावला-खालीं चिखल चरचरत होता. त्यानें थोड्याच वेळांत मोटारचा तळ गांठला.

सायंकाळची धांदल व गडबड त्या वेळीं तेथें बिलकुल दिसत नव्हती. वाऱ्याचा व पावसाचा त्रास होऊं नये म्हणून गाडीच्या कांचा वर चढवून सर्व ड्रायव्हर आंतच झोंपीं गेले होते. तळावरील लहान लहान चहाच्या दुकानांपैकीं एखादेंच दुकान त्या वेळीं उघडें दिसत होतें. त्यांतील एका

दुकानांत दमन गेला. एवढें पांढरपेशें गिऱ्हाईक असें अवेळीं आल्यामुळें त्या दुकानदारानें एकदम पुढें होऊन प्रश्न केला.

" काय पाहिजे ? "

दमन क्षणभर गोंधळून म्हणाला, " आदम ड्रायव्हर कुठं आहे ? त्याची नवीनच शेव्होलेंट आहे. तो गाडी कुठं ठेवतो ? "

" तो त्या तिथं असणार, गाडींतच झोंपला असेल. " त्यानें समोरच्या गाडीकडे बोट दाखवित विचारलें, " कुठं जाणार तुम्ही ? "

दमननें लांबून ती गाडी ओळखली व तो लगेच तेथें गेला. इंजिनच्या आवाजाप्रमाणें घोरत आदम आंत गाढ झोंपला होता.

" आदम, आदम " दमननें हांक मारतांच तो झटकन् जागा झाला. नेहमींच्या सरावाप्रमाणें चटकन् त्यानें गाडीचें पाठचें दार उघडलें व चक्रावर हात ठेवित तो म्हणाला, " चलो, बैठो साब."

" आदम, मला आतां पुण्याला जायचं आहे. " दमन उत्सुकतेनें म्हणाला, " आतांच निघालं पाहिजे. "

आदमनें आश्चर्यानें वळून मागें पाहिलें. दमनचा शब्द ऐकून तो त्याच्याकडे न्याहाळून पहात म्हणाला, " काय साहेब, असा एकाएकीं पुण्याचा बेत झाला वाटतं ? "

दमन त्या अनपेक्षित प्रश्नामुळें घुटमळून म्हणाला, " माझा एक मित्र मुंबईत बराच आजारी आहे. तेव्हां पुण्याला मला सकाळची गाडी गांठलीच पाहिजे. चल, पेट्रोल वगैरे काय घ्यायचं असेल तें तर लवकर घे."

दमनशीं आदमचा परिचय चांगलाच झाला होता. प्रथम रावसाहेबांच्या गाडीवर तो पुष्कळ वर्षें होता. ही गाडी घेण्यासही त्यांनींच त्याला मदत केली होती. यामुळें कधींही गाडीची गरज लागली कीं आदमलाच ते बोलवित असत. रावसाहेबांच्या घरीं ही पाहुणेमंडळी आल्यापासून तर त्याची एकसारखीच त्यांच्या घरीं वर्दी होती.

" साहेब, दहा रुपये द्या. पेट्रोल टाकींत भरपूर आहे. पण आणखी घेऊन ठेवतों. पाणीही घालतों. तुम्ही गाडींत बसा. " असें म्हणून

आदमनें दहाच्या दोन नोटा घेतल्या व तो जवळच्या हॉटेलांत शिरला. एक कप चहा लवकर बनविण्याचा हुकूम देऊन त्यानें सिगारेट पेटविली व बाजूला उभ्या असलेल्या पोऱ्याला गाडींत पाणी टाकण्यास सांगितलें.

दमन गाडींत बसून आपले पुढील बेत आंखित होता. मुंबईस पोहोंचल्यावर प्रथम भाई सदानंदाची भेट घ्यायची. गिरणी–मालक संघाच्या अध्यक्षालाही भेटण्याचा प्रयत्न करायचा. कदाचित् गिरणी–मालकांना हा संप हवा असला तर ते आपली भेट घेण्याचें कोणत्या ना कोणत्या तरी सबबीवर नाकारतील. अधिकारीदेखील आपल्या हेतूबद्दल अविश्वास दाखवतील अशा प्रकारच्या विचारांनीं तो खिन्न झाला. पण तात्काळ आपल्या प्रयत्नांत यश येईल अशीही त्याला आशा वाटली. परस्परविरोधी विचारांत त्याचें मन हेलखावे खात होतें. एवढ्यांत आदम तेथें आला.

"साहेब, चहा वगैरे कांहीं घेणार का ?"

"नको नको, चल झालं ना सगळं ? आदम, गाडी चुकून उपयोगी नाहीं हं."

"साहेब, आपण बिलकुल काळजी करूं नका. एक्सप्रेस निघायच्यापूर्वी एक तास तुम्हाला पुण्यात नेऊन सोडतों मग तर झालं ना ?" असें म्हणून तो आपल्या जागेवर बसला व त्यानें किल्ली फिरविली. पायाखालचा स्टार्टर दाबतांच गाडी धडधडूं लागली. दिव्याच्या प्रकाशाचा प्रखर झोत दूरवर पडला. हाताजवळचा ब्रेक काढून आदमनें पायाखालील क्लच सैल सोडतांच गाडी चालू झाली. एक वर्तुळ मारून गाडी रस्त्याला लागली.

थोड्याच वेळांत आदमनें गाडी जोरानें हांकण्यास सुरवात केली. शहराबाहेर पडतांच तो व्यवस्थित बसत म्हणाला, "पावसामुळें गाडी चापायला मिळायची नाहीं असं वाटत होतं. पण इकडे पाऊस दिसत नाहीं."

त्यानें लगेच गाडीला अतिशय वेग दिला. दूरवर सरळ रुंद रस्ता दिसत होता. वाटेंत बैलगाडीची अगर माणसाची चाहूल नसल्यामुळें गाडी अतिशय जोरानें चालली होती. पाठच्या बाजूस एका कोनांत डोकं

टेकून दमन विचार करीत स्वस्थ बसला होता. इतक्यांत आदम एकदम म्हणाला, " साहेब, पण तुमच्याबरोबर डॉक्टरसाहेब वगैरे कुणीच नाहीं आलें ? ते पण तुमच्या संगति आले असते. "

" पण मीच त्यांना नको म्हटलं. पण आदम, पुण्याहून तूं परत कधीं येणार ? " दमननें मध्येंच प्रश्न केला.

" लगेच साहेब, तिथं राहून काय करायचं आहे ? "

" मग असं कर. डॉक्टरसाहेबांच्या घरीं जा आणि म्हणावं कीं मी मुंबईला गेलों आहे. काळजी करूं नका. "

" साहेब, " आदम गाडीची गती कमी करीत म्हणाला, " म्हणजे घरच्या मंडळीला कळवलं नाहीं का तुम्ही ? "

" छे, छे, अरे मी बोललों होतों उद्यां सकाळीं निघेन म्हणून. मग मनांत आलं आतांच निघावं म्हणून. "

" साहेब, नाहीं तर रावसाहेब तूं त्यांना नेलंस कसं म्हणून माझ्यावर लाथ मारतील. "

" तूं बिलकुल घाबरूं नकोस. त्यांनीं मला असं सांगितलं एवढंच सांग. "

आदमनें पुन्हां गाडीची गती वाढविली. त्या निर्जन प्रदेशांतून ती एकसारखी धांवत होती. सभोंवारच्या गर्द झाडींत रातकिडे किरकिरत होते. रस्त्याच्या दुतर्फा लावलेल्या उंच वटवृक्षांमुळें तो देखावा भयाण वाटत होता. मधूनमधून तलफ आली कीं आदम इन्जिनमध्यें पाणी घालण्याच्या निमित्तानें गाडी उभी करीत होता.

" आदम, तुला झोंपायचं असलं तर मी गाडी हांकतों. " दमननें म्हटलें.

" छे, छे, साहेब, चार चार रात्रीं आम्ही झोंपेवांचून गाडी हांकतों. तुम्ही खुशाल झोंपा. बिलकुल काळजी करूं नका. मी तुम्हाला वेळेवर घेऊन जातों. " असें म्हणून त्यानें पुन्हां गाडी चालू केली.

दमननें डोळे मिटून डोकें मागें टेकलें. थकल्यामुळें अल्पावधींतच त्याला झोंप लागली.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं रावसाहेबांच्या घरीं सर्व मंडळी चहापाना-करतां बसली असतां जवळच पडलेल्या ताज्या वृत्तपत्रांतील मजकुराकडे रुबीचें लक्ष गेलें. 'संपाचें उग्र स्वरूप. संपवाल्यांनीं पोलीसांवर दगडफेक केली. पुढाऱ्यांची अटक' इत्यादि अग्रभाग वाचून ती एकदम दचकली.

"शशिधर, तुम्ही नाहीं का आज दमनबरोबर फिरायला गेलां?" तिनें उत्सुकतेनें प्रश्न केला.

"नाहीं. मला वाटतं तो फार लवकर एकटाच फिरायला गेला." शशिधरनें प्रत्युत्तर केलें.

पण रुबी चहाचा पेला खालीं ठेवून चटकन् खुर्चीवरून उठली व कावरीबावरी मुद्रा करून लगबगीनें आपल्या खोलीकडे धांवली. अनामिका आश्चर्यानें तिच्याकडे पहात होती. अगदीं थोड्याच वेळांत ती परत आंत आली. तिचें पाय सारखे लटलटत होते. डोळ्यांतून अश्रू वहात होते व कंठ दाटून आल्यामुळें बोलण्याचा प्रयत्न करतांना तिचा अधर सारखा थरथरत होता.

अनामिकेनें चटकन् उठून तिला सांवरीत घाबरून विचारलें, "रुबी, रुबी काय झालं? सांग ना काय तें! दादा कुठं आहे?"

तिचा तो व्याकुळ शब्द ऐकून पलीकडच्या दालनांतून शकुन्तला-बाई व मनोरमाबाई धांवल्या.

रुबी हुंदका देऊन रडूं लागली. शकुन्तलाबाईंनीं रडत एकदम विचारलें, "बाळ दमा कुठं आहे?"

रुबी रडें आवरण्याचा प्रयत्न करीत कसेंबसें म्हणाली, "बहुतेक संपासाठीं ते मुंबईलाच गेले."

"दमा, दमा, काय केलंस हें! असा पळालास कां?" शकुन्तला-बाई ओक्साबोक्शीं रडूं लागल्या.

"काकी, घाबरूं नका." शशिधर धीर देण्याच्या उद्देशानें म्हणाला, "कदाचित् दमन गेला नसेल. मुंबईला जायला गाडी कुठची आहे?"

" नाहीं. ते मुंबईलाच गेले. कपडे आणि बॅग पण नाहीं तिथं. काल संपाची बातमी वाचल्यापासून ते एकसारखे विचारांत होते. शशि-धर, मी संप पाहिले आहेत." रुबी स्फुंदत स्फुंदत पुढें म्हणाली, " दमन धाडसी आहेत. आम्हाला आतां मुंबईला जायला निघालं पाहिजे. देवा, काय केलंस हें !"

ती अनामिकेला दृढ मिठी मारून रडूं लागली. एवढ्यांत राव-साहेबही तेथें आले.

" शशी, गाडी घेऊन स्टँडवर जा आणि चौकशी कर अगोदर."

शशिधरनें लगेच आपली मोटार बाहेर काढली. त्याच्या तात्काळ लक्षांत आलें कीं आदमच्याच गाडीनें तो मुंबईस गेला असावा. त्याच्या मनांत भयंकर विचाराचें काहूर माजलें होतें. अगदीं असह्य आणि भीति-प्रद विचारांनीं अट्टहासानें त्याच्या मनावर पकड घातली. मोटारच्या तळावर पोहोंचतांच त्यानें आदमची चौकशी केली. पण कुणालाच त्याचा तपास लागेना. एवढ्यांत चहाच्या दुकानदारानें रात्रीं कुणा एका साहेबी पॅसेंजरला घेऊन तो पुण्याला गेल्याचें सांगितलें.

शशिधर पुन्हां घरीं आला. थोड्याच वेळांत मुंबईस जाण्याचा सर्वांनीं बेत केला. शशिधरनें अनामिकेला एकटीच गांठून म्हटलें, " अना, तूं अशी रडूं नकोन. असेल त्या परिस्थितीला तोंड दिलंच पाहिजे. तूं अशी रडूं लागलीस कीं मामी घाबरून जाणार. रुबीही कासावीस होणार धीरानं आल्या प्रसंगाला उभी रहा. दमन समंजस आहे. संप म्हणजे कांहीं लढाई नव्हे. वेड्यासारखी अशी रडतेस काय ?"

अनामिकेनें मोठ्या प्रयासानें रडें आवरलें व आवश्यक सामानाची तिनें बांधाबांध सुरू केली. रुबीचेंही सांत्वन करण्याचा तिनें प्रयत्न केला. पण मनोरमाबाई शकुन्तलाबाईंना धीराच्या गोष्टी सांगूं लागतांच रडून म्हणाल्या, " अहो, दमाचा स्वभाव अगदीं हळवा आहे. आवेगाच्या भरांत त्याचं लक्ष पुढपर्यंत जात नाहीं. त्याच्या ध्येयापुढं त्याला कांहीं दिसत नाहीं. पिसाळलेल्या कुत्र्यांनीं फोडावा तसा त्याला

एकटा फोडतील. आडदांड चिथावलेले मजूर माझ्या बाळाच्या जीवाला अपाय करतील. दमाला आपल्या जीवाचीही पर्वा वाटत नाहीं."

त्या हुंदके देऊन रडूं लागल्या.

एक दोन तासांतच सर्व मंडळी निघण्यास तयार झाली. अगदीं आग्रह करून मनोरमाबाईनीं पुन्हां त्यांना चहा दिला.

"शशी," मंडळी गाडींत बसतांना रावसाहेब म्हणाले, "पुण्याला मी माधवरावांना तार पाठवितों. तिथं जेऊन मग पुढं जा. मुंबईला तुम्ही संध्याकाळीं पोहोंचाल असं वाटतं. मी मंबईलाही तारा पाठवितों."

शशिधर उद्विग्न मनानें गाडींत बसला. शकुन्तलाबाईनीं रडत सर्वांचा निरोप घेतला. रुबी डोळे मिटून स्वस्थ पडली होती. तिच्या डोळ्यांतून अश्रू थिबकत होते.

थोड्याच वेळांत गाडी बेळगांवच्या हद्दीबाहेर आली. कोणाच्याही तोंडांतून शब्द निघत नव्हता. बऱ्याच वेळानें मधूनच एखादें गांव दिसलें कीं शशिधर चहा वगैरे कांहीं पाहिजे कीं काय याची चौकशी करीत होता पण तिघीही नकार देत असल्यामुळें गाडी एकसारखी पुढें चालली होती.

दुपारीं पुण्यांत गाडी पोहोंचली तेव्हां शशिधर स्थानिक वर्तमान-पत्राचा अंक घेऊन मुंबईतील संपाची बातमी पाहूं लागला. रात्रौ मजुरां-वर झालेल्या गोळीबारामुळें व लाठीहल्ल्यामुळें एक एक गिरणी बंद पडत आहे. सशस्त्र पोलीस गिरणीविभागांतून फिरत आहेत. सत्यंजय मिलच्या मॅनेजरवर प्राणान्तिक हल्ला झाला. अशा प्रकारचीं वर्णनें वाचून तो अतिशय घाबरून गेला. रुबी आपल्याकडे भेदक दृष्टीनें पहाते आहे हें लक्षांत येतांच त्यानें आपल्या चेहऱ्यावरील विकार लपविण्याचा प्रयत्न केला व आणखी एक दोन पानांवर दृष्टि फिरवून सहाजिकपणाचा आव आणीत तो म्हणाला, "कुठंच कांहीं बातमी पण नाहीं. Dirty news-paper."

रुबीनें हताशपणें सुस्कारा टाकला. शकुन्तलाबाई उदासपणें विचार करीत स्वस्थ होत्या. त्यांच्या चेहऱ्यावर अत्यंत दारुण दुःख दिसत होतें

व चर्येवरील कारुण्य अगदीं विलक्षण होतें. दयार्द्र दृष्टीनें त्या रुबीकडे सारख्या पहात होत्या. कोणता भयंकर प्रकार पहावा लागेल या कल्पनेनें त्यांच्या हृदयांत भयंकर कालवाकालव होत होती.

माधवरावांच्या घरीं पोहोंचतांच शशिधरनें सर्व प्रकार त्यांना सांगितला. यामुळें त्यांनींही कांहीं वेळ विसांवा घेण्याचा आग्रह केला नाहीं. सैंपाक तयारच होता. पण रुबी जेवणास तयार होईना; तेव्हां शकुन्तलाबाई मोठ्या प्रयासानें दुःख आवरून गहिंवरून म्हणाल्या, " रुबी, चल बाळ. दोन घांस खा. मीही येतें. चल. "

रुबीनें कसाबसा येणारा हुंदका दाबला व निमूटपणें डोळे पुशीत ती पाटावर बसली.

जेवण आटोपल्यावर लगेच सर्व मंडळी पुन्हां निघाली; पण पाऊस सुरू झाल्यामुळें रस्त्यावर बराच चिखल झाला होता. यामुळें मोटार वेगानें चालवितां येत नव्हती. हवा एकदम सर्द होऊन गारठाही वाटत होता. दाट झाडींतून जाणाऱ्या मुंबईकडील रस्त्यावर पावसामुळें रहदारी विशेष नव्हती व दुपारचा प्रहर होता तरी आकाशांत काळेकुट्ट ढग भरल्यामुळें संध्याकाळ झाल्यासारखें वाटत होतें. मुंबईत आपण उशिरां पोहोंचणार याची कल्पना शशिधरला आलीच होती. समोर घाटांत धुकेंही पसरलेलें दिसत होतें यामुळें गाडी थांबवावी लागणार हें निश्चित होतें.

दमन मात्र दुपारींच मुंबईस पोहोंचला होता. क्षणभरदेखील विसांवा न घेतां त्यानें गिरणी-मालक-संघाच्या अध्यक्षाची भेट घेण्याचा प्रयत्न केला. भेटीला नकार मिळतांच निदान एक दोन दिवस तरी गिरणी बंद ठेवल्यास आपण तडजोड घडवून आणण्याचें अभिवचन देतों अशीही आग्रहाची विनवणी त्यानें कळविली. पण त्यांतही त्याला यश आलें नाहीं. कामगार-संघाच्या ऑफिसांत भाई सदानंदानेंसुद्धां नाहीं नाहीं त्या अपशब्दांनीं ज्या वेळीं त्याचा अपमान केला तेव्हां तो खुर्चीवरून उठला व एकदम झांप घालून त्यानें त्याच्या मानगुटीला पकडलें. इतर लोकांनीं मोठ्या प्रयासानें त्या दोघांस एकमेकांपासून दूर केलें. दमन रागानें लाल झाला होता. दांतओंठ चावून त्यानें गच्च मुठी

आवळल्या होत्या. दोन्ही दंडाला धरून भाई सदानंदापासून त्याला मागें खेंचतांना त्याची रुंद छाती अधिकच विस्तृत झाली होती. क्रोधामुळें बोलण्याचा प्रयत्न करतांना त्याचे ओंठ मात्र हालत होते. भाई सदानंद त्याच्या क्रुद्ध मुद्रेकडे पाहून अतिशय घाबरून गेला होता.

"नीचा, कालच्या गोळीबाराला बळी पडलेल्या मजुरांच्या बायकांचे व मुलाबाळांचे शाप तुला भस्म कसे करीत नाहींत! या संपाचा किती घोर परिणाम होणार आहे याचा तूं विचार केलास का? भांडवलशाहीच्या सैतानाशीं युद्ध पुकारतांना आपल्या सामर्थ्याचा विचार केलास का? सामुग्री जमविलीस का? कंठशोष करून बिचाऱ्या भोळयाभाबड्या मजुरांना कां चिथावतां? संपांत सामील झालेले मजूर माझ्यावर थुंकले, माझ्यासमक्ष त्यांनीं अपशब्द वापरून माझा धिक्कार केला. गरीब बिचारे!"

एवढें बोलतांना दमनचा कंठ दाटून आला. एकदम क्रोधाचा आवेश खचून तो खिन्न झाला व त्याच्या डोळ्यांत अश्रू उभे राहिले. कांहीं वेळानें पुढें सुटलेले केस मागें लोटून तो आवंढा गिळून म्हणाला, "मी-सुद्धां भांडवलशाहीचा नाश करण्यासाठीं बिलकुल न डगमगतां आत्मदान करीन. गुलामांच्या दारुण छळाकडे पाहून माझ्या हृदयाला पीळ पडत असतो. पण निरर्थक भडकलेल्या होमांत पतंगाप्रमाणें उड्या घेऊन उलट त्या अग्नीला अधिक चेतविण्यांत काय अर्थ आहे? रोगानं त्रस्त झालेल्या पीडाग्रस्ताला वाटेल त्यानं उपचार सांगावा आणि क्षणभरदेखील विचार न करतां त्यानें विश्वासून आपलं सर्व सामर्थ्य खर्च करून तो निष्फल उपचार करावा त्याप्रमाणेंच तुम्ही मजुरांची दिशाभूल करतां आहांत. Oh proud sons of Capitalism, please stop this monstrous villainy!"

एवढें बोलून त्यानें हताशपणें सुस्कारा टाकला. जीविताविषयीं त्याला अत्यंत तिरस्कार वाटत होता. सारें जग अगदीं अन्यायी, क्रूर, जुलमी आणि घातकी आहे असेंच त्याला वाटलें. कामगारसंघाच्या ऑफिसांतून तो खालीं मान घालून बाहेर पडला.

संध्याकाळचा समय झाला होता. पावसामुळें रस्त्यावरील रहदारी एकदम कमी झाली होती. आकाशांत काळेकुट्ट ढग पसरल्यामुळें कांहीं

घरांतून व दुकानांतून दिवेही लागले होते. सोसाट्याच्या वाऱ्यामुळें रस्त्याच्या दोन्ही अंगास असलेल्या उंच इमारतींच्या भिंती भिजून गेल्या होत्या. भिजलेले गरीब लोक दुकानच्या झडपाखालीं राहून पावसाचा जोर कमी होण्याची वाट चिन्तातुर मुद्रेनें पहात होते. रस्त्यालगतच्या एखाद्या झाडाखालीं गाडी उभी करून गाडीवाले अंग आखडून बसले होते. संध्याकाळीं निघालेल्या वर्तमानपत्राच्या भिजलेल्या जाहिराती घेऊन संपाची बातमी ओरडत कांहीं पोरें रस्त्यावरून फिरत होतीं. गिरणी-विभागांतून उघड्या मोठ्या लॉरीमधून पावसानें चिंब झालेले मजूर उत्साहानें संपाचा जयजयकार करीत जात होते. त्याच वेळीं संध्याकाळचा पहारा बदलण्यासाठीं लाठीवाल्या पोलीसांच्या तुकड्याही येत जात होत्या.

दमन खिन्न मनानें साऱ्या दृश्याकडे पहात होता. कांहीं वेळानें पावसाचा जोर कमी होतांच त्यानें जवळच्या पोलीस–चौकीकडे आपला मोर्चा वळविला. चौकीच्या फाटकापाशीं त्याला बरीच गर्दी दिसली. दमन सरळ आंत गेला. त्याच वेळीं पोलीस कमिशनर आपल्या प्रमुख अधिकाऱ्यांसह संपाच्या परिस्थितीबद्दल विचारविनिमय करीत होता. दमनला बाहेर उभा असलेला पहातांच त्यांनीं त्याला आंत बोलाविलें.

" तुम्हीच का भाई दमन ? " पोलीस कमिशनर करारी स्वरांत पुढें म्हणाला, " मि. दमन, परिस्थिती जास्त जास्त बिघडत चालली आहे. जर त्यांत कांहीं बदल झाला नाहीं तर तुम्हां सर्व पुढाऱ्यांना प्रथम अटक केली जाईल. "

" पण साहेब, या वेळीं मी संपाच्या विरुद्ध होतों. माझी इच्छा कुणीच—"

दमनचें वाक्य पुरें होण्यापूर्वीच सर्व अधिकाऱ्यांनीं एकदम हास्य केलें. बंदिवासाच्या भीतीनें आपण हें बोललों असें समजून त्यांनीं उपासानें हंसावें याची त्याला अतिशय चीड येऊन तो दाराकडे वळला.

" मग सुधन मिलकडे रात्रौ आठ वाजतां या " असें चेष्टेनें म्हटलेले अधिकाऱ्याचे शब्द बाहेर पडतांना त्यानें ऐकले.

बस् गाडी गांठून तो घरीं आला. गड्यानें संध्याकाळीं आलेली तार त्याच्याकडे देत म्हटलें, " साहेब, दोन तीन मनुष्य तुमच्या चौकशीला पण आले होते. "

त्यानें घाईनें तारेचा लखोटा उघडून आश्चर्यानें म्हटलें, " काय, आई आणि सर्वजण येताहेत ! रामा, लवकर एक कप दूध आणि कांहीं तरी खायला घेऊन ये. मला भूक लागली आहे. मला आतां परत गेलें पाहिजे. "

त्याचा चेहरा अतिशय म्लान झाला होता. प्रवासांत मळलेले कपडे अजूनही त्याच्या अंगावर होते. भुकेमुळें आणि जागरणामुळें त्याची मुद्रा व्याकुळ दिसत होती. डोळे खोल गेले होते. केंस अव्यवस्थितपणें भालप्रदेशावर रुळत होते. घसा कोरडा पडला होता व ओंठ अगदीं सुकून गेले होते.

रामा केविलवाण्या दृष्टीनें त्याच्याकडे पहात खालीं निघून गेला, तेव्हां दमन समोर असलेल्या आरशाच्या कपाटाकडे गेला व आपल्या प्रतिबिंबाकडे पाहून आपल्याशींच म्हणाला, " काय माझी दशा ही ! "

आरशांतून पाठीमागें भिंतीला लावलेली तसबीर दिसतांच मागें फिरून त्यानें ती तसबीर काढून हातांत घेतली. आई, अनामिका व रुबी यांच्या त्या सस्मित मुद्रा पाहून त्याला गहिंवरून आलें.

इतक्यांत रामा येत असल्याची चाहूल लागली. दमननें झटकन् ती तसबीर पुन्हा भिंतीला टांगून अश्रू पुसले. तो गंभीरपणें म्हणाला, " रामा, आई आणि सर्व मंडळी आतां येणार आहेत. मी दहा अकरा वाजतां परत येईन म्हणावं. "

त्यानें एक दोन बिस्किटें खाऊन दुधाचा पेला तोंडाला लावला.

"साहेब, जेवायला येणार नाहीं का तुम्ही ? आईसाहेब येतील लवकरच." रामा दीनवाण्या स्वरांत म्हणाला.

"नाहीं, नाहीं; मला गेलंच पाहिजे." त्यानें आपले विकार दडविण्याकरतां त्याच्याकडे न पहातांच उत्तर दिलें व लगबगीनें कोट चढविला.

"बरं मी येतों हं" असं म्हणून तो एक दोन जिन्याच्या पायऱ्या उतरला व पुन्हां मागें येऊन सद्गदित कंठानें म्हणाला, "रामा, मला

उशीर झालाच तर डॉक्टर शशिधरना हळूंच सांग कीं मी सुधन मिलमध्यें गेलों आहे."

दमन मोठ्या निर्धारानें धडधड जिना उतरला. या वेळीं आठाचा सुमार झाला होता. सबंध आकाशांत काळ्याकुट्ट ढगामुळें एकही चांदणी चमकतांना दिसत नव्हती. पावसानें दिवसभर कहर केल्यामुळें बहुतेक दुकानदार लवकर दुकानें बंद करून गेले होते. यामुळें रस्यावर एकदम शुकशुकाट वाटत होता. जलमय झालेल्या रस्त्यावर विजेचा प्रकाश चमकत होता. मधूनच एखादी मोटार भरधांव चालली होती. थोडा वेळ पावसाचा जोर कमी झाला तरी तो ठिबकतच राहिला होता. मधून मधून दक्षिण आकाशांत वीज चमकून गडगडाटही ऐकूं येत होता.

दमन समोरून येणारी टॅक्सी थांबवून आंत जाऊन म्हणाला, "सुधन मिल चलो. जरा जलदी करो."

"जी साब" डॉयव्हर मोटार चालूं करीत म्हणाला.

दमनच्या मनांत अनेक विचारांचें काहूर माजलें होतें. या वेळीं त्याच्या चेहऱ्यावर वीरश्री दिसत असून नजरेंतही करारीपणा होता. येणारी बिकट परिस्थिती दृष्टीसमोर उभी राहिल्यामुळें आव्हानाच्या धिटाईनें समोर पहात व विचाराच्या ओघांत एखादा शब्द पुटपुटून दांतओंठ चावीत तो दीर्घ श्वास सोडीत होता.

मोटार जोरान पाणी दूरवर फेंकीत सारखी पुढें धांवत होती.

सुधन गिरणीचें उंच धुराडें काळ्याकुट्ट आकाशांत विलीन झाल्याप्रमाणें भासत होतें. गिरणीच्या इमारतींत रात्रपाळीचें काम सुरू व्हावयाचें होतें; यामुळें दिव्यांचा लखलखाट दिसत होता. गिरणीच्या आवारांत असलेले मोठाले वृक्ष वाऱ्यामुळें सळसळत होते. फाटकांतून टॅक्सी आंत शिरतांच गिरणीच्या दरवाजावर दमनला बराच मोठा जनसमूह दिसला. बाजूला आठदहा मोटार गाड्या व पोलीस लॉरीही उभ्या होत्या.

"इधर खडी करो" असें म्हणून त्यानें गाडीचें दार उघडून खालीं उडी मारली आणि पुढें धांवला.

समोर दिसणारा कामगारांचा प्रचंड जमाव आणि बंदुका सज्ज करून बाजूला असलेली सशस्त्र पोलीसांची तुकडी पाहून त्याच्या अंगावर कांटा उभा राहिला व घोर परिणामाच्या विचारामुळें त्याची छाती धडधडूं लागली. त्या गर्दींतून जोरानें मार्ग काढीत तो पुढें गेला व मागें फिरून त्यानें त्या मजुरांकडे डोळे रोखून पाहिलें. आवेशानें त्याचें सर्व शरीर थरथरत होतें. चेहरा लाल झाला होता. चिथावलेल्या मजुरांकडे पहातांच त्यांच्याठिकाणीं हिंस्र पशूचा क्रूरपणा स्पष्ट दिसत होता. दबा धरून बस-लेल्या सावजाप्रमाणें हातांतील फत्तर पाठीशीं दडवून ते लहानशा संधीची वाटच पहात होते. पोलीसांच्या भरलेल्या बंदुका आपल्याकडे तोंड करून आहेत याची त्यांना यत्किंचित्‌देखील दिक्कत वाटत नव्हती.

इतक्यांत गिरणीच्या पहिल्या मजल्यावरील खिडकीचें तावदान खळकन् फुटल्याचा आवाज झाला. त्या कामगारांनीं मोठ्या आनंदानें गर्जना केल्या. पोलीस अधिकारी पिस्तूल हातांत घेऊन सज्ज उभे राहिले. गिरणीचा मॅनेजर पोलीसांच्या मागें उभा होता. क्षणभर दोन्ही बाजू अगदीं तटस्थ राहिल्या. सर्वत्र भीषण शांतता होती.

दमन एखाद्या धाडसी वीराप्रमाणें कामगारांकडे तीक्ष्ण दृष्टीनें पहात पुढें सरसावला आणि समोर उभ्या असलेल्या भाई सदानंदास व इतर पुढाऱ्यांस उद्देशून म्हणाला, "किती घोर अनर्थ करतां अहा! हा चवताळलेला कामगारवर्ग या वेळीं विचारशून्य, अत्याचारी आहे. भाई सदानंद, तुम्हाला त्यांच्या हातांत फत्तर दिसत नाहींत का ! किती भयंकर रक्तपात होईल याचा तुम्ही विचार करा."

भाई सदानंद एकदम कामगाराकडे वळून क्रोधानें ओरडून म्हणाला, "कामगार भाई हो, भांडवलशाहीच्या सैतानाला सामील झालेला हा घरभेदी आमच्या हिताचा प्रश्न सोडवायला आला आहे. भाई हो, शांत रहा. हिंसा करूं नका, पण हा भांडवलशाही राक्षसाचा पाठीराखा आम्हांला पोलीसांच्या गोळीबाराचं भय दाखवितो आहे. तुरुंगांतील भयंकर छळाचं भय मला घालतो आहे. पण आमच्यां पोटांत पेटलेला वणवा गोळीबारानं आणि आमच्या रक्ताच्या चिळकांड्यांनीं विझायचा नाहीं. उलट तें उज्वल

रक्त पेट्रोलप्रमाणें भडका घेऊन भांडवलशाही बेचिराख केल्याशिवाय राहणार नाहीं. बंधूनो, उघडा आपली निधडी छाती आणि घ्या या अधिकारमदांध पोलीसांच्या गोळ्या. भाई दमन आमच्या कट्टया दुष्मनला सामील झाला आहे. भांडवलशाहीच्या कळपांतील श्रीमान परधर्मीय विधवेशीं लग्न करून त्यानं तुमच्या उज्वल कार्याला कालिमा फांसला आहे. माझ्या मजुर भाईनों, या गोळीबारांत एकदांच वीरमरण येऊं द्या. पण यापुढें भांडवलशाहीच्या सैतानाची ही मरणान्तिक गुलामगिरी क्षणमात्र नको. भाई हो, बोला क्रान्तीचा विजय असो."

मजुरांनीं भयंकर रणगर्जना केल्या. दमन गिरणीच्या मॅनेजरकडे वळला व तो मोठ्या आर्जवानें म्हणाला, "साहेब, कृपा करून तुम्ही आजचा दिवस गिरण बंद करा."

"नाहीं. मि. दमन, कांहीं झालं तरी मिल बंद न करण्याचा आम्ही निश्चय केला आहे." असें म्हणून मॅनेजरनें पोलीस अधिकाऱ्यांकडे पाहिलें. त्यानेंही त्या उत्तराला मान हलवून संमति दर्शविली.

दमन हताशपणें पुन्हा मजुरांकडे वळला व कळवळून तो मोठ्यानें म्हणाला, "बंधूनो, वीरश्रीच्या भाषणानं असे विकारवश होऊं नका. तुमचे बळी देऊन भांडवलशाहीचा नाश होणार नाहीं. गिरणीमालकांना या वेळीं संप हवा आहे. तुमचे प्राण देऊन मुलाबाळांना अशीं निराधार कां करतां? तुमच्या कुटुंबाच्या यमयातना भाई सदानंदसारख्या राक्षसी माणसाला कळायच्या नाहींत. तुम्हाला मी नाउमेद करीत नाहीं. पण या संपाचा परिणाम घोर होणार. भाई—

"नीचा!" भाई सदानंद एकदम भयंकर गर्जना करीत ओरडला, "विश्वासघातक्या, कपटी राक्षसा, माझ्या कामगार बंधूंचा गळा कापून आणखी आम्हाला शिव्या देतोस?"

भाई सदानंद सदऱ्याचे हात वर करून त्याच्या अंगावर चालून आला. दमनही गच्च मूठ आवळून त्याच्या कानशिलावर जोरानें ठोसा देण्यास सज्ज झाला होता. एवढ्यांत भाई गौरीमंगलनें सदानंदाला अड-

विला. दमन चवताळलेल्या सिंहाप्रमाणें त्याच्याकडे क्रुद्ध दृष्टीनें पहात होता.

इतक्यांत एक पोलीस अधिकारी भाई सदानंदाच्या जवळ जाऊन हातांतील वारंट पुढें करीत म्हणाला, " Mr. Sadanand, you are under arrest. (मि. सदानंद, तुम्हाला कैद करण्यांत येत आहे.) "

" भाईनों, " भाई सदानंद ओरडून म्हणाला, " माझी बंदिशाळेंत रवानगी होत आहे. संप यशस्वी करा. मी फांशीं गेलों तरी हरकत नाहीं. पण भांडवलशाहीचीं पाळंमुळं खणून काढा. हा माझा शेवटचा रामराम घ्या. बोला क्रान्तीचा विजय असो. "

" बोला, भाई सदानंद की जय, बोला सदानंद भाई की जय. " अशा आरोळ्यांनीं गिरणीचें आवार दुमदुमून गेलें.

दमनकडे अत्यंत तिरस्कारानें पहात भाई सदानंद तुच्छतेनें म्हणाला, " दमन, तुझा मात्र कायमचा नाश झाला हें पक्कं समज. "

' जा तूं. गोळीबारापूर्वी तुम्हा पुढाऱ्यांना पोलीस दूर करतात ही किती दुर्दैवाची गोष्ट आहे ! ' असेंच प्रत्युत्तर द्यावें असें दमनला वाटलें. पण तो त्याच्याकडे दुर्लक्ष करून स्तब्ध राहिला.

इतक्यांत पोलीस अधिकाऱ्यांनीं भाई सदानंदबरोबर असलेल्या इतर पुढाऱ्यांनाही अटक केली.

" बंधूनो, बोला भांडवलशाहीचा धिक्कार असो. क्रान्तीचा विजय असो. " भाई सदानंद पोलीसांच्या लॉरींत चढतां चढतां ओरडला.

" भाई सदानंद की जय. डाकू दमनचा धिक्कार असो. " अशी भयंकर गर्जना करीत कामगारवर्ग पुढें पुढें सरसावत होता.

खळ्खळ्! खळळ खळ्खळ्! गिरणीच्या खिडक्यांचीं तावदानें फुटूं लागलीं. पोलीस बंदुका सरसावून हुकुमाची वाट पहात उभे राहिले. चवताळलेला कामगारसमूह भयंकर गर्जना करीत पुढें घुसत होता. दमन चार पावलें पुढें होऊन एखाद्या वीराप्रमाणें करारी दृष्टीनें त्यांच्याकडे पहात निश्चल उभा राहिला. आघाडीवर असलेल्या चार आडदांड सशक्त कामगारांनीं एकदम त्याच्यावर झडप घातली. " मारो, ठार करो " अशा

भीषण आरोळयांनीं जिकडे तिकडे गलबला झाला. मोठमोठ्या दगडांचा पोलीसांवर सारखा वर्षाव होऊं लागला. पोलीस अधिकाऱ्यानें एकदम 'Fire!' असें म्हणून गोळीबाराकरतां हुकूम दिला. धडधड! धडधड!! असे भयंकर आवाज होऊन बंदुकीची फैर उडाली. दगडांचा वर्षाव अजूनही चालू होता. जिकडे तिकडे धांवपळ आणि दारुण आरोळ्या ऐकूं येत होत्या. पुन्हां गोळीबार झाला. त्या अस्पष्ट प्रकाशांत धुराचे लोट निघत असल्याचें दिसत होतें. भीतीनें सैरावैरा धांवतांना कामगार एकमेकांवर आदळून पडत होते. लाठीवाले पोलीस पुढें घुसून समोर पळणाऱ्या प्रत्येक संपवाल्याला जोरानें तडाखे देऊन जमिनीवर पाडूं लागले. त्या गर्दींत जखमी लोक वेदनांमुळें हृदयविदारक आरोळ्या मारीत विव्हळत होते. गिरणीचा भोंगा एकसारखा वाजत राहिला होता.

आवाराच्या फाटकापाशीं लोकांची अतिशय गर्दी लोटली होती. इतक्यांत शशिधर सर्वांना घेऊन तेथें आला. पण त्या दाट गर्दीमुळें मोटारला पुढें जाण्यास मार्ग मिळेना. तोंच बंदुकीचे बार ऐकून शकुन्तलाबाईनीं किंकाळी मारली. रुबीनेंही टाहो फोडला. अनामिकेनें आईला गच्च मिठी मारली. शशिधर मोटारमधून एकदम खालीं उडी टाकून गर्दींत घुसला. त्या तिघीही खालीं उतरून पुढें धांवूं लागल्या.

"बाळ दमा! बाळ दमा!" शकुन्तलाबाई सारख्या आरोळ्या ठोकीत सैरावैरा धांवत होत्या.

अनामिकेचे पाय लटलट कांपूं लागल्यामुळें ती एकदम खालीं बसली. रुबी आक्रोश करीत सारखी धांवत होती.

पोलीस अधिकाऱ्यांनीं मोटारचे सर्व दिवे पेटवून त्या मैदानावर शक्य तों प्रकाश केला होता. जवळच्या चाळींतून मजुरांच्याही बायका आकान्त करीत मैदानाकडे धांव घेत होत्या.

इतक्यांत 'मामी, मामी, रुबी,' असा शशिधरचा व्याकुळ शब्द त्यांच्या कानांत पडला. घाबरलेल्या नजरेनें त्यांनीं धांपा टाकीत सभोंवार पाहिलें. "मामी!" अशी त्यानें रडत मारलेली हांक पुन्हां ऐकूं येतांच त्यांनीं एकदम मागें पाहिलें. दमनच्या रक्तबंबाळ देहाला गच्च धरून तो

हृदयविदारक स्वरांत हांका मारीत होता. तें भेसूर दृश्य पहातांच शकुन्तलाबाईनीं एकदम भयंकर किंचाळी फोडली. रुबीही ओरडत धांवतांना मूर्च्छित होऊन धाडकन् जमिनीवर आदळली.

शकुन्तलाबाईनीं धांवत जाऊन दमनला घट्ट हृदयाशीं धरला. हृदय फुटत असल्याप्रमाणें त्यांना वेदना होऊन तोंडांतून शब्दही बाहेर पडत नव्हता. त्याच्या अंगावरून हात फिरवून त्यांनीं पुन्हां त्याला अधिकच जोरानें हृदयाशीं कवटाळला.

"बाळा दमा, काय केलंस हें?" असा आक्रोश करीत त्यांनीं त्याच्या केंसावरून हात फिरवून मुखाकडे पाहिलें. त्याच्या भालप्रदेशावर झालेल्या जखमेंतून रक्ताचा स्राव चालला होता. त्याच्या चेहऱ्यावर दिसणारी प्रेतकळा पाहून त्या पुन्हां हृदयद्रावक आरोळी मारून मूर्च्छित झाल्या.

शशिधर भयभीत मुद्रेनें रडें आवरण्याचा प्रयत्न करीत मदतीच्या अपेक्षेनें सभोंवार पहात होता. इतक्यांत रुबी सावध झाली. साऱ्या प्रकाराची आठवण होऊन धांवत येऊन दमनचें मस्तक हृदयाशीं दाबून ती मोठ्यानें रडूं लागली.

"दमा, दमा, काय केलंस हें! मी काय करूं?"

अनामिकाही उठून धांवत आली. दमनचा थंडगार हात दृढपणें गालावर दाबीत तिनें आक्रोश करीत म्हटलें, "दादा, दादा, कसा रे तूं विश्वासघात केलास! शशी, माझा दादा मला सोडून गेला का हो?"

रुबी एकदम किंचाळी देऊन दांत करकर चावीत पुन्हां बेशुद्ध झाली. अनामिकाही आपल्या मस्तकावर व छातीवर हात मारून आक्रोश करीत असतां एकदम जमिनीवर निश्चेष्ट पडली.

एवढ्यांत ॲम्ब्युलन्स् गाडी येत असतांना वाजत असलेली घंटा ऐकूं आली. ठिकठिकाणीं गोळीबारानें पडलेल्या कामगारांना मिठ्या मारून त्यांचीं मुलेंबाळें, बायको अगर वृद्ध आईबाप आक्रोश करीत होतीं. कांहीं मजूर प्राणान्तिक यातनांनीं विव्हळत होते. अखेरची दारुण धडपड संपल्यामुळें कांहीं मृत्युवश झालेले कामगार आकाशाकडे तोंड

वासून पडले होते. त्या अस्पष्ट प्रकाशांत त्यांचे ते पांढरे डोळे, अर्धवट उघडें पडलेलें तोंड आणि प्रेतकळा आलेली मुद्रा पहातांच कुणाच्याही हृदयांत चर्रर होत होतें. त्या देखाव्याला एखाद्या भयाण रणांगणाचें स्वरूप आलें होतें.

शशिधरला ॲम्ब्युलन्स गाड्यांची ती धांवपळ पाहून किंचित् धीर वाटला. दमनचा थंडगार हात हातांत घेऊन त्यानें नाडी पाहिली तों ती अगदीं अस्पष्टपणें चालली होती. त्याच्या डोक्यावरची जखम विशेष खोल नव्हती, पण चिखलानें आणि रक्तानें भिजलेले कपडे पहातांना दमनचा शर्टही रक्तमय झालेला त्याला दिसला.

शकुन्तलाबाईचा हात बाजूला करून त्यानें दमनच्या शरीरावरील भार नाहींसा केला व तो कोटाचीं व शर्टाचीं बटनें काढूं लागला. कसल्या-तरी भयंकर गोष्टीचा निकाल लागणार त्या भीतीनें त्याचा चेहरा अगदीं भेदरून गेला होता. हात सारखा थरथर कांपत होता. त्यानें सदरा बाजूला करून मोटारच्या प्रकाशांत त्याची जखम पाहिली. बंदुकीची गोळी दमनच्या डाव्या बरगडींत शिरली होती. शशिधरचा चेहरा एकदम काळवंडला. स्ट्रेचर घेऊन जाणाऱ्या परिचारकांना आर्तस्वरांत तो हांका मारूं लागला.

"डॉक्टर, डॉक्टर, कृपा करून लवकर इकडे या. दमन इथं आहे."

डॉक्टरबरोबर असलेला पोलीस अधिकारी एकदम उभा राहिला. हातांतील दिव्याचा झोत शशिधरच्या तोंडावर टाकून तो डॉक्टरसह जवळ आला. टॉर्चचा प्रकाश दमनच्या अंगावर पडतांच शशिधरनें एकदम डोळे मिटले व त्याचें रक्तानें माखलेलें तोंड पहातांच तो स्फुंदत रडूं लागला.

दमनच्या मस्तकावरील जखमेंतून एकसारखा रक्तस्राव चालला होता. यामुळें रक्ताचे पाट त्याच्या गालावरून मानेखालीं सांडत होते. तसेंच रक्तानें भिजलेले केंस त्याच्या रुंद भालप्रदेशावर रुळत होते. गाढ निद्रा लागल्याप्रमाणें त्याचे ओंठ किंचित् विलग झाले होते. नेहमीं दिस-

णारें औदार्य या वेळींदेखील त्याच्या चेहऱ्यावर स्पष्ट दिसत होतें. त्या परिस्थितींतही त्याची निर्मल अंगकान्ति सतेज दिसत होती.

" अरेरे दुर्दैवी प्राणी ! " पोलीस अधिकारी आर्त स्वरांत म्हणाला, " डॉक्टर, कांहीं आशा आहे का पहा जरा."

डॉक्टरनें खालीं बसून दमनची नाडी हातांत घेतली व स्टेथॉस्कोप काढून त्याच्या हृदयावर लावून गंभीरपणें म्हटलें, " हो. पण तावडतोब हॉस्पिटलमध्यें पाठवा. कांहीं तरी प्रयत्न करतां येईल."

तात्काल परिचारकांनीं स्ट्रेचर खालीं ठेवून दमनला त्यावर घातला; एवढ्यांत शकुन्तलाबाई सावध झाल्या व एकदम त्याला घट्ट मिठी धरून त्या ओरडल्या.

" सोडा, सोडा, माझ्या बाळाला ! मी नाहीं द्यायची. खबरदार हात लावाल तर. " जबरदस्त मानसिक धक्क्यामुळें त्या सभोंवार भेदक दृष्टीनें पहात होत्या. शोक आवरून शशिधर त्यांना बाजूला करण्याचा प्रयत्न करीत गहिंवरून म्हणाला, " मामी, असं काय करतां ? दमनची जखम बरी करायला त्याला हॉस्पिटलांत ते नेताहेत ! "

शकुन्तलाबाईनीं एकदम हंबरडा फोडला व त्या ओक्साबोक्शीं रडूं लागल्या.

" मामी, मामी, " शशिधर स्फुंदून म्हणाला, " घाबरूं नका. दमन बरा होणार. उगी रहा. "

तेवढ्यांत रुबीही शुद्धीवर आली. झालेला प्रकार आठवतांच ती वक्षः-स्थलावर हात मारून रडूं लागली.

" रुबी, काय हें ? दमन चांगला आहे. चला, आपण डॉक्टर-बरोबर हॉस्पिटलांत जाऊं या. खरंच, घाबरण्यासारखं दमनला कांहीं झालेलं नाहीं. चला, उठा. "

" शशिधर, " रुबी त्याच्या बाहूवर हातानें पकडून दीनवाण्या स्वरांत रडत म्हणाली, " माझी शपथ आहे तुम्हाला. माझा दमन बरा होईल ना ? "

" खरंच सांगतों ना मी ! मामी, उठा. " असें म्हणून त्यानें दमनला सोडवून घेतला.

स्ट्रेचरवर उचलतांच शकुन्तलाबाई ताडकन् उठून उभ्या राहिल्या. रुबीही त्यांना गच्च मिठी मारून रडूं लागली. शशिधर अनामिकेला हांका मारून ती सावध होतांच म्हणाला, " अना, चल, दमन खुशाल आहे घाबरूं नकोस. डॉक्टर त्याला हॉस्पिटलांत नेताहेत. आपण पण बरोबर जाऊं या. "

अनामिकेनें हुंदका दिला व शशिधरच्या साह्यानें ती चालूं लागली.

जवळच असलेल्या ॲम्ब्युलन्स गाडींत दमनला ठेवतांच ती सर्व मंडळी आपल्या गाडींत बसली. या वेळीं रात्रीचे दहा वाजून गेले होते. एवढ्यांत पुन्हां पावसाचा जोर सुरू झाला. आकाशांत वीजा चमकून एकसारखा भयंकर गडगडाट होत होता. मुंबईतील रस्त्यांत एकदम सामसूम झालें होतें. ॲम्ब्युलन्सची घंटा ऐकूं येतांच खिडक्या उघडून लोक बाहेर पहात होते. जिकडे तिकडे पाणीच पाणी झालें होतें. एकसारख्या सरीवर सरी कोसळत होत्या.

थोड्याच वेळांत गाडी हॉस्पिटलच्या पोर्चमध्यें शिरली. अगोदरच गोळीबाराची बातमी कळविल्यामुळें हॉस्पिटलचे बहुतेक सर्व डॉक्टर व परिचारिका मुद्दाम हजर होत्या. दवाखान्यांत एक प्रकारचें भयसूचक गांभीर्य पसरलें होतें. सर्जन डेव्हिसन मुख्य दरवाजाच्या पायरीजवळ गंभीर मुद्रा करून उभा होता व त्याच्या बाजूला आणखी कांहीं डॉक्टर अंगावर पांढरा झगा घालून निमूटपणें उभे होते. बाजूला एक दोन वृद्ध आंग्ल परिचारिकाही शांतपणें उभ्या होत्या. गाडी उभी राहतांच स्ट्रेचर घेऊन दोन शिपाई खालीं उतरले व ॲम्ब्युलन्सचें मागील दार उघडून त्यांनीं दमनला बाहेर काढलें. मागोमाग असलेल्या गाडींतून शशिधर व इतर मंडळी खालीं उतरली. डॉक्टरनीं आपसांत कुजबुज केली.

शकुन्तलाबाई, रुबी व अनामिका पदरानें आपलें तोंड दडवून दडवून स्फुंदून रडत होत्या. कामावर जाणाऱ्या नर्ससुद्धां क्षणभर उभ्या

राहून खिन्नपणें त्यांच्याकडे पहात होत्या. शशिधरला ओळखून एक डॉक्टर पुढें येऊन हळूच म्हणाला, “डॉ. शशिधर, हे कोण आहेत?”

दमनचें नांव ऐकतांच त्यांनीं आश्चर्य व्यक्त केलें. दमनला गाडी-वर घालून सरळ ऑपरेशन रूममध्यें नेण्यांत आलें. त्याच्या मागोमाग सर्जन डेव्हिसनही आंत गेले. शकुन्तलाबाई, रुबी व अनामिका येणारा हुंदका दाबून व्हरांड्यांतून चालल्या होत्या.

बाजूच्या वार्डमधील रोगी झोंप येत नसल्यामुळें उदासपणें केविलवाणी मुद्रा करून त्यांच्याकडे पहात होते. यातनांमुळें दीर्घ सुस्कारे टाकून उशीच्या दोन्ही बाजूला मान फिरवून ते निराशाच व्यक्त करीत आहेत असेंच शशिधरला वाटलें. ऑपरेशन रूमच्या जवळच असलेल्या खोलींत त्या तिघींना बसवून तो धीर देण्याच्या उद्देशानें म्हणाला, “मामी, डॉक्टर म्हणतात कीं घाबरण्याचं बिलकुल कारण नाहीं. हृदयापर्यंत गोळी गेलेली नाहीं. एक्स्‌रेनें गोळीची जागा अचुक समजतांच ऑपरेशन करतील. डॉक्टर डेव्हिसनएवढे हुषार सर्जन कुठंच मिळायचे नाहींत. मी आंत जातों. तुम्ही बिलकुल काळजी करूं नका.”

एवढें सांगून तो आंत गेला. दमनच्या हृदयाचे ठोके मोजित असलेला डॉक्टर एकदम डेव्हिसनना उद्देशून म्हणाला, “Sir, he is collapsing.”

“Hurry up. Oxygen.” असें म्हणून डेव्हिसननें जवळच तयार असलेलें इन्जक्शन त्याला दिलें व ती पिचकारी परिचारिकेच्या हातांत देऊन त्यांनीं नाडी पहाण्यास सुरवात केली. ऑक्सिजन वायुची नळी दमनच्या तोंडाजवळच धरली होती; थोड्याच वेळांत पुन्हां नाडीचे ठोके व्यवस्थित पडूं लागले.

“Alright!” असें गंभीरपणें म्हणून त्यांनीं ऑपरेशनला आवश्यक असणारीं सर्व शस्त्रें व साहित्य वाफेवर तापविण्याचा परिचारिकेस हुकूम दिला. तिनें तो हुकूम ऐकतांच कपाटांतून चमकणारीं हत्यारें काढून पांढऱ्या स्वच्छ भांड्यांत ठेवलीं व तें भांडें पिंपाप्रमाणें मोठ्या चकचकीत डब्यांत घालून वाफेवर तापविण्यास सुरवात केली. तेथें असलेल्या इतर

डॉक्टरनीं व परिचारिकांनीं हात धुतले व पेटी उघडून वाफेंतील पांढरेशुभ्र झगे अंगाभोवतीं बांधले व लोशनमध्यें असलेले रबरी मोजे हातांत चढविले.

दमन ऑपरेशनच्या मेजावर निश्चेष्ट पडला होता. एका नर्सनें भरपूर कापसानें पुसून त्याच्या डोक्यावरची जखम पाहिली तों ती विशेष खोल नव्हती. त्याच्या मानेवरही दोन तीन ओरखडे दिसत होते. वरचा प्रखर दिवा पेटत होता यामुळें त्याच्या कुशीवर झालेली जखम स्पष्ट दिसत होती व आंतून एक प्रकारचें मलीन रक्त बाहेर झिरपत होतें. डॉक्टरनें कापसानें पुन्हा पुन्हा टिपून त्या जखमेचें स्वरूप पाहण्याचा प्रयत्न केला. त्यानें बरगड्याही दाबून पाहिल्या, पण त्यांतील एकही मोडलेली दिसत नव्हती. यामुळें कदाचित् विरोध न झाल्यामुळें बंदुकीची गोळी फार आंत गेली असेल याची कल्पना सर्जन डेव्हिसनला झाली होती. हजारों रोग्यांवर शस्त्र—क्रिया करीत आल्यामुळें रोग्यांच्या चेहऱ्याकडे बघण्याचें महत्व त्यांना वाटत नसे. पण या वेळीं दमनचा इतिहास ऐकल्यामुळें त्यांनीं त्याच्याकडे कुतूहलानें पाहिलें. उमद्या उदार अन्तःकरणाची साक्ष त्या परिस्थितींतही दमनच्या मुद्रेवर स्पष्ट दिसत होती.

“ Poor chap ! ” असे उद्गार काढून सर्जन डेव्हिसननें शशिधरला विचारलें, “ तुम्ही यांचे भाऊ का ? यांची पत्नी आहे का ? कुठं आहे ती ? ”

शशिधरनें खिन्न मुद्रा करून सर्व प्रश्नांचीं उत्तरें दिलीं व त्यानें दीनवाण्या स्वरांत म्हटलें, “ सर, पण तुम्हांला काय वाटतं ? आशा आहे ना ? ”

“ मला तसं वाटतं. प्रयत्न करून पाहूं. ” असें म्हणून ते ऑपरेशनच्या तयारीस लागले.

नाडीचे ठोके मोजणाऱ्या डॉक्टरनें हृदय—क्रिया ठीक चालत आहे अशी ग्वाही दिली. सर्वत्र गंभीर शांतता होती. सर्जन डेव्हिसनच्या भालप्रदेशावर बांधलेल्या दिव्याचा प्रखर झोत दमनच्या जखमेवर पडत होता. सर्जननें हातांत घेतलेला चाकू त्या प्रकाशांत सारखा चमकत होता. मुख्य नर्स हत्याराच्या टेबलाजवळ राहून त्यांना लागणारीं शस्त्रें देण्यासाठीं

तत्परतेनें वाट पहात उभी होती व दुसरी नर्स जवळ इतर सर्व सामुग्री घेऊन तयार होती. डेव्हिसननें दमनच्या शरिरावर सफाईदार रीतीनें चाकू चालविण्यास सुरवात केली. परिचारिका हातांतील स्पंजानें रक्त टिपून चाप लावित होती. दमनच्या डोक्याजवळ असलेला डॉक्टर त्याची नाडी पाहून क्लोरोफॉर्म देत होता. डेव्हिसन् तन्मयतेनें जखमेचें स्वरूप निश्चित करून शस्त्र–क्रिया पुढें चालवित होते. मधूनंच कसल्या तरी अडचणीमुळें त्यांच्या रुंद भालप्रदेशावर आंठ्या पडत; पण क्षणार्धांत आपला तर्क अचूक आहे अशा समजुतीनें त्यांच्या चेहऱ्यावर किंचित् स्मित झळकत होतें. शशिधर अगदीं व्याकुळ मुद्रा करून त्यांच्या चेहऱ्यावर उमटणारे विकार पहात होता.

इतक्यांत क्लोरोफॉर्म देणारा डॉक्टर एकदम ओरडला, "Sir, the pulse is growing weak and unsteady. (साहेब, नाडी मंद व अनियमित चालत आहे.)"

"Be quick, Oxygeon." डेव्हिसन् बुटाचे पाय आपटून ओरडला.

शशिधरचें हृदय सारखें धडधडूं लागलें. त्याच्या डोळ्यांत अश्रू उभे राहिले. डॉक्टर असूनही या वेळीं त्याच्यानें तेथें राहवेना. दरवाजा-पर्यंत जाऊन तो पुन्हां मागें फिरला. बाहेर त्या सर्वांना तोंड कसें दाखवा-यचें आणि काय सांगायचें या विचारानें तो मन घट्ट करून तेथेंच राहिला.

ऑक्सिजन आणि इन्जक्शन् देतांच दमनची नाडी पुन्हां सुधरूं लागली. सर्जन डेव्हिसन्चा चेहरा भयंकर त्रस्त झाला होता. सरावामुळें कितीही अवघड शस्त्रक्रिया करतांनादेखील त्या वयस्क चेहऱ्यावर दिस-णारें समाधान त्या वेळीं बिलकुल दिसत नव्हतें.

कांहीं वेळ गेल्यावर पुन्हां त्यांनीं शस्त्रक्रियेस सुरवात केली. ऑपरेशन् लवकर संपविण्यासाठीं ते एकाग्र मनानें कांहीं तरी आपल्याशींच पुटपुटून शस्त्र चालवीत होते. शेवटीं गोळी बाहेर काढतांच त्यांनीं समाधानानें हास्य केलें व ती गोळी भांड्यांत टाकून ते म्हणाले, "I have finished and I am finished." (झालं एकदांचें काम व आम्हांही सारखं काम बाहेर पडलं.)"

नर्सनें जखम साफ करून पुसल्यावर डेव्हिसन्‌नें त्यावर टांके घातले. दुसऱ्या डॉक्टरनें इतर जखमा पुसून बांधून टाकल्या. डेव्हिसन्‌नें थकून दीर्घ निश्वास टाकला, व भिंतीवर असलेल्या घड्याळाकडे त्यांनीं पाहिलें तों बारा वाजायला आले होते. शशिधर केविलवाण्या नजरेनें दमनकडे पहात होता.

"पाहिजे तर त्याच्या बायकोला आंत येऊं द्या," डेव्हिसन् म्हणाले, "आतां बरीच आशा वाटते, पण कुणी सागावं ? ( We have hopes of his recovery; but we can't say exactly. )"

शशिधर घाईनें बाहेर गेला. त्याला पाहतांच त्या तिघीही एकदम दचकून उभ्या राहिल्या.

"मामी, रुबी," शशिधर उत्सुकतेनें म्हणाला, "ऑपरेशन चांगलं झालं. गोळी बाहेर काढली. तुम्हाला दमनला बघायला डॉक्टरनीं परवानगी दिली आहे."

सर्वजणी लगबगीनें आंत घुसल्या. दमनची ती अवस्था बघून शकुन्तलाबाईनीं व रुबीनें एकदम हुंदका दिला. त्या पुढें जात होत्या पण नर्सनें अडवून त्यांना त्याला स्पर्श करूं दिला नाहीं. रुबीनें आवंढा गिळून घोगऱ्या स्वरांत विचारलें, "डॉक्टरसाहेब, दमन बरे होतील ना ?',

"मुली घाबरूं नकोस. लवकरच ते बरे होतील." डेव्हिसन्‌नें रुबीकडे स्निग्धपणें पहात उत्तर केलें.

शकुन्तलाबाईनीं एकदम मान वर करून कृतज्ञतेनें त्याच्याकडे पाहिलें व अश्रूंनीं ओथंबलेले डोळे मिटून त्यांनीं डेव्हिसन्‌ला नमस्कार केला.

दमनला पुन्हां गाडीवर घालून परिचारिका त्याला वार्डमध्यें नेऊं लागल्या तेव्हां सर्वांनीं सर्जन डेव्हिसन् आणि इतर डॉक्टर यांना नमस्कार केला व सर्व मंडळी गाडीबरोबर रडें आवरीत चालूं लागली.

दवाखान्यांत जिकडे तिकडे गंभीर शांतता होती. नर्स बुटाचे आवाज न करतां आपल्या वार्डमध्यें फिरत होते. गोळीबारांत जखमी झालेल्या कामगारांची दुसरी गाडी ऑपरेशन रूमकडे जात होती. दवाखान्याच्या पोर्चमध्यें अजूनही ॲम्ब्यूलन्स गाड्या उभ्या होत्या.

एका खोलींत दमनची गाडी शिरली. तेथें दुसरी नर्स बिछाना सारखा करीत होती. लगेच सर्वांनीं मिळून दमनला त्या बिछान्यावर अलगद ठेवला.

कांहीं वेळानें सर्वांना उद्देशून ती नर्स प्रेमळपणें म्हणाली, "तुम्ही पलीकडल्या खोलींत जाऊन नाहीं तर इथं खुर्चीवर स्वस्थ पडा. मी जागत बसणारच आहे."

शकुन्तलाबाईंनीं हलकेच दमनच्या गालाचा मुका घेतला. रुबी त्याचा तळहात आपल्या गालाशीं दाबून घळघळ अश्रुमोचन करीत होती. त्या वेळीं परिचारिकेनें कितीही विनवणी केली म्हणून कुणाला झोंप येणार होती ! सबंध रात्रभर सर्व मंडळी दमन सावध होण्याची वाट पहात तटस्थ बसून होती.

आकाशांत मेघांची गर्दी कमी होऊन तारका चमकूं लागल्या. दवाखान्याच्या गॅलरींतून विरल ढगाआड चंद्रकोर मंदपणें प्रकाशतांना दिसत होती.

शशिधरनें त्या समोरच्या देखाव्याकडे पाहिलें व तो आंत येऊन आर्जवानें म्हणाला, "मामी, रुबी, दिवस उजाडत आला. जरा स्वस्थ पडा तुम्ही. मी बसतों इथं. मला झोंप येत नाहीं."

शशिधरच्या आग्रहास्तव त्या तिघीही डोळे मिटून खुर्चीवर पडल्या व सबंध दिवस रात्र थकल्यामुळें कांहीं काळ त्यांना झोंप लागली.

शशिधर वाढत्या तेजानें प्रकाशणाऱ्या चंद्रकोरीकडे आशेनें पहात उभा राहिला होता.

———

# २०

दमनची स्थिति अनपेक्षितपणें चिन्ताजनक होत होती. ऑपरेशन झाल्यानंतर एक दिवस झाला तरी देखील त्याला शुद्धि आली नव्हती. शकुन्तलाबाई, रुबी आणि अनामिका यांनीं तो दिवस आणि रात्र त्याच्या कॉटजवळ बसून ढळढळा रडून काढली. सर्जन डेव्हिसन वारंवार येऊन अनेक उपाय करीत होते. पण आतां ते देखील त्याच्या जीविताबद्दल साशंक होत होते. दुसऱ्या दिवशीं त्याला बराच ताप आला आणि कदाचित् केस सेप्टिक् झाली तर त्याचा परिणाम घोर होईल याची जाणीव त्यांना झाली होती.

दमनच्या निर्विकार मुद्रेकडे पाहून शकुन्तलाबाई, रुबी व अनामिका अत्यंत केविलवाण्या शब्दांनीं त्याला हांका मारीत होत्या. पण त्याच्या चेहऱ्यावर मात्र कोणताच भाव उमटत नव्हता. यामुळें डॉक्टरनें अगर आप्तेष्टांनीं त्यांना कितीही धीराच्या गोष्टी सांगितल्या तरी त्यांचा सत्यपणा त्यांना बिलकुल पटत नव्हता. दुसऱ्या दिवशीं डॉक्टरनीं बरीचशी आशा सोडली होती तरी निर्वाणीचे प्रयत्न म्हणून त्यांनीं शकुन्तलाबाईंचें व अनामिकेचें बरेंचसें रक्त त्याच्या अंगांत घातलें व कांहीं आशाजनक बदल होतो कीं काय याची सर्व मंडळी उत्सुकतेनें वाट पाहूं लागली.

दमनच्या त्या भीतिप्रद अवस्थेमुळें जिकडे तिकडे सहानुभूतीचे उद्गार निघत होते. मुंबईतील वृत्तपत्रें त्या प्रसंगाचें वर्णन करून मुक्त-कंठानें त्याचा गौरव करीत होतीं, त्याच्या प्रकृतीची बातमी ठळक अक्ष-रांत मुख्य पृष्ठावर देत होतीं. कांहीं गिरणी-मालक अगदीं खुषीनें आर्थिक सहाय्य करण्यास तयार झाले होते. जिकडून तिकडून शकुन्तलाबाईंना व रुबीला सहानुभूतिपर पत्रें व तारा येत होत्या. हिंदुस्थानांतील बहुतेक

कामगार-संघांनीं गोळीबाराचा निषेध करणारे व दमनविषयीं आदर व विश्वास प्रकट करणारे ठराव पास केले होते. पण शकुन्तलाबाईंना सभोंवार चाललेला त्याचा गौरव यत्किंचित्‌ही महत्त्वाचा वाटला नाहीं.

"माझा बाळ मला पाहिजे. मला जगाची स्तुति नको आहे." असें म्हणून त्या सारख्या रडून देवाचा धांवा करीत होत्या. डॉक्टर येतांच त्या गर्भगळीत मुद्रेनें त्यांच्याकडे पाहून रडून विनवित होत्या. "डॉक्टरसाहेब, कांहीं करा पण माझा बाळ मला द्या."

सर्जन डेव्हिसनही शक्य तों धीर देण्याचा प्रयत्न करीत होते.

त्या दिवशीं संध्याकाळीं दमनचा चेहरा किंचित् सतेज दिसूं लागला. अर्धवट शुद्धीवर आल्याप्रमाणें त्याच्या हातापायाची जराशी हालचालही दिसूं लागली. 'दमा, बाळ दमा,' अशी शकुन्लाबाईंनीं रडत त्याच्या कानाजवळ मारलेली हांक ऐकतांच डोळ्याच्या पापण्या उघडण्याचा निष्फल प्रयत्न करतांना दमन दिसत होता. त्याचा तापही बराच कमी झाला होता. डॉक्टरनीं नाडी पाहिली तों ती देखील पुष्कळ सुधारत होती. त्यांनीं त्याच्या चेहऱ्याकडे पाहून समाधानानें हास्य करीत म्हटलें, "Good! Directly there is a change for the better. (खात्रीनें आज पुष्कळ सुधारणा होत आहे.) मला वाटतं उद्यां बहुतेक सावध होईल."

शकुन्तलाबाई उत्कंठेनें सर्जन डेव्हिसनच्या चेहऱ्याकडे पहात होत्या. त्यांचे ते शब्द त्यांना अमृतासारखे मधुर वाटले. आपल्यावर त्यांचे अगणित उपकार आहेत या जाणीवेनें कृतज्ञतापूर्वक त्या सर्जन-साहेबांकडे पहात होत्या. दोन तीन दिवस सारखें जाग्रण झालेलें होतें. पोटांत धड अन्न नव्हतें. एकसारखें रडून रडून त्याचे डोळे लाल होऊन सुजले होते. चेहरा अगदीं म्लान झाला होता.

रुक्मीचीही तीच अवस्था झाली होती. कधीं, घटका अर्ध घटका झोंप लागलीच तर ती सारखी दचकून जागी होत होती. तिची अगोदरच क्षीण झालेली प्रकृति या चार दिवसांत अगदींच थकल्यासारखी वाटत होती. तिचे लांब डोळे खोल गेले होते. निर्मल गौरकान्ति अगदीं निस्तेज

दिसत होती. गालावर नेहमीं दिसणारी आरक्तता नाहींशी झाली होती. केंसावरून कंगवा न फिरविल्यामुळें ते मलीन दिसत होते.

रात्रीं डॉक्टर डेव्हिसन पुन्हां दमनला पहाण्यासाठीं आले. त्याच्या मुखावरील तजेला सारखा वाढत होता. त्यांनीं त्याची नाडी हातांत धरली तों त्यांत सकाळच्यापेक्षां पुष्कळच सुधारणा झाली आहे असें आढळून आलें. नर्सला थर्मामिटर लावून ताप पाहाण्यास सांगितलें. तो अगदीं थोडा होता. डेव्हिसननें सस्मित मुद्रा करून त्याच्याकडे पाहिलें तों दमन गाढ निद्रेंतच आहे असें त्यांना वाटलें. जवळच रुबी उत्सुकतेनें त्यांच्याकडे पहात होती. डेव्हिसननें तिच्याकडे पाहून प्रेमळपणें हास्य केलें व रुबीच्या खांद्यावर हातानें थोपटित म्हटलें, " My daughter, you are very lucky. You get your husband back. (मुली, मोठी भाग्यशाली आहेस. तुझा नवरा तुला परत मिळाला.)"

रुबीनें डेव्हिसनचा हात एकदम घट्ट दाबला. आनंदाच्या उमाळ्यामुळें तिच्या तोंडांतून शब्द बाहेर पडत नव्हता. कंठ सद्गदित झाला. आनंदाश्रूनीं ओथंबलेल्या नेत्रांनीं ती त्यांच्याकडे सारखी पहात होती. सर्जन डेव्हिसनचें जरी सारें आयुष्य अविवाहित स्थितींत एकटेपणानेंच गेलें होतें तरी या वेळीं त्यांना रुबीविषयीं अपत्य प्रेम वाटलें. क्वचित्च भावनावश होणारा तो विख्यात सर्जन या वेळीं द्रवला. रुबीकडे वत्सलतेनें तो पहात होता. कंठ साफ करण्याचा प्रयत्न करून रुबी आर्द्र स्वरांत म्हणाली, " पिताजी, तुमचे उपकार जन्मोजन्मीं तरी फिटतील का ? मी काय करूं ?"

" मुली, " डेव्हिसन स्निग्धपणें म्हणाले, " मी असं ऐकतों कीं तूं फार श्रीमंत आहेस. तुझ्यापासून आम्ही या हॉस्पिटलसाठीं चांगली धर्मार्थ देणगीची अपेक्षा करतों. आम्हाला एक चांगलं सूतिकागृह बांधायचं आहे."

" जें तुम्ही सांगाल तें देईन. " रुबी एकदम सद्गदित होऊन उद्गारली व तिचे अश्रू डेव्हिसनच्या हातावर पडले.

ते पदरानें ती पुशित होती तोंच त्यांनीं खिशांतून हातरुमाल काढून स्वतःच ते पुसले व आपले विकार लपविण्याचा प्रयत्न करीत जवळच उभ्या असलेल्या नर्सला रात्रीं दमन जागा झाल्यावर कोणतें औषध द्याव-

यांचे वगैरे आवश्यक सूचना दिल्या व सर्वांना शुभरात्र चिन्तून ते निघून गेले.

"किती प्रेमळ स्वभाव ग !" अनामिका गहिंवरून म्हणाली, "एकएका शद्बाबरोबर किती बरं धीर वाटतो ! रुबी, तुझ्याबद्दल त्यांना फारच ममता वाटते आहे."

रुबी दमनकडे सारखी प्रेमार्द्र दृष्टीनें पहात होती. गाढ निद्रेमुळें तो दीर्घ श्वासोच्छ्वास करीत होता. त्याला स्पर्श करण्याचा मोह अनावर झाल्यामुळें तिनें आपल्या पदरानें हळूच त्याच्या भालप्रदेशावरील घर्मबिंदु पुसले व त्याच्या किंचित् विलग झालेल्या ओंठांना आपल्या बोटांनीं मृदु स्पर्श करून ती लडिवाळपणें त्याच्याकडे सारखी टक लावून पाहूं लागली. बाजूला उभी असलेली परिचारिका आपल्याकडे कौतुकानें पहात स्मित करित आहे याची तिला बिलकुल जाणीव नव्हती. आपल्या हाताचीं बोटें तोंडावर दाबून दमनकडे पहात तिनें चुंबनाचा हलकाच आवाज केला व ती तशीच दृष्टि स्थिर ठेवून मागें सरकली.

या वेळीं अकराचा सुमार होता. आकाशांत एखादा लहानसा ढग दिसत होता. समोर दिसणाऱ्या बगीचाच्या मैदानामागें चंद्रकोर उगवत असल्यामुळें पूर्व-क्षितिजाकडील आकाशभाग तेजस्वी दिसत होता. बगिचांतील अशोकवृक्षाच्या छायामय आकृति आकाशाच्या पार्श्वभूमीपुढें वाऱ्याच्या झुळकेमुळें मंदपणें डोलत होत्या. शीतल वारा खिडकींतून आंत सारखा येत होता.

"तुम्ही सर्व मंडळी झोंपा." नर्स आग्रहानें म्हणाली, "तीन चार रात्री सारखं तुम्हांला जाग्रण झालं आहे. शिवाय जर कांहीं हवं झालंच तर तुम्हाला मी उठवीन, तुम्हीं अगदीं निर्धास्त झोंपा."

"खरंच मामी," शशिधर पुढें म्हणाला, "थोडा वेळ बसून मग मीदेखील झोपतों. चला तुम्ही."

शकुन्तलाबाई उठून दमनच्या बिछान्याजवळ गेल्या व त्यांनीं त्याचा हात आपल्या हातांत घेतला व मुका घेऊन त्या साश्रू नयनांनीं रुबी, अनामिका यांसह पलीकडच्या खोलींत झोंपावयास गेल्या.

झोंप येऊं लागली तेव्हां शशिधरही आरामखुर्चीवर पडून निद्रावश झाला. नर्स मात्र ठरलेल्या कालान्तरानें दमनजवळ जाऊन नाडी व ताप पाहून लिहून ठेवित होती.

पहांटेचा प्रहर झाला होता. जिकडे तिकडे शांतता होती. गार वारा सुटल्यामुळें दमनच्या सर्व अंगावर पांघरूण सारखें घालीत असतां त्यानें डोळे उघडले. प्रथम आपण कुठें आहों याची त्याला बिलकुल जाणीव होईना. आपली सर्व शक्ति अगदीं क्षीण झाली असून शरीर जड झाल्यासारखें त्याला वाटलें. हात पाय बधिर झाले असून डोक्यावर कांहीं तरी जड ओझें आहे असें वाटून त्यानें डोळे फिरवून वर पहाण्याचा प्रयत्न केला. एवढ्या हालचालीनेंही त्याला पुष्कळ थकवा आला व क्षणभर डोळे मिटून पुन्हां त्यानें ते उघडले. नर्सनें औषधाचा भाग घेण्याकरतां तोंड उघडावयास सांगतांच त्यानें निमूटपणें किंचित् तोंड उघडलें. तिनें साव-काश औषध तोंडांत ओतलें.

थोड्याच वेळांत दमनला बरीच हुशारी वाटली. सभोंवार पाहून हें हॉस्पिटल असावें याची त्याला कल्पना झाली. हळुहळु झालेल्या प्रकाराची त्याला स्मृति होऊं लागली. हाताचीं बोटें हालवून त्यानें नर्सला जवळ बोलावलें. त्याच्या डोळ्यांतून अश्रू वाहत होते. नर्सनें ऐकण्यासाठीं खालीं मान करतांच तो क्षीण स्वरांत म्हणाला, "आई, रुबी, अना कुठं आहेत?"

"झोंपल्या आहेत. काय पाहिजे तुम्हाला?" नर्सनें स्निग्धपणें प्रश्न केला.

तो नकारार्थक मान हलवून खोल आवाजांत म्हणाला, "कोणतें हॉस्पिटल हें?"

"नॅशनल जनरल हॉस्पिटल." नर्स प्रेमळपणें हंसत म्हणाली, "आईना आणि सर्वांना उठवूं का?"

"नको." दमन उशीच्या दोन्ही बाजूला मान हलवून म्हणाला, "किती वाजले?"

"साडेचार."

" आई अना झोंपल्या आहेत का ? त्यांना जाग्रण झालं असेल. जाग्या आहेत का पहा जरा. "

" पहातें हं. " असें म्हणून नर्स पलीकडच्या खोलींत गेली.

दमन एकसारखा दाराकडे पहात होता. इतक्यांत शशिधर जागा झाला. दमनजवळ जाऊन त्यानें पाहिलें. गहिंवरून सद्गदित कंठानें त्यानें 'दमन' अशी हांक मारली. दमननेंही त्याच्याकडे पाहिलें. दोघांच्याही डोळ्यांतून अश्रू वाहूं लागले.

नर्सनें दार उघडतांच त्या आवाजानें तिघीही एकदम दचकून जाग्या झाल्या.

"बाई, ते जागे झाले आहेत" हे नर्सचे शब्द ऐकतांच त्या धड-पडून दमनच्या खोलींत गेल्या. दमनकडे पहातांना सर्वांच्या डोळ्यांतून आनंदाश्रूंच्या धारा सारख्या वहात होत्या. हृदय भरून आल्यामुळें शकुन्तलाबाईंना गुदमरल्यासारखें वाटत होतें. रुबीही अत्यानंदामुळें येणारें रडें आवरण्याचा प्रयत्न करीत दमनच्या शेजारीं बसली व त्याचा उजवा हात हृदयाशीं गोंजारून एकसारखी त्याच्याकडे पहात होती. शकुन्तला-बाईंनीं चटकन् त्याच्या कानशिलाजवळ धरून पटापट त्याच्या गालाचे मुके घेतले.

"बाळ दमा," एवढें कसेंबसें बोलून त्यांनीं त्याच्या सर्व शरीरावर चाचपत हात फिरविला.

"आई, रुबी, ताई," दमन साश्रू नयनानीं पहात घोगऱ्या क्षीण आवाजांत म्हणाला. त्याच्या गालावरून खालीं सांडणारे अश्रू शकुन्तलाबाई पदरानें पुशीत होत्या.

बराच वेळ कुणाच्याहीं तोंडांतून शब्द फुटेना. शेवटीं ओंठावर जीभ फिरवून दमन आवंढा गिळून खोल स्वरांत म्हणाला, " आई, मला पाणी दे ग ! "

शकुन्तलाबाई टेबलावरील पेला उचलून चमच्यानें पाणी भरवूं लागल्या. दमन सर्वांकडे टकटक पाहून पाण्याचा घोंट गिळीत होता. लहानपणीं त्याला मांडीवर घालून दूध पाजतांना वाटलेला आनंद शकुन्तला-

बाई पुन्हां अनुभवित होत्या. हातानें त्यानें पाणी पुरे म्हणतांच त्यांनीं पाण्याचा पेला टेबलावर ठेवला. रुबीनें पदरानें बाहेर सांडलेलें पाणी पुसलें.

"आई, तुम्ही माझ्यावर रागावलां नाहीं ना ?" दमननें आर्त स्वरांत प्रश्न केला.

"माझ्या लाडक्या बाळावर कोण रागवेल बरं ?" शकुन्तलाबाईंनीं त्याच्या गालावरून हात फिरवित उत्तर केलें.

थकल्यामुळें कांहीं वेळ तो डोळे मिटून स्वस्थ राहिला. त्याला पुन्हां झोंप येते आहे अशा समजुतीनें सर्व मंडळी उठून उभी राहिली. तेव्हां पांघरूण सारखें करण्यासाठीं अनामिकेनें रग उचलतांच पुन्हां त्यानें डोळे उघडले. सर्वांना उभ्या राहिलेल्या पाहून बिछान्याच्या बाजूस हळुहळू थोपटून तो खोल स्वरांत म्हणाला, "आई, तुम्ही जाऊं नका. माझ्याजवळ बसा. मला बरं वाटतं."

"बरं बसतों हं बाळ. तुला झोंप येते तर झोंप हं." शकुन्तलाबाई वात्सल्यानें म्हणाल्या.

दमननें पुन्हां डोळे मिटले व कांहीं वेळानें ते उघडून त्यानें पायाजवळ बसलेल्या शशिधरला जवळ येण्यास खुणावून विचारलें, "शशी, संपाचं काय झालं ?"

"संप मिटला. सरकारी अधिकाऱ्यांनीं तडजोड घडवून आणली."

त्या स्थितींतही दमनच्या चेहऱ्यावर हास्य झळकलें. कांहीं वेळ स्तब्ध राहिल्यावर तो पुन्हां म्हणाला, "आई, किती वाजले ग ?"

"साडे पांच." अनामिका मनगटावरील घड्याळाकडे पहात उत्तरली.

"मला जरा उठवून बसवा. बाहेर पाहावंसं वाटतं मला."

शकुन्तलाबाईंनीं त्याच्या मानेशीं हात घालून किंचित् वर उचलला व शशिधरनें त्याच्या डोक्याजवळ दोन तीन उशा घालून समोरचें दृश्य त्याला दिसेलसें केलें.

पहांटेचा समय झाला होता. पूर्व क्षितिजावर तांबडें फुटलें होतें. आकाशाच्या मध्यभागीं चंद्रकोर मृदु तेजानें चमकत होती. तिचें मंद चांदणें समोरच्या मैदानावर पसरलें होतें. शीतल वाऱ्याची झुळूक येतांच खिडकीवरील पडदे सारखे फडफडत होते. रस्त्यावरील दिवे दिशा फांकूं लागल्यामुळें निस्तेज झाल्यासारखे दिसत होते. त्या शांत वेळीं रस्त्यांतून जाणाऱ्या दूधवाल्या भय्याचें गाणें एक प्रकारें आनंदजनक वाटत होतें. पूर्व क्षितिजावरील कान्ति वाढत असल्यामुळें आकाशांत सारखा तांबडा रंग पसरत होता.

" आई, उजाडलं आहे. " दमन बाहेर पहात क्षीण स्वरांत म्हणाला.

" हो दादा" अनामिका मध्येंच हंसत म्हणाली, "काळयाकुट्ट रात्री-नंतर आत्तां हें उजाडलं आहे. "

दमननें हास्य केलें. त्याला हसतांना पाहून सर्वांना अत्यानंद झाला. सूर्यबिंब वर आलेलें पहावें म्हणून तो आतुरतेनें बाहेर पहात होता.

कांहीं वेळानें लाल सूर्य-बिंब वर आलें. प्रकाशाचे कोंवळे किरण बगिचांतील वृक्षांवर पडल्यामुळें त्यांना सोन्याचा मुलामा चढला होता. पक्षी अशोकाच्या या झाडावरून त्या झाडावर किलबिल किलबिल शब्द करीत उडत होते. बागेंतील डेलीयाचा ताटवा सुंदर चित्रविचित्र रंगाच्या फुलांनीं फुलून उन्मादानें डोलत होता. हिरव्यागार मैदानावर सुंदर दंव-बिंदु चमकत होते.

" आई, माणसाला आयुष्यांत एखादाच भयंकर अपघात घडत असतो. मला आतां जीवितांत आनंद व उत्साह वाटूं लागला." असें म्हणून दमननें शकुन्तलाबाईचा हात आपल्या हातांत घेतला.

" माझा बाळ सुखी होवो हेंच मी देवाकडे मागणं मागतें." शकुन्तलाबाई गहिंवरून म्हणाल्या.

कांहीं काल कुणींच कांहीं बोललें नाहीं. शेवटीं डोळे पुसून त्या म्हणाल्या, " चला तुम्ही तोंड धुवून या. मी बसतें तोंपर्यंत. "

" आई, " दमननें हांक मारली.

" काय बाळ ! "

" कांहीं नाहीं. " असें म्हणून थकवा आल्यामुळें त्यानें डोळे मिटले. कांहीं वेळ त्याला ग्लानी आली होती.

थोड्या वेळानें तो जागा झाला. एवढ्यांत रुबी परत आली.

" मामी, चला तुम्ही. मी बसतें. " असें म्हणून ती दमनजवळ कॉटवर बसली.

शकुन्तलाबाई गेल्यावर तिनें दमनचा हात आपल्या हातांत घेतला व त्याच्या तळहातावर आपलें तोंड दाबून चुंबन घेत ती रुसव्यानें म्हणाली, " दमा, आतां मी तुला कुठंच एकटी जाऊं द्यायची नाहीं. असं पळायचं होतं तर मला तरी बरोबर घ्यायची. "

" रुबाया, तूं माझ्यावर रागावलीस का ? " दमन तिचा हात आपल्या मानेजवळ घेत म्हणाला.

" रागावलें होतें. पण आतां नाहीं. " ती त्याच्या सदऱ्याच्या बटनाशीं चाळा करीत म्हणाली.

" रुबाया, तुझं सौभाग्य सबळ होतं म्हणूनच आज मी जगलों. " तिच्याकडे प्रेमार्द्र दृष्टीनें पहात तो म्हणाला.

त्याच्या ह्या उद्गारानें रुबीला किती तरी अभिमान व आनंद वाटला. ती प्रेमभरानें सद्गदित होऊन म्हणाली, " तुम्ही एकदम फार बोलूं लागला. आतां आपण बरे झाला. मग आपण पुष्कळ पुष्कळ बोलूं हं. "

" रुबी, मी बोलूं नये म्हटलं म्हणून तोंड थोडंच बंद राहणार ! "

" तें मी बंद करतें. " असें म्हणून रुबीनें त्याच्या ओंठावर आपले ओंठ दाबले. पुन्हां एकदां तिनें त्याच्या अधरांचें चुंबन घेतलें. दमननें तिच्या मानेभोंवतीं आपल्या हाताचा निर्बळ विळखा घातला होता.

दारांत कुणाची तरी चाहूल ऐकतांच रुबीनें एकदम उठून मागें पाहिलें. तों सर्जन डेव्हिसन् हंसत उभे होते.

" गुड मॉर्निंग् डॉक्टरसाहेब. " रुबी लज्जायुक्त स्वरांत म्हणाली, तिचें मुखकमल लाजेनें आरक्त झालें होतें. " गुड मॉर्निंग् " डेव्हिसन्

कौतुकानें तिच्याकडे पहात म्हणाले, "मुली, हॉस्पिटलचा नियम तूं मोडला आहेस. But I make it a special case (पण मी हा अपवाद मानतों.) This time it is excused. Next time it is allowed. (या वेळीं क्षम्य आहे व दुसऱ्या वेळीं परवानगी आहे.)

एवढें बोलून डेव्हिसन मनोसक्त हंसले व दमनजवळ गेले. दमनला रुबीनें त्यांचा परिचय करून देतांच त्यानें कृतज्ञतापूर्वक त्यांचे आभार मानले तेव्हां डॉक्टर त्याला उद्देशून म्हणाले, "मुला, आतां तूं लवकर चांगला होशील. The world needs you for many more years (जगाला अजून तुझी पुष्कळ आवश्यकता आहे.) पण आतां जास्त बोलायचं नाहीं हं."

त्यांच्या त्या उत्साहदायक व कळकळीच्या भाषणामुळें रुबीला गहिंवरून आलें. कांहीं वेळ बोलून व नर्सला सूचना देऊन ते पुढच्या वार्डांत गेले. रुबीनें दमनच्या अधरांचें पुन्हां चुंबन घेतलें व ती लाजून हंसत म्हणाली, "डॉक्टरच्या परवानगीनं हं."

एवढ्यांत शकुन्तलाबाई, अनामिका व शशिधर पुन्हां आंत आले.

"आई, आज तुमच्याबरोबर मी चहा घेणार." दमन हंसत म्हणाला.

त्याचा चेहरा उमलत्या सूर्यकमलाप्रमाणें अधिक अधिक सतेज होत होता. सर्वांकडे एकसारखा अगदीं प्रेमार्द्र दृष्टीनें तो पहात होता. प्रत्येकाची प्रेमळ नजर आपल्यावरच स्थिर झाली आहे असें पाहून त्याचें हृदय भरून आलें. शकुन्तलाबाईच्याही डोळ्यांत आनंदाश्रु उभे राहिले व त्यांनीं दमनच्या गालाचे पटापट मुके घेतले.

"दमा बाळ, आम्ही घरीं जाऊन येतो हं! रुबी तुझ्याजवळ बसेल." असें म्हणून त्या कॉटवरून उठल्या.

"दादा," अनामिका हलकेच त्याच्याजवळ होऊन म्हणाली "दादा, क्रान्तीचा विजय असो!"

दमननें आपल्या क्षीण शक्तीनें तिचा गालगुच्चा घेतला. सर्वांनीं खऱ्या आनंदानें हास्य केलें.

" आई, परत लवकर या हं. तुम्ही अशा जवळ बसला कीं मला किती आनंद वाटतो ! "

" अगदीं लवकर येतों. " असें म्हणून शकुन्तलाबाई निघाल्या.

" रुबी, नर्सिंग व्यवस्थित कर हं." दाराबाहेर जातां जातां अनामिका जीभ चावीत रुबीस हळुंच म्हणाली.

" इश्श, वात्रट कुठली ? ". असें म्हणून रुबीनें गोड हास्य केलें. तिचे गाल अतिशय आरक्त झाले होते. ती हंसत हंसत दमनकडे गेली व त्याच्या दोन्ही बाजूला हात टाकून कॉटवर बसली. डोळ्यांचें समाधान होत नसल्याप्रमाणें ती सारखी कौतुकानें चंचलपणें त्याच्याकडे पहात होती. ती किंचित् पुढें वांकली होती या मुळें तिच्या गळ्यांतील माळ लोंबत होती. मण्यांशीं हातानें चाळा करीत तो प्रेमळपणानें म्हणाला, " रुबी, तूं किती सद्गुणी आहेस ! "

प्रेमभावनेमुळें रुबीचें हृदय उचंबळून येत होतें. तिच्या सुंदर मुख-कमलावर मोहक हास्य झळकत होतें. प्रणयविकार दडवितांना तिच्या लांब टपोऱ्या डोळ्यांत चंचलता दिसत होती. बारीक वर्तुलाकार भुंवया किंचित् वक्र झाल्यामुळें त्यांना अधिकच आकर्षकता आली होती. चांफेकळीप्रमाणें दिसणारें तिचें नाक अग्रभागीं किंचित् आरक्त झालें होतें. निर्मल, रुंद भालप्रदेशावर कुंकुम-तिलक शोभून दिसत होता. लाल अधर हास्य दड-विण्याकरितां दाबून धरल्यामुळें तिच्या गुलाबी गालावर सुंदर खळी पडली होती. पुढें वांकल्यामुळें मानेखालीं दिसणारा उघडा धवल उरोभाग अधिकच मोहक वाटत होता. दमन दयार्द्रदृष्टीनें पहात अधीरपणें म्हणाला, " रुबाया, मी हें सुंदर स्वप्न तर पहात नाहीं ना ? "

" दमा, " रुबी अत्यंत स्निग्ध स्वरांत म्हणाली, " कॉलेजांत अस-तांना कल्पिलेली सुखस्वप्नं आज प्रत्यक्ष अनुभवायला येताहेत. पण तूं फार बोलूं लागलास हं ! औषधाचा भाग घेण्याची वेळ झाली."

एवढें म्हणून हंसत तिनें त्यांच्या अधरांचें चुंबन घेतलें. दमननें तिच्या मानेभोंवतीं आपला बाहुपाश घातला होता.

बागेंतील कारंजा नूतन उत्साहानें पाण्याचे तुषार उंच उडवीत होता. त्या तुषारांवर सूर्याचे किरण पडल्यामुळें समोर लहानसें इंद्रधनुष्य दिसत होतें. अशोक वृक्षावर बसलेली मैना मधुर स्वर काढीत होती.

बराच वेळ दमनच्या आलिंगनांत राहून रुबी उत्कट भावनांचा अपरिमित आस्वाद घेत स्वस्थ राहिली होती. प्रातःकालीं सूर्याचे मृदु किरण खिडकीवरील हिरव्या पडद्यावर पडल्यामुळें एक प्रकारचा आल्हाद-जनक प्रकाश सर्वत्र पसरला होता. जिकडे तिकडे उत्साहाचा आणि आनंदाचा सूर ऐकूं येतो आहे असेंच रुबी व दमन यांना वाटलें.

—-×-—

समाप्त.